# कृतज्ञता

समाजवादी पक्षाचे मान्यवर नेते आचार्य नरेंद्र देव व साथी जयप्रकाश याच्या लेखाचे व भाषणांचे संग्रह साथी यूसुफ मेहर-अली यानीं संपादित केलेले आहेत. अशा प्रकारच्या पुस्तकांची मराठी वाचकासाठीं फार आवश्यकता आहे असें मला व माझ्या अनेक सहकाऱ्यांना बऱ्याच दिवसापासून वाटत होते.

परंतु वरील दोनहि पुस्तकें युद्धकाळापूर्वीचीं आहेत. त्या-नंतरच्या काळात अनेक मौलिक घटना घडल्या असून त्यासंबंधीचे या नेत्यांचे विचार, लेख अगर भाषणद्वारा व्यक्त झालेले आहेत. त्यामुळें साथी मेहरअलींच्या पुस्तकाच्या अनुवादाऐवजी नवे लेख व भाषणें निवडून तीं संग्रहित करण्याचें मी ठरविलें.

निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या विषयावर जयप्रकाशजींनीं हिंदी जनतेचें जे मार्गदर्शन केलें व हिंदुस्तानपुढील प्रश्न सोड-विण्याचा जो अचूक मार्ग जनतेला दाखविला त्याचें दिग्दर्शन या पुस्तकातील लेखावरून होणार असल्यामुळें मी या पुस्तकास " वाटचाल " असें अन्वर्थक नांव दिलें आहे.

साथी जयप्रकाश यांचे लेख व भाषणें मी मुख्यतः सोशॅलिस्ट पक्षाचें मुखपत्र साप्ताहिक 'जनता' मधून घेतलीं आहेत. त्याच प्रमाणें साप्ताहिक 'साधना,' हिंदी 'जनवाणी' वगैरे नियतकालिकां-चाहि या कामीं मला उपयोग झाला आहे.

समाजवादी चळवळीच्या दृष्टीनें अतिशय उपयुक्त असें हें कार्य पार पाडण्याच्या कामीं मला अनेक मित्रांचें सहाय्य झालें आहे. सर्वांत प्रथम हे लेख मराठींत प्रकाशित करण्याची परवानगी दिल्याबद्दल साथी जयप्रकाश यांचा मी कृतज्ञ आहे. 'जनता' च्या जुन्या फायली वापरूं देण्याचें सौजन्य दाखविल्याबद्दल मी तेथील सर्व कार्यकर्त्यांचा आभारी आहे. श्री. बाबासाहेब टकले वकील व आचार्य ल. वि. वेलदे यांनीं मी केलेला अनुवाद तपासून योग्य त्या सूचना केल्याबद्दल आणि हिंदी लेखांचा अनुवाद करण्याच्या कामीं मला मदत केल्याबद्दल माझे मित्र श्री. खोपकर व के. डी. जोशी याचेहि मी मनःपूर्वक आभार मानतों. गांधीवधानंतर जय-प्रकाशजींनी दिल्ली येथें जें भाषण केलें ते विख्यात हिंदी साहित्यिक श्री. रामवृक्ष बेणीपुरी यांच्या पुस्तकावरून घेतलें आहे. साथी ना. ग. गोरे यानीं अनेक कामें बाजूस सारून केवळ माझ्या शद्बाखातर प्रस्तावना लिहून दिली याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे. मुखपृष्ठा-वरील चित्र श्री. दीनानाथ दलाल याचें आहे. अतिशय थोड्यावेळांत त्यांनीं तें काढून दिल्याबद्दल त्यांचेहि आभार मानले पाहिजेत. बालमित्राचे संपादक श्री. भा. रा. भागवत यांनीं मुखपृष्ठाच्या सजा-वटीचें कामीं मला अतिशय मदत केली आहे हें कृतज्ञतापूर्वक

नमूद करतो. शेवटी हें पुस्तक प्रसिद्ध करण्याच्या कामीं आमच्या सर्कल प्रेसच्या सर्व कामगार बंधूंनीं आपलेपणानें जी तत्परता दाखविली त्याबद्दल मी त्यांचाहि आभारी आहे.

समता प्रकाशनातर्फे प्रसिद्ध होणारें हें पहिलेंच पुस्तक आहे. सध्याच्या परिस्थितींत पुस्तक प्रकाशित करणें साहसाचे ठरेल असा सल्ला अनेकांनीं दिला असताहि मराठी वाचक वर्गाचें सहकार्य मिळेल या भरवशावरच आम्हीं 'समता प्रकाशना'चा उपक्रम हातीं घेत आहोत. यापुढें समता प्रकाशनातर्फे निरनिराळ्या राजकीय, सामाजिक व साहित्यविषयक विषयांवर निरनिराळ्या प्रसिद्ध लेखकांची पुस्तकें नियमितपणें प्रकाशित करण्याचा आमचा इरादा आहे. याकामीं मराठी वाचकवर्ग आम्हांस सक्रीय पाठिंबा देईल अशी आशा आहे.

गोळे कॉलनी,<br>
नासिक,<br>
२६।१।५१.

माधव लिमये

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

आजचा युगधर्म कोणता? असा प्रश्न उपस्थित केल्यास मी निःशंक-पणानें त्याचें उत्तर असें देईन कीं, आजचा युगधर्म समाजवाद. १९ वें शतक ज्याप्रमाणें लोकसत्तावादाचें शतक होऊन गेलें त्याचप्रमाणें हें २० वें शतक समाजसत्तावादाचें होणार आहे.

१९१७ सालीं रशियामध्यें केरेन्स्कीचें सरकार उलथून पडल्यावर तेथें कम्युनिस्ट हुकुमशाहीच्या स्वरूपांत समाजवादाचा प्रारंभ झाला. तेव्हां पासून आज तागायत समाजवादाकडेच जग झुकत चाललें आहे. केरेन्स्कीचें सरकार उलथून टाकल्यानंतर बोल्शेव्हिक (मूळच्या सोशल डेमोक्रॅटिक पक्षांतील बहुमतवाला गट) मेन्शेव्हिक (मूळच्या सो. डें. पक्षांतील अल्पमतवाला गट) व सोशल रेव्होल्यूशनरी या तीन पक्षांनीं रशियांत लोकसत्ताक समाजवादाची जर उभारणी केली असती तर आज जगामध्यें समाजवादाचें निराळेंच स्वरूप आपणास पाहावयास मिळालें असतें. परंतु बोल्शेव्हिक पक्षाचे लेनिन, ट्रॉट्स्की व स्टालिनसारखे जे धुरीण होते त्यांना मतभेद ही चीजच असह्य असल्याकारणानें त्यांनी घटना समितीच जबरदस्तीनें बरखास्त करून टाकली आणि हुकूमशाही समाजवादाची प्रस्थापना करून त्याचाच जगभर फैलाव करण्यासाठीं कम्युनिस्ट पक्ष व कम्युनिस्ट इंटरनॅशनल यांची प्रस्थापना केली. रशिया व त्याच्या कक्षेतील कम्युनिस्ट देशांमध्यें भांडवलशाही व सामंत–

शाही यांचा लोप होऊन उत्पादन साधनें समाजासाठीं वापरण्यांत येत असलीं तरी तेथें लोकसत्तेमधील उदारतेचा संपूर्ण लोप झालेला दिसतो. याच्या उलट इंग्लंड सारख्या देशांत जवळ जवळ सर्व महत्वाचे उद्योगधंदे राष्ट्राच्या मालकीचे होऊन नागरिक स्वातंत्र्यानें युक्त अशा समाजवाद आणण्याचे प्रयत्न सफल होत चाललेले दिसत असले तरी इंग्लंडच्या समाजवादाला चिकटलेली साम्राज्यवादाची उपाधि अद्याप सुटत नाहीं. तात्पर्य जगामधील एकटा अमेरिका देश वगळल्यास बाकीचीं सर्व प्रमुख राष्ट्रें समाजवादाच्या मार्गानेंच — स्वेच्छेनें म्हणा अथवा परिस्थितिवश होऊन म्हणा — जात आहेत. मात्र त्यांनीं अंगीकारलेला समाजवाद कोठें हुकुमशाहीमुळें तर कोठें साम्राज्य लालसेमुळें सदोष बनलेला आहे.

अशा काळीं हिंदुस्थानसारख्या देशामध्यें जर लोकसत्ताक समाजवादाची प्रस्थापना होईल तर १९१७ नंतर जागतिक प्रवाहाला जसें एक निराळेंच वळण लागलें त्याचप्रमाणें पुनरपि एक निराळें वळण लागणें अजूनहि अगदी संभवनीय आहे. हिंदुस्थान स्वतःच शंभर वर्षांच्या साम्राज्यशाही गुलामींतून नुकताच मुक्त झालेला असल्याकारणानें साम्राज्यवादी मनोवृत्तींपासून तो अलिप्त आहे. तसेंच त्याला देशाच्या एकंदर सामाजिक घडीची फेररचना करणें आवश्यक असल्यामुळें समाजवादाच्या मार्गानें गेल्यावाचून त्याला गत्यंतर नाहीं. अशा काळीं सत्तारूढ पक्षानें समाजवादाचा मार्ग सोडून बळेंच भांडवलदारांच्या हातीं आर्थिक सूत्रें राहूं दिलीं तर ती एक अपक्रांति ठरेल. आणि समाजवाद प्रस्थापित करण्याच्या निमित्तानेंच कां होईना आपलीच हुकुमशाही स्थापून लोकसत्ताक स्वातंत्र्याचा त्यानें लोप केला तर तीहि अपक्रांतीच ठरेल. तेव्हां समाजवाद व लोकसत्ता या दोहोंचाहि संगम जनतेला घडवून देऊन जो निर्दोष लोककल्याणाचें सर्वांगीण समाजवादी युग येथें सुरू करील असा पक्ष हिंदुस्थानांत निर्माण करावयास हवा आहे. असा पक्ष निर्माण कर-

त्याचा प्रयत्न आज आपल्या देशात जे हजारो लहानथोर कार्यकर्ते करीत आहेत त्यांत साथी जयप्रकाशांचे स्थान अनन्य सामान्य होय

त्यांच्याच लेखांचा संग्रह या पुस्तकात केलेला आढळेल. साथी जय प्रकाशांचे हे लेख १९४६ ते १९५० पर्यंतच्या कालखंडातील आहेत हा कालखंड म्हणजे हिंदुस्थानच्या इतिहासांतील अत्यंत घडामोडींचा कालखंड होय. देशाची फाळणी झाली, स्वराज्य मिळाले, पंजाबांत व बंगालात रक्ताच्या नद्या वाहिल्या, घटना तयार झाली, सोशॅलिस्ट पार्टी कॉंग्रेस मधून वेगळी झाली व वाढली, कम्युनिस्टांनी सशस्त्र लढ्याचा मार्ग पुरस्कारला व तो फसला, भांडवलदार शिरजोर बनले व देशातील शेतकऱ्यावर उपाशी राहण्याची वेळ आली या सर्व गोष्टी याच काळातल्या. अशा प्रसंगपूर्ण कालासंबंधी बोलण्याचा विशेष अधिकार जयप्रकाशांना प्राप्त झालेला आहे.

कारण जयप्रकाश हे हिंदुस्थानातील लोकसत्ताक समाजवादाचे प्रतीक बनलेले आहेत. हिंदुस्थानात समाजवादी विचारसरणीचा प्रचार शेकडो लोकांनी केलेला आहे व शेकडो लोक करीत आहेत. पण आपल्या देशांतील या विचारसरणीचा प्रवक्ता कोण? या प्रश्नाचे उत्तर "जयप्रकाश" असेच कोणीहि देईल. ते लिहितात क्वचित्. त्यांचा सर्व प्रचार बहुतकरून अखंड चाललेल्या दौऱ्यांतूनच होत असतो. जनतेमध्ये त्यांच्या इतका समाजवादाचा प्रचार कोणी केला असेल असे मला वाटत नाहीं. त्यामुळें ते क्वचित् जेव्हां लिहितात तेव्हां त्या लेखनाला विशेष वजन प्राप्त होतें. त्यांचे लिहिणें साधें, सरळ आहे त्यांत पांडित्याची छटा देखील दिसणार नाहीं. पण शांतपणे वाचकाला हें कळून येईल कीं, त्यांत मार्क्सवादाचें ज्ञान जसे भरलेलें आहे, त्याचप्रमाणें स्वतंत्र बुद्धीचा कसहि उतरलेला आहे. कांहीं लोक सद्बुद्धीनें विचारतात कीं, तुम्ही कॉंग्रेसशीं एकजूट कां करीत नाहीं? निदान कम्युनिस्टांसारखे "डावे गट" जे आहेत त्यांच्याशीं तरी

तुम्ही जमवून का घेत नाही? जयप्रकाशांचे लेख वाचून पाहिल्यास आमच्या या सन्मित्रांचे शंका निरसन होईल असे वाटते.

साथी माधव लिमये यांनी जयप्रकाशांच्या लेखाचे भाषांतर करताना मुळांतला प्रसाद व सहजुता उत्तम प्रकारे कायम राखली आहेत. आज जनतेमध्ये समाजवादाविषयीची जिज्ञासा बऱ्याच प्रमाणात वाढलेली आहे. अशा वेळी सोशॅलिस्ट पार्टीच्या गेल्या पाच वर्षांतील भूमिकेची अधिकृत रित्या मांडणी करणारे हे लिखाण मराठी वाचकांना उपलब्ध करून दिल्या-बद्दल मराठी वाचक साथी माधवराव लिमयांचे ऋण मान्य करतील असे मला वाटते.

प्रजासत्ताक दिन
२६।१।५१
पुणे

नारायण गणेश गोरे

# स्वातंत्र्य सैनिकांस—

दोस्तहो,

मी सुटून आल्याबरोबर " जनता " साप्ताहिकांतून आपल्याला अभिवादन केलें होतें आणि त्याचवेळीं असेंहि जाहीर केलें होतें कीं, थोड्याच दिवसांत सद्यःपरिस्थितीवरील माझीं मतें व सध्याचें आपलें कर्तव्य याविषयीं मी उहापोह करीन. तें आश्वासन पुरें करण्यास इतका कालावधी लागला, याबद्दल मी दिलगीर आहे. परन्तु माझ्या सहकाऱ्यांना भेटून त्यांचा सल्ला घेणें जरूर असल्यामुळें हा विलंब अपरिहार्यच होता. जरूर त्या गांठीभेटी एव्हांना मी घेतल्या असून कांहीं तरी निश्चित योजना तुमच्या पुढें ठेवणें आज शक्य झालें आहे.

गेल्या कांहीं दिवसांत ज्या ज्यावेळीं कांहीं महत्वपूर्ण घटना घडल्या, त्या त्यावेळीं त्याबाबतचीं आमचीं मतें तुमच्यापुढें ठेवण्याचा प्रयत्न स्वतंत्र किंवा संयुक्त पत्रकांच्या द्वारा मी आणि माझ्या सहकाऱ्यांनीं केला आहे. गेल्या अ. भा. कॉ. क. च्या वेळीं आम्ही जी भूमिका घेतली ती तुम्हांला समजली आहेच. चालू परिस्थिति, आपल्यापुढील कार्य आणि तें पार पाडण्यासाठीं आपण कोणता

मार्ग अवलंबावा याबाबतचीं माझीं मतें पद्धतशीरपणानें आणि विस्तारानें मांडण्याचा प्रयत्न मी या ठिकाणीं करणार आहे.

सध्याची परिस्थिति संक्रमणावस्थेची असून अत्यंत झपाट्यानें तींत बदल घडून येत आहे. ब्रिटिशांनीं पुरस्कृत केलेल्या घटना समितींत प्रवेश करण्याचा निर्णय अ. भा. काँ. नें घेतला आहे. थोड्याच दिवसांत ब्रिटिश व्हाईसरॉयच्या हुकमतीखालीं तात्पुरतें सरकार काम पाहूं लागेल. केव्हांहि जरी या सरकारचा कारभार सुरूं झाला तरी व्हाईसरॉय, ब्रिटिश सैन्य आणि इतर ब्रिटिश अधिकारी जोंपर्यंत हिंदुस्तान सोडून जात नाहींत, तोंपर्यंत स्वतंत्र देशातील स्वतंत्र सरकारचा दर्जा त्याला कधींच प्राप्त होवूं शकणार नाहीं. या सरकारला स्वतंत्र सरकार म्हणून काम करूं द्या अशी मागणी करणें अगदींच निरर्थक आहे. स्वतःच्या लहरीनुसार सत्तादान करण्याचा अधिकार ज्याच्याजवळ आहे, त्याच्याजवळ ती सत्ता वाटेल तेव्हां काढून घेण्याचा अधिकारहि आहेच. म्हणून तात्पुरतें सरकार हें "वस्तुतः" स्वतंत्र भारताचेंच सरकार आहे, अशा घोषणांनीं आपण फसून जाता कामा नये.

मग प्रश्न असा उपस्थित होतो कीं, तथाकथित घटना-समिति आपल्याला स्वातंत्र्य प्राप्त करून देऊ शकेल कां ? म्हणजेच ती घटनासमिति स्वतंत्र, लोकशाही हिंदुस्थानची घोषणा करून त्याची अंमलबजावणी करूं शकेल कां ? उदाहरणार्थ मध्यवर्ती सरकारची नेमणूक करून व्हाईसरॉयला सर्व सत्ता त्या सरकारच्या हातीं सोंपवून हिंदुस्थान सोडण्यास ती भाग पाडूं शकेल कां !

आणि त्या मध्यवर्ति सरकारच्या हातीं सर्व लष्करी आणि नागरी ब्रिटिश अधिकाऱ्यांची त्यांच्या मायदेशीं रवानगी करण्याइतकी सत्ता असूं शकेल काय? ब्रिटिश अर्थसत्तेचा जो गळफास आपल्या देशाभोंवती आवळला जात आहे, तो त्या सरकारला सोडविता येईल कां? ही घटनासमिति स्वतःचें विसर्जन करून, ब्रिटिश अधिकारी हिंदुस्थान सोडून गेल्यानंतर कोठल्याहि तऱ्हेचीं बंधनें नसलेल्या अशा प्रौढ मतदान पद्धतीनें हिंदी जनतेनें निवडलेली नवी घटना परिषद बोलावण्याचे अधिकार खरोखरीच्या स्वतंत्र अशा तात्पुरत्या सरकारला देवूं शकेल काय? हिंदी स्वातंत्र्य आणि लोकशाही यासाठीं या सर्व गोष्टींची अत्यंत आवश्यकता आहे. त्या पार पाडण्याचें सामर्थ्य नियोजित घटनासमितिपाशीं आहे का? सध्याची परिस्थिति आणि परस्परांचें बलाबल लक्षांत घेतां आगामी घटनासमितीला या दिशेनें पाऊल टाकतां येईल, किंवा त्यापैकीं एकादें तरी उद्दिष्ट साध्य करतां येईल असें मानणें अत्यंत चूक ठरेल. परन्तु अशा तऱ्हेचा प्रयत्न या घटनासमितिकडून केला जाईल असें क्षणभर गृहित धरलें तरी देखील ब्रिटिश अधिकारी तिच्या मार्गांत अडथळे आणल्या-शिवाय राहणार नाहींत हें निश्चित, आणि अशा परिस्थितींत आपली ध्येयें तडीस नेण्याचा प्रामाणिकपणा आणि कळकळ, घटना समिति-पाशीं असेल तर तिला ब्रिटिशांचें आव्हान स्वीकारून तीं ध्येयें कृतींत उतरविण्यासाठीं जनशक्तीलाच आवाहन करावें लागेल. व्हाईसरॉयनें तिचें उद्घाटन केलें त्यानंतरच ती बरखास्त करण्याचा प्रसंग येणार! अशा तऱ्हेनें स्वातंत्र्यासाठीं एक निकराचा

झगडा सुरू होऊन त्याची परिणति स्वतंत्र, लोकशाही आणि संयुक्त अशा लोकसत्ताक हिंदुस्थानची स्थापना होण्यात आणि हिंदी जनतेनें निवडून दिलेली खरीखुरी घटनासमिति अस्तित्वांत येण्यात झाली पाहिजे.

तथापि ही घटनासमिति असा कांहीं मार्ग अवलंबील असें वाटत नाहीं. राष्ट्रपति नेहरू ज्याला परिस्थितीचें दडपण असें म्हणतात, म्हणजे सध्याच्या घटनासमितीच्या सार्वभौमत्वाच्या मर्यादा, तिच्यातील उणीवा, घटनासमितीच्या सभासदात उसळलेली ब्रिटिशाच्या हस्तकाची आणि स्वातंत्र्य व लोकशाही यांच्या हितशत्रूची भाऊगर्दी, ब्रिटिश सैन्य आणि व्हाइसरॉय यांचें अस्तित्व या आणि अशा इतर सर्व गोष्टी जमेस धरून व्यवहार्य मार्ग म्हणून तडजोडीचाच अवलंब केला जाणार अशी माझी खात्री आहे. निराळ्या शब्दात सांगावयाचें तर, ही घटनासमिति तडजोडीच्या पाठीमागे लागून स्वातंत्र्य, लोकशाही आणि राष्ट्रीय ऐक्य हें सारेंच गमावून बसणार, आणि मग भ्रमनिरास झाल्यावर आज ज्या मार्गापासून आपण दूर जात आहोंत त्याच मार्गावर पुन्हा यावें लागणार! हा मार्ग म्हणजे क्रांतीचा, लढ्याचा आणि प्रतिकाराचा मार्ग होय स्वातंत्र्याचा हा मार्ग अवघड असला तरी तो खात्रीचा निश्चित आहे.

यावरून आपल्या हें लक्षात येईल कीं, कोठल्याहि परिस्थितींत, म्हणजे घटनासमिति यशस्वी झाली अथवा तिनें लढा दिला आणि त्यात तिला अपयश आलें तरी, स्वातंत्र्यासाठीं चालणारा लढा ...त नाहीं. ज्याला आपल्या देशातील परिस्थितीची यथार्थ कल्पना

आहे, तो हेंच अनुमान काढील. आजहि ब्रिटिश साम्राज्यशाही 'परिस्थितीच्या दडपणाचा' बागुलबुवा आपणासमोर उभा करू शकते. जोंपर्यंत क्रांतिकारी चळवळीच्या योगानें आपण हें दडपण नष्ट करूं शकत नाहीं, तोंपर्यंत आपलें स्वातंत्र्य नाममात्रच राहणार. तेव्हा वादविवाद, सवलती आणि मुत्सद्देगिरी यांच्या जोरावर सध्याच्या' परिस्थितींत पालट घडवून आणतां येईल अशी अपेक्षाहि कोणी करू नये

म्हणून आपण शेवटीं या निर्णयावर येऊन पोहोंचतों कीं, ब्रिटिशाचा घटना विषयक मसूदा स्वीकारल्यानें आपला स्वातंत्र्य समाप्त होत नाहीं. तो लढा चालूच राहणार. उलट त्याचें स्वरूप अधिक व्यापक आणि तीव्र होत-जाणार. व या राजकीय विमोचनाच्या लढ्याशींच राष्ट्रीय ऐक्य व आर्थिक विमोचनाचे लढेहि एकरूप होतील.

## सर्वंकष लढा

हिंदू आणि मुसलमान, सवर्ण आणि हरिजन यांच्यात भांडणें लावणें, शीखांना अल्पसंख्य जमात म्हणून उठविणें, संस्थानी मुलूख इतर हिंदुस्तानापासून अलग पाडणें, जमीनदारांना आश्रय देवून त्यांना ब्रिटिश राजसत्तेचे आधारस्तंभ बनवून ठेवणें, भांडवलदार आणि मध्यमवर्गीयांना मलिदा चारून त्यांना देशद्रोह करावयास लावणें हीं सारीं इंग्रजाच्या भेदनीतीचींच उदाहरणें आहेत. याचा अर्थ असा कीं, आपल्या शंभर वर्षांच्या राजवटींत त्यांनी एकच एक प्रयत्न केला आणि तो म्हणजे ब्रिटिश साम्राज्यशाही खिळखिळी झाली तर देशांत गोंधळ आणि फाटाफूट माजेल अशी भीति सर्वांना वाटावी. ब्रिटिशांच्या हुकमतीखालीं घडून आलेलें ऐक्य हें सर्वस्वी हुकूमशाही राजवटीखालील ऐक्य होतें. जनतेच्या अथवा राष्ट्राच्या ऐक्याचा त्यांत लवलेशहि नव्हता. तें ऐक्य देशांत काँग्रेसनेंच घडवून आणलें. परन्तु आज त्यावर गंडांतर आलें आहे. त्यामुळें ब्रिटिशांनीं देवूं केलेल्या सुधारणांचा स्वीकार केल्याबरोबर राष्ट्रीय ऐक्यासाठीं कराव्या लागणाऱ्या लढ्याला एक खास महत्व प्राप्त होणार आहे.

दुसरें असें कीं, आगामी घटनात्मक बदलांमुळें आर्थिक आणि वर्गीय प्रश्नांना तोंड फुटणें क्रमप्राप्त आहे. स्वराज्याचें स्वरूप काय असावें, किंवा "स्वराज्य कोणासाठीं" अशा सारखे सवाल हे मग नुसते चर्चेचे किंवा वादाचे विषय न राहतां त्याबाबत तावडतोब निर्णय घ्यावे लागतील. आणि आपल्या राजकारणावर नुसता सिद्धांतिक स्वरूपाचाच नव्हे तर व्यवहार्य परिणामहि त्यामुळें घडून येईल. म्हणजेच, स्वातंत्र्याच्या लढ्याचा एक अपरिहार्य भाग जो भाकरीचा

लढा तो आघाडीवर येईल आणि त्याचें महत्वहि वाढेल.

मला ही गोष्ट स्पष्टपणें सांगितली पाहिजे कीं, हे तीन स्वतंत्र लढे नसून जनतेच्या एकाच सर्वंकष लढ्याचीं तीं निरनिराळीं अंगें आहेत. निरनिराळ्या अवस्थांमध्यें त्यापैकीं एकेका अंगाला कमी अधिक महत्व प्राप्त होत असलें, तरी सध्याची घटनात्मक योजना जसजशी विकास पावत जाईल तसतशा लढयाच्या या तिन्ही बाजू सारख्याच महत्वाच्या ठरतील.

सध्याची परिस्थिति लक्षांत घेतां जनतेचा हा सर्वंकष लढा *निरनिराळ्या आघाड्यांवर लढवावा लागेल. त्या आघाड्या म्हणजे* घटना समिति, तात्पुरतें सरकार, आणि कालांतरानें मध्यवर्ति आणि प्रांतिक सरकारें या होत.

आपण ज्या काँग्रेसचा एक भाग म्हणून काम करतों ती काँग्रेस बहुधा या सर्व घडामोडींत सामील होईल. आणि तसें झालें तर स्वातंत्र्य, ऐक्य व समता यासाठीं काँग्रेस जो लढा देईल तो घटनात्मक आणि सरकारी यंत्रणेच्या मार्फत दिला जाईल. सध्याच काँग्रेसचें रूपांतर निवडणुकी लढविण्याऱ्या सनदशीर पक्षांत होवूं लागलें आहे. आणि ही प्रक्रिया अशीच शेवटपर्यंत चालू राहिली तर, त्याचा अपरिहार्य परिणाम येवढाच होईल कीं, या त्रिविध स्वरूपाच्या लढ्यांत काँग्रेस फारसें यश मिळवूं शकणार नाहीं. कांहीं विशिष्ट परिस्थितींत घटनात्मक किंवा सरकारी यंत्रणेचा थोडा फार उपयोग काँग्रेसला करून घेतां येईल हें खरें; परन्तु आज ज्या परिस्थितींत आपण आहोंत ती लक्षांत घेतां जनतेचा लढा हा कायदे-

मंडळें किंवा सरकारी दप्तरांच्या बाहेरूनच प्रामुख्यानें चालवावे लागणार.

## २

या लढ्याचा मार्ग कोणता? त्यासाठीं दहशतवादाचा आश्रय करावा लागणार की स्वयंस्फूर्त हिंसक उठावावर आपण भिस्त ठेवणार? दरोडे घालणार की आगी लावीत सुटणार? यापैकी कशाचाहि अवलंब आपल्याला करतां येणार नाहीं हे निश्चित. आजच्या काळांत लढ्याचा एकमेव मार्ग म्हटला म्हणजे जनतेच्या शक्तीचें अधिष्ठान मिळविणें हाच होय. हें अधिष्ठान मिळवावयाचें म्हणजे प्रथम जनतेची लढ्यासाठीं मानसिक तयारी केली पाहिजे; तसेंच शेतकऱ्याचे व कामगाराचे संघ, स्वयंसेवक दलें, विद्यार्थी व युवक संघटना, ग्रामपंचायती, विणकराच्या सहकारी संस्था आणि अशा तऱ्हेच्या अनेक संघटना उभ्या केल्या पाहिजेत; आणि जनतेत जागृति निर्माण करण्यासाठीं व तिची सामुदायिक शक्ति वाढविण्यासाठीं त्याचा जास्तीतजास्त उपयोग करून घेतला पाहिजे. या सर्वांबरोबरच आपल्याला आणखीहि एक कार्य करावें लागणार आहे आणि तें म्हणजे काँग्रेस संघटना अधिक मजबूत आणि जोमदार बनवून जनतेबरोबरचा तिचा संबंध अधिक प्रभावी करणें हें होय. आपल्या लढ्याला सध्याच्या अवस्थेत जनतेचें अधिष्ठान कसें निर्माण करावयाचें त्याचें संपूर्ण दिग्दर्शन आपल्या कार्यक्रमाविषयींच्या भागांत केलें आहे.

याठिकाणीं राष्ट्रीय ऐक्याच्या दृष्टीनें "जनतेचें अधिष्ठान"

पाहिजे मुसलमानांत राजकीय जागृति करणें, आर्थिक आणि वर्गीय संघटनांची वाढ करणें, हिंदूंच्यांत सामाजिक सुधारणा घडवून आणणें, सांस्कृतिक आणि करमणुकीच्या समान साधनांना उत्तेजन देणें, मजबूत सरहद्द, आर्थिक विकासासाठीं समान कार्यक्रम, समान अर्थव्यवस्था, समान भाषा, वगैरेंच्या आवश्यकतेमुळें स्वभावतःच राष्ट्रीय ऐक्यासाठीं झटणाऱ्या समाजांतील प्रवृत्ति शक्तिशाली बनविण्याचा यत्न करणें, हे अशा तऱ्हेचे राष्ट्रीय ऐक्य साधण्याचे मार्ग होत. निदान अशा प्रयत्नांमुळें यशाचा मोठा वाटा तरी आपल्या पदरात खास पडूं शकेल. प्रत्येक स्वातंत्र्य सैनिकानें जातीय भावना किंवा अहंकार यांपासून सर्वस्वी अलिप्त राहून मानवांमधील समानतेचें तत्व आपल्या आचरणांत आणण्याचा सतत प्रयत्न केला पाहिजे हें मी नव्यानें सांगितलें पाहिजे असें नाहीं.

राष्ट्रीय ऐक्याची जनतेंतील संघटित भावना सध्याच्या घटकेला विशेषच दुर्बल झाली आहे. तिची वाढ करणें हें आपलें आजचें सर्वांत महत्वाचें कार्य होय. परन्तु कोणत्याहि प्रकारच्या गैरसमजाला जागा राहू नये म्हणून मला मुद्दाम हें स्पष्ट केलें पाहिजे कीं, जनतेची शक्ति संघटित करण्याचें कार्य सर्व आघाडींवर एकदमच केलें पाहिजे. पृथक् पृथक्पणें किंवा निरनिराळ्या उद्दिष्टांसाठीं त्याचें अलग अलग कप्पे करून हें कार्य साधतां येणार नाहीं. राजकीय, आर्थिक आणि सामाजिक संघटना या एकमेकांशीं निगाडत व परस्परपूरक अशा असतात आणि त्या सर्वांची मिळून विराट जनता आंदोलनात परिणति होत जाते.

# ३

## संघटनेचें स्वरूप

आपण हातीं घ्यावयाचा कार्यक्रम विशद करण्यापूर्वी स्वातंत्र्याचे शिपाई म्हणून आपण ज्या संघटनेमार्फत कार्य करणार, तिचें स्वरूप कसें असावें यासंबंधींचीं माझीं मतें स्पष्ट करणें जरूर आहे. आणि समाधानाची गोष्ट अशी कीं, माझ्या बहुतेक सहकाऱ्यांचीं मतेंहि माझ्यासारखींच आहेत. ऑगस्ट क्रांतीच्या काळांत आपण सर्वजण कॉंग्रेसजन म्हणून कार्य करीत होतों. आणि त्यावेळीं सर्व कॉंग्रेसच लढ्याच्या बाजूची असल्यामुळें तें योग्यच होतें. जे कॉंग्रेसजन त्यावेळीं लढ्यापासून अलिप्त राहिले किंवा ज्यांनीं लढ्याला विरोध केला त्यांनीं कॉंग्रेसशीं द्रोह केला. परन्तु आजची परिस्थिति वेगळी आहे. लढा सुरू करणें अथवा त्यासाठीं तयारी करणें हें आजच्या कॉंग्रेसचें धोरण राहिलेलें नाहीं. वडजोड आणि सदनशीर मार्ग याचा तिनें आज अवलंब केला आहे. आणि आपण मात्र लढा व क्रांति-कारी चळवळ यांना आजहि चिकटून राहणार असल्यामुळें आपल्याला आतां कॉंग्रेसचें नांव वापरतां येणार नाहीं.

परन्तु आज आपण कॉंग्रेस मधून बाहेर पडून तिला प्रति-स्पर्धी अशी स्वतंत्र संघटना उभी केली, तर त्यामुळें आपल्या राष्ट्रीय स्वातंत्र्याची फार मोठी हानी होईल याबद्दल माझ्या मनांत संदेह नाहीं. आपली कार्यपद्धति आणि कॉंग्रेसमधील आजच्या पुढाऱ्यांची ...ति यामधील अंतर दिवसें दिवस वाढत जाणार आहे यांत

शंका नाहीं. परन्तु पुढारीपण म्हणजेच कांहीं संस्था नव्हे. आजच्या कॉंग्रेसवर इतर कोणत्याहि गटाइतकाच आपलाहि अधिकार आहे. कारण कॉंग्रेसला आजचें स्वरूप प्राप्त होण्यासाठीं त्यांच्याइतकेच आपलेंहि कष्ट आणि त्याग कारणीभूत झालेले आहेत. म्हणून दुसऱ्या कोणाइतकाच कॉंग्रेसच्या नांवानें बोलण्याचा आपल्यालाहि अधिकार आहे. राजकीय आणि सामाजिक शक्तींच्या संघटना जास्तीत जास्त प्रमाणांत कॉंग्रेसमध्यें प्रतिबिंबित झाल्या असून जनतेच्या मनावर अभूतपूर्व आणि विलक्षण अशी छाप तिनें बसविली आहे. त्यामुळें सामुदायिक लक्ष्याचें तें एक सर्वोत्कृष्ट साधन बनलें आहे. म्हणून **जोंपर्यंत क्रांति कार्यासाठीं कॉंग्रेसचा उपयोग करून घेतां येणें शक्य आहे, तोंपर्यंत** या साधनाचा त्याग करणें अत्यंत मूर्खपणाचें ठरेल. तशी शक्यता अद्यापहि आहे असा माझा विश्वास आहे. म्हणून कॉंग्रेसमध्यें राहूनच आपण काम केलें पाहिजे व तिची ताकद वाढविण्याचा आणि जनतेची सेवा करून तिला आपल्या मार्गावर आणण्याचा जिवापाड प्रयत्न केला पाहिजे असें माझें निश्चित मत आहे. सध्यांचें कॉंग्रेसचें नेतृत्व तिला एकाद्या सनदशीर राजकीय पक्षाचें स्वरूप देण्याचा आपला प्रयत्न असाच चालू ठेवील. आणि कोठलाहि विधायक कार्यक्रम न देतां जनतेची सेवा करण्यासाठीं सर्वस्वी सरकारी यंत्रणेवर विसंबून राहील किंवा त्याची नोंकरशाही प्रवृत्ति वाढत जाऊन अधिकाराच्या किंवा मानाच्या जागांची खैरात करून त्या जोरावर कॉंग्रेस संघटनेवरील आपला ताबा तें कायम ठेवूं पाहील तर मात्र त्याला विरोध

अपरिहार्य होऊन बसेल. परन्तु आपण जर जनतेंत जावून तळमळीनें जोरांत कार्य करीत राहिलों तर, कॉंग्रेसजनांना आपल्याकडे आकृष्ट करून कॉंग्रेसला सनदशीर मार्गापासून निश्चित परावृत्त करतां येईल.

यावरून आपणाला खालील दोन महत्वाचे निष्कर्ष काढतां येतील: १. ऑगस्ट आंदोलनासारखें आपल्याला यापुढें कॉंग्रेसच्या नांवावर कार्य करतां येणार नाहीं; २. परन्तु अद्यापहि आपण कॉंग्रेसमध्यें राहूनच कार्य करीत राहिलें पाहिजे. मग प्रश्न असा उपस्थित होतो कीं, स्वातंत्र्यासाठीं झगडणाऱ्या सर्व सैनिकांना राजकीय आणि सिद्धांतिक मार्गदर्शन देतां येईल अशा तऱ्हेनें संघटित-पणें कार्य करण्याचा मार्ग कोणता? आणि आपलें कार्य हें यापुढें कॉंग्रेसपुरतेंच मर्यादित राहणार नाहीं ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे तर या प्रश्नाला अधिकच महत्व प्राप्त होतें. कामगार संघ, किसान सभा आणि कॉंग्रेसबाहेर असलेल्या अशा अनेक संघटनांतून आपल्याला कामें करावीं लागणार आहेत. जर आपलें कार्य कॉंग्रेसपुरतेंच मर्यादित असतें तर, एखादा असंघटित गट म्हणूनहि कदाचित आपण काम करूं शकलो असतों. परन्तु आपल्यावरील जबाबदारी व्यवस्थित-पणें पार पाडावयाची असेल तर वर दाखविल्याप्रमाणें एखादें संघटित व्यासपीठ आपण उभें केलें पाहिजे.

या प्रश्नावर खोलवर विचार केल्यानंतर आणि इतर सहकाऱ्यांचा सल्ला घेतल्यानंतर मी अशा निर्णयाप्रत आलों आहे कीं, आपल्याला ज्या तऱ्हेची संघटना हवी आहे तिचा पाया म्हणून कॉंग्रेस समाजवादी पक्षाचा आपल्याला आयताच उपयोग करून

घेतां येईल, माझी खात्री आहे की, जरूर ते फेरबदल करून कॉ. स. प. ची नव्यानें संघटना केली तर, आपलें उद्दिष्ट पार पाडण्यास त्याचा उत्तम उपयोग होवूं शकेल. कॉ. स. प. नें राजकीय कार्याच्या बाबतींत चांगलें नांव मिळविलें असून त्यानें ऑगस्ट क्रांतीच्यावेळीं अभिनंदनीय अशी कामगिरी बजावलेली आहे ही गोष्ट तर त्याचे विरोधकहि कबूल करतात जुन्या पक्ष संघटनेत कांहीं उणिवा होत्या. परन्तु पक्षानें, समाजवादी आणि जहाल गटाच्या एकजुटीचे जे प्रयत्न करून पाहिले त्यामुळें त्यापैकीं कांहीं दोष निर्माण झालेले होते. ते दोष यापुढें काढून टाकणें शक्य आहे आणि तसे ते काढले जातीलहि. ऑगस्ट क्रांतींत भाग घेतलेल्या कार्यकर्त्यांशीं माझा जो संबंध आला, त्यावरून एक गोष्ट मला कळून चुकली आहे कीं, त्यांच्यापैकीं कांहीजण पक्षाविषयींचे आपले पूर्वग्रह सोडावयास तयार नसले तरी बहुतेक कार्यकर्ते कॉ. स. पक्षाकडे आशापूर्ण नजरेनें बघत असून पक्षाबद्दल त्यांच्या मनांत खूप सद्भावना वसत आहे. म्हणून वर म्हटल्याप्रमाणें मी या निर्णयाला येवून पोहोचलों आहे कीं, सर्व स्वातंत्र्य सैनिकांनीं कॉ. स. पक्षात संघटित व्हावें.

हा निर्णय घेण्याचें आणखीहि एक कारण असें आहे कीं, कॉ. स. पक्षाच्या संघटनेत राष्ट्रीय स्वातंत्र्य आणि समाजवाद या दोनहि ध्येयाचा समावेश झालेला आहे. स्वातंत्र्यासाठीं लढणाऱ्या ९५ टक्के सैनिकाचा कल समाजवादाकडे झुकत आहे अशी माझी खात्री आहे. समाजवादाविरहित मिळालेल्या राष्ट्रीय स्वातंत्र्यानें त्याचें समाधान होणार नसल्यानें कॉ. स. पक्ष हा त्यांना जास्तच जव-

त्वचा वाटू लागतो.

## जहाल एकजूट

संघटनेच्या प्रश्नाशींच जहाल एकजुटीचाहि प्रश्न निगडित आहे. मला असें आढळून आलें आहे कीं, याबाबत अनेकांच्या मनाचा गोंधळ उडून गेला आहे. जहाल एकजुटीच्या प्रश्नावर जगांत सर्वत्र मोठा फाथ्याकूट होत आहे. माझें असें मत झालें आहे कीं, ज्या स्वरूपांत तो प्रश्न उपस्थित केला जातो, त्या स्वरूपांत तो कधींहि सुटणें शक्य नाहीं. जहाल एकजूट म्हणजे यच्चयावत सर्व जहाल पक्ष अगर गट यांची एकजूट असा अर्थ अभिप्रेत असेल तर ती कधींच साधतां येणार नाहीं. जे अशा तऱ्हेच्या एकजुटीची भाषा बोलतात, त्यांनीं प्रथम स्वतःला असा प्रश्न विचारला पाहिजे कीं, जहाल गटांत मुळांत फूट पडलीच कशी? किंवा निराळ्या शब्दांत सांगावयाचें तर अलग अलग असे जहाल पक्ष अस्तित्वांतच कसे आले असा प्रश्न त्यांनीं स्वतःला विचारावा. माझी अशी समजूत आहे कीं, या प्रश्नाचा सांगोपांग विचार केला तर, असें आढळून येईल कीं, ज्या फुटीर आणि संकुचित वृत्तीमुळें निरनिराळे जहाल पक्ष अस्तित्वांत आले ती फुटीर वृत्तीच त्यांच्या ऐक्याच्या आड येते.

जहाल चळवळींचा सर्व जगभर जो अनुभव आलेला आहे, त्यावरूनहि हीच गोष्ट सिद्ध झालेली आहे कीं, निरनिराळ्या डाव्या गटांना परस्परांचें ऐक्य साधणें, इतकेंच नव्हे तर विशिष्ट प्रसंगीं किंवा अल्प काळपर्यंत झालेल्या एकजुटीचे अपवाद सोडल्यास एकत्र येवून काम करणें देखील शक्य झालेलें नाहीं. इतिहासानें

दिलेल्या या धड्यापासून आपल्याला पुष्कळ बोध घेता येण्यासारखा आहे.

आपल्या देशांत आम्हांला आजवर आलेला अनुभवहि यापेक्षां निराळा नाहीं. दोन वेळां आम्हीं जहाल एकजुटीसाठीं अतोनात प्रयत्न करून पाहिले. परन्तु त्या दोन्ही खेपेला आमचें उद्दिष्ट तर सफल झालें नाहींच, उलट त्यातून कटुता मात्र निर्माण झाली, आणि ती अद्यापहि नष्ट झालेली नाहीं. कॉ. स. प. नें प्रामाणिकपणें आपले दरवाजे इतर जहाल आणि समाजवादी गटांना खुले केले. परन्तु त्यांनी मात्र त्या संधीचा फायदा घेवून स्वतःचें वजन वाढविण्याची, आपापल्या पक्षांत नवीन 'भरती' करून घेण्याची, पक्ष "आंतून पोखरण्याची" आणि जगभर जहाल एकजुटीच्या नांवाखालीं ज्या कारवाया केल्या जातात त्या सर्व करण्याची पर्वणी साधून घेतली असा अनुभव आम्हांला आलेला आहे.

त्यामुळें निदान माझा तरी या तथाकथित जहाल एकजुटीवर विश्वास राहिलेला नसून पुन्हां त्या फंदांत पडण्यास मी केव्हांहि तयार होणार नाहीं. त्यापेक्षां सर्व जहाल गटांनीं आपापल्या पक्षांचा अभिनिवेश आणि क्षुद्र तात्विक अहंकार बाजूला सारून एका विशाळ संघटनेंत सामील व्हावें व जहाल राष्ट्रवाद आणि समाजवाद यावर आधारलेला एकच एक पक्ष उभा करावा हें सर्वोत्तम. आज कॉ. स. प. हा असा पक्ष आहे. त्यांतील चुका दाखविणें किंवा त्यावर टीकेचे प्रहार करणें फारसें कठीण नाहीं. परन्तु तसें न करतां समान उद्दिष्ट, समान कार्यपद्धति आणि समान विचारसरणी याकडे

लक्ष देवून सर्व जहाल गटांनी आपापले तात्विक मतभेद बाजूला सारून एका विशाल पक्षाखाली संघटित होणें अधिक उपयुक्त ठरणार आहे. हिंदुस्तानांतील डाव्या गटाची समाजवादी चळवळ फोफावयाची असेल तर एकच एक महान पक्ष प्रस्थापित होणें आवश्यक आहे. अस्थिर वातावरणामध्यें निरनिराळे डावे गट तात्पुरते एकत्र आल्यानें-आणि त्यातहि पुन्हा अशी एकजूट झाल्यावरहि ते स्वतःचें स्वतंत्र अस्तित्व कसें आवश्यक आहे तें सांगत बसतील किंवा अेकत्र आल्यावरहि स्वतःचा गट वाढविण्यासाठीं नवे नवे रंगरूट मिळविण्याचा आणि पक्षीय प्रचाराचा खटाटोप करतील तर, आपलें उद्दिष्ट तडीस जाण्याची आशाच नको. कॉ. स. पक्षा व्यतिरिक्त हिंदुस्तानात दुसरा कोणताहि राजकीय पक्ष हें कार्य तडीस नेवूं शकेल असें मला वाटत नाहीं. म्हणून सर्व कार्यकर्त्यांनी कॉं. स. पक्षाला स्वतःचा पक्ष मानावें अशी मी विनंती करतों बऱ्याचशा प्रमाणांत ते तसें मानूंहि लागले आहेत. इतरांनीहि तोच मार्ग अनुसरावा अशी माझी विनंती आहे.

स्थानिक,अडचणी, व्यक्तिगत संबंध, आणि पूर्वग्रह यामुळे कांहीं मित्राना असें करणें अवघड वाटेल, परन्तु मी सर्व सैनिकांना असें आश्वासन देवूं इच्छितों कीं, या सर्व अडचणी बाजूस सारून एक सामर्थ्यशाली संघटना उभारण्याचें कामीं त्याना सहकार्य करता यावें म्हणून आम्ही प्रयत्नांची पराकाष्ठा करूं.

## आपला आजचा कार्यक्रम

येथें संपूर्ण राजकीय कार्यक्रमाचा उहापोह करण्याचा माझा इरादा नाहीं. तो पुढें केव्हांतरी कदाचित, पक्षाचें धोरण विशद करतांना, करतां येईल. जीं कामें आपण तातडीनें हातीं घेणें जरूर आहे, त्याचीच फक्त रूपरेषा मी या ठिकाणीं मांडणार आहे.

आपल्या भावी लक्ष्याचें चित्र आपण आपल्या डोळ्यांसमोर उभें करूं शकलों तर कदाचित आपल्याला आपल्या कार्यक्रमाची कल्पना अधिक चांगली येवूं शकेल. माझ्या डोळ्यासमोर जें चित्र आहे तें असें— जास्तीतजास्त प्रभावी मार्ग योजून साम्राज्यशाही उध्वस्त करावयाची हें पहिलें काम. त्या बरोबरच शहरांत आणि खेड्यांत स्वतंत्र सरकारचें घटक निर्माण करावयाचें आणि बाहेरच्या हल्ल्यापासून त्यांचें संरक्षण करावयाचें हें दुसरें काम. स्थानिक आणि प्रादेशिक घटकांचेंच रूपांतर पुढें स्वतंत्र, लोकसत्ताक हिंदुस्तानांत झालें पाहिजे. सहाजिकच यासाठीं ब्रिटिश सत्तेबरोबर सर्व प्रकारचा असहकार पुकारावा लागेल. कॉंग्रेस मंत्र्यांनीं सरकारी यंत्रणेचा उपयोग करून दिलेल्या लढ्याचा समावेश यांत होवूं शकतो. तसाच सार्वत्रिक संपाचाहि होवूं शकतो. शेतकऱ्यांनीं जमीनदारांच्या जमिनींचा ताबा घेणें, संस्थानी प्रजेनें संस्थानिकांच्या जुलमाविरुद्ध चळवळ करणें इ. कार्यक्रमाचा अंतर्भाव या असहकारांत होवूं शकेल. ४२ सालीं आणि त्यापूर्वी झालेल्या सर्व लढ्यांपेक्षां आगामी लढ्याचें वैशिष्ट्य माझ्यामतें हें राहील कीं, यावेळीं जबाबदार अशी स्थानिक आणि प्रादेशिक हुकूमत निर्माण होवून पुढील सर्व जबाबदाऱ्या

र्ढाच आपल्या हिमालयावर पाहूं लागेल. या कल्पनेचें आणखी स्पष्टीकरण करून सांगता येईल, परन्तु तिचें स्थूल स्वरूप ध्यानांत येण्याचें दृष्टीनें वरील विवेचन पुरेसें आहे असें मला वाटतें.

हें चित्र नजरेसमोर ठेवून मी आपल्या आजच्या कार्यक्रमाची दिशा दाखविण्याचा यत्न करणार आहे.

आपण वर पाहिलेंच आहे कीं, स्वातंत्र्य संग्रामाची तयारी करणें हें आपल्यापुढील तातडीचें उद्दिष्ट आहे. या तयारीसाठीं निरनिराळ्या प्रकारचीं कामें हातीं घ्यावीं लागतील. अर्थातच त्यापैकीं कांहींची चर्चा मला याठिकाणीं करतां येणार नाहीं.

## कार्यकर्ता

परंतु प्रत्यक्ष कार्याची चर्चा करण्यापूर्वीं कार्यकर्त्यासंबंधीं मला दोन शब्द सांगितले पाहिजेत. आजचें आपलें सर्वांत महत्वाचें कार्य कोणतें असा प्रश्न जर मला कोणी विचारला तर, **कार्यकर्ते निवडणें आणि त्यांना तयार करणें हें होय** असेंच मी म्हणेन. आपल्या लढ्याची प्रचारात्मक अवस्था कधींच मागें पडली आहे. आज आपण प्रत्यक्ष क्रांतीच्या अवस्थेंतून जात असून सत्ता हातीं घेण्याचें कार्य यावेळीं आपणांस करावयाचें आहे. युद्धापूर्वीपेक्षां अगदीं निराळ्या तऱ्हेचे काँग्रेसजन आणि पक्ष सभासद आज आपल्याला हवे आहेत. आजच्या क्रांतिकारकाला नुसतें प्रचारकार्य करतां येवून भागणार नाहीं, तर प्रामुख्यानें संघटनेच्या भाषांतहि तो वाकबगार पाहिजे, विधायक आणि इतर सर्व प्रकारचें कार्यहि त्याला असलें पाहिजे; क्रांतिकारी संघटना आणि जेथें तो काम

करीत असेल तेथील जनता यांच्यामधील दुवा जोडण्याचें काम त्यानें प्रभावीपणें केलें पाहिजे. आपली क्रांतिकारी भावना तो जनतेपर्यंत पोहोंचवील इतकेंच नव्हे तर, क्रांतीमध्यें त्या जनतेचें नेमकें स्थान आणि जबाबदारी-कोणती तेंहि तो पटवून देईल. कार्यकर्ता हा प्रामाणिक, निर्भय, शिस्तबद्ध आणि मेहनती हवा. प्रत्येक कार्यकर्ता सर्व प्रकारचीं कामें बजावूं शकणार नाहीं. म्हणून सर्वसामान्य शिक्षणाबरोबरच कार्यकर्त्यांची आवड आणि लायकी लक्षात घेवून निवडक कार्यकर्त्यांना कामगार संघटन, खेड्यांतील कार्य, छपाई आणि प्रचार वगैरे निरनिराळ्या कामासाठीं खास शिक्षण दिलें पाहिजे.

आपला देश अतिशय विस्तीर्ण असल्यामुळें कित्येक वेळीं मध्यवर्ति केंद्रांना निरनिराळ्या क्षेत्रांत काम करीत असलेल्या कार्यकर्त्यांना सूचना पाठविणें कदाचित शक्य होणार नाहीं. म्हणून ऐनवेळीं कशा तऱ्हेनें वागावयाचें त्याचें शिक्षण स्थानिक पुढाऱ्यांना देणें जरूर आहे.

हें शिक्षण प्रत्यक्ष कार्य आणि अभ्यासक्रम व चर्चा या दोहोंच्या मार्फत दिलें पाहिजे. शिक्षणासाठीं तात्पुरतीं किंवा कायम स्वरूपाचीं शिक्षण शिबिरें ठिकठिकाणीं उघडलीं पाहिजेत. यासाठीं शिक्षक आणि वाङमय यांची जरूरी आहे.

यानंतर आपण प्रत्यक्ष कार्यक्रमाकडे वळूं या. चर्चेच्या सोयीसाठीं याठिकाणीं ज्याचा उहापोह करतां येणें शक्य आहे अशा कामाचें मी दोन भाग पाडणार आहे. एक सर्वसाधारण आणि

मार्गदर्शन मिळत गेलें तरच, काँग्रेस कमेट्या कार्यक्षम होवूं शक-तील हें उघड आहे. प्रांतिक आणि अ.भा.काँ. कमेटींनी स्थानिक कमेट्यांना वेळोवेळीं आदेश दिले पाहिजेत आणि ठराविक वेळात पार पाडण्यासाठीं कांहीं कामें नेमून दिलीं पाहिजेत. उदाहरणार्थ विशिष्ट पहाणी करणें, अस्पृश्यता निवारण किंवा जातीय ऐक्य या कार्यासाठीं मोहीम काढणें वगैरे कामें प्राथमिक काँग्रेस कमेट्याकडून करवून घेता येतील. वरिष्ठ कमेट्यानीं नियमितपणें निघणाऱ्या पत्रकांच्या द्वारा कार्यकर्त्यांच्या मार्गदर्शनार्थ निरनिराळ्या विषयावर टिपणें सादर केलीं पाहिजेत. त्याचप्रमाणें अन्य स्वरूपाचें वाङमय प्रसिद्ध करून त्यांना त्यांच्या दैनंदिन कार्यांत मदत केली पाहिजे. त्यायोगें त्यांच्या अडचणी दूर करण्याची खटपट करता येईल. या कमेट्यांनीं संशोधन कार्य हातीं घ्यावें; तसेंच राजकीय योजना आखाव्यांत. वर दिलेला किंवा मी खाली देत असलेला कार्यक्रम सर्व काँग्रेसलाच हातीं कां घेतां येवूं नये तें मला समजत नाहीं. तथापि वरिष्ठ कमेट्या कधीं काळीं तरी हें कार्य हातीं घेतील कीं नाही याची मला शंकाच आहे. तोंपर्यंत ज्याठिकाणी काँग्रेस कमेट्या मार्फत कार्य करणें आपल्याला शक्य असेल तेथें आपण वर दिलेला सर्वच्या सर्व कार्यक्रम त्यांच्या मार्फत पुढें रेटण्याची धडपड केली पाहिजे. परंतु ज्याठिकाणीं तें शक्य होणार नाहीं तेथें पक्ष शाखेच्या मार्फत हा कार्यक्रम आमलांत आणला पाहिजे, आणि असें करतांना पक्ष शाखांनीं इतर सर्व सच्चा कार्यकर्त्यांचें सहकार्य मिळविण्याचा यत्न

सर्वसाधारण कामाच्या इतर प्रकारांकडे वळण्यापूर्वी सर्व-साधारण काम म्हणजे काय त्याचा खुलासा केला पाहिजे. वर आपण पाहिलेंच आहे कीं, ज्याच्यासाठीं खास प्राविण्य मिळविण्याची जरूर आहे असें काम हें आपल्या समाजातील निरनिराळ्या गटां-पुरतें किंवा वर्गांपुरतें मर्यादित असतें. परंतु ज्यावेळीं आपण एकाद्या क्षेत्रातील (उदा. शहर किंवा खेडें किंवा शहरातील एकादी पेठ,) सर्वच्या सर्व नागरिकांसाठीं कांहीं काम करण्याचें योजतों त्यावेळीं त्या कामाला सर्वसाधारण कार्य असें म्हणतां येईल. उलट त्या खेड्यात आपण किसान सभा स्थापन केली, किंवा शहरांत काम-गार संघ काढला तर तें खास काम होईल. परंतु सर्वच्या सर्व खेडें किंवा शहर आपण आपल्या कामाच्या कक्षेत आणलें तर तें सर्व-साधारण काम झालें.

## खेड्यातील कार्य

प्रथम आपण खेड्यांतील कामाकडे वळूं. याबाबतींत आपलें अंतिम उद्दिष्ट काहीं ठराविक मुदतीनंतर——सहा महिने म्हणा——ग्रामराज्य स्थापन करणें हें असलें पाहिजे. ग्रामराज्य स्थापन करणें म्हणजे नुसती ग्रामपंचायत स्थापन करणें नव्हे. ते खेडें स्वयंशासित झालें पाहिजे. हें ग्रामराज्य सरकारी यंत्रणेवर आधारलेलें असतां कामा नये. तें गांवकऱ्यांनीं आपण होवून प्रस्थापित केलें पाहिजे. माझ्या डोळ्यासमोर असलेलीं ग्रामराज्यें परकीय सत्ता अनावश्यक ठरवतील आणि क्रांतिकाळांत लढ्याचीं व प्रतिकाराचीं केंद्रें बनतील. त्याचप्रमाणें ज्याची परिणति पुढें हिंदी लोकराज्यांत आपण करूं

इच्छितो त्या लोकराज्याचे ते घटक ठरतील.

ग्रामराज्य स्थापन करण्यापूर्वी त्या खेड्यांत फार मोठ्या प्रमाणावर विधायक कार्य करावें लागेल. त्यासाठीं खालील प्रकारची कामें मी सुचवीत आहे.

१) कॉंग्रेस सभासद नोंदणीः खेड्यांतील प्रत्येक प्रौढ नागरिकाला सभासद करून घेण्याचा प्रयत्न करावा. नोंदविलेल्या सभासदांच्या बैठका घेणें, ध्वज वंदन.
२) सांस्कृतिक केंद्र सुरू करण्यांत यावें. त्याठिकाणीं वर्तमानपत्रें वाचणें, प्रौढ साक्षरता, लोकनाट्य, संवगीतें, अभ्यासमंडळ, वाचनालय, भिंती पत्रिका, शेतीविषयक सल्ला देणें वगैरे कामें व्हावीत.
३) सेवादल आणि व्यायामशाळा.
४) सफाई, रस्ते, बंधारे वगैरे प्रश्न व्यवहारी दृष्टीनें सोडविण्याचा प्रयत्न करावा. समान उद्दिष्टासाठीं सामुदायिक श्रम करण्यास उत्तेजन यावें.
५) अस्पृश्यता निवारण.
६) जातीय ऐक्य.
७) दारूबंदी.
८) पहाणी करणें.
९) तक्रार निवारण.
१०) धान्य कोठारांची स्थापना.
११) शेजारच्या खेड्यांतून प्रचार.

१२) सहकारी खरेदी विक्री.

१३) स्त्रिया व मुलें यामधील कार्य.

ज्या खेड्यात तळमळीच्या आणि निष्ठावंत कार्यकर्त्यांनें अशा-तऱ्हेचें काम करून तेथील खेडुतांचें संपूर्ण सहकार्य मिळविलें असेल त्या ठिकाणीं कांहीं महिन्यात ग्रामराज्याची स्थापना करणें शक्य होईल. त्याचप्रमाणें अशा खेड्यातून सहकारी शेती आणि सहकारी पद्धतीवर आधारलेले इतर पूरक उद्योगहि सुरू करता येतील.

या कामासाठीं अर्थातच अत्यंत कुशल असे कार्यकर्ते हवेत, आणि सध्येनें ते कितीहि असले तरी पाहिजेच आहेत हें कार्य थेट हिंदुस्तानच्या आर्थिक, राजकीय आणि सामाजिक जीवनाशी भिडणारें असून त्याचें स्वरूप अत्यंत क्रांतिकारी आणि विधायक असें आहे.

शहरांतील कामासंबंधीं देखील माझ्या अशाच कल्पना आहेत. शहरातील मोहल्ल्यामोहल्ल्यातून आपण काम सुरू केलें पाहिजे. खेड्याप्रमाणेंच शहरांतील मोहल्ल्यांतूनहि एक किंवा अनेक केंद्रें स्थापन करून आपल्याला काम करता येईल. मात्र शहरी जीवनामुळें जे प्रश्न निर्माण होतात त्यांच्या अनुरोधानें त्यात अर्थातच थोडाफार बदल करावा लागेल. हें कार्य करीत असताना शहरांतील गरीब वस्तींतील नागरिकांच्यातच काम करण्याची विशेष दक्षता घेतली पाहिजे त्यांना उपयुक्त ठरतील अशा संघटना, शैक्षणिक प्रचार आणि सेवेचीं साधनें शोधून काढलीं पाहिजेत. विद्यार्थी काँग्रेस-मधील कार्यकर्त्यांचें या कामीं सहकार्य मिळविलें पाहिजे.

या कार्यक्रमाचें स्वरूप अधिक विषद करून सांगणें शक्य आहे, परन्तु वर केलेल्या विवेचनावरून पुरेशी कल्पना सहज येवूं शकेल. स्थानिक प्रयत्न आणि वेळोवेळीं येणारे अनुभव जमेस धरून त्यांत इष्ट ते फेरबदल करतां येतील. मी माझे विचार तुमच्यापुढें ठेवले आहेत आणि तुम्हाला ते उपयुक्त वाटतील अशी मला आशा आहे.

हें पत्र पुरें करण्यापूर्वी आपल्या मुख्य क्रांतिकारी उद्दिष्टाकडे मी तुमचें लक्ष वेधूं इच्छितों. एकच काम निरनिराळ्या तऱ्हेनें आणि निरनिराळे उद्देश डोळ्यापुढें ठेवून करतां येतें हें विसरतां कामा नये. कोठलेंहि काम करीत असतांना आपलें उद्दिष्ट आपण नजरेआड होवूं देतां कामा नये. आणि क्रांतीचें साधन म्हणून आपल्या कामाचा आपल्याला उपयोग करून घ्यावयाचा आहे हें सदैव ध्यानांत ठेवलें पाहिजे.

२८ जुलै १९४६

# समाजवादी पक्ष–कम्यूनिस्ट आणि रशिया

[ कानपूर येथें भरलेल्या पक्षाच्या परिषदेपुढें जो प्रबंध ठेवण्यांत आला त्यापैकी हा एक भाग असून तो श्री. जयप्रकाशजींनी लिहिलेला आहे. ]

पक्षाच्या फैजपूर प्रबंधांतहि पक्षानें समाजवादी एकजुटीवरील आपला विश्वास प्रकट केला होता. समाजवादी एकजूट म्हणजे मुख्यत्वेंकरून समाजवादी पक्ष आणि हिंदी कम्यूनिस्ट पार्टी यामधील ऐक्य असाच अर्थ त्यांत अभिप्रेत होता. रामगड कॉंग्रेसपर्यंत म्हणजे १९४० च्या मार्चपर्यंत समाजवादी ऐक्याचें हें धोरण चालू होतें. परंतु रामगड येथें भरलेल्या राष्ट्रीय कार्यकारिणीच्या बैठकींत कम्युनिस्टांची हकालपट्टी करण्याचा निर्णय घेण्यांत आला आणि तेव्हांपासून एकजुटीचें धोरण बदलण्यांत आलें. कम्युनिस्टांना एकजूट नको असून कॉ. स. पक्षांत फूट पाडून अखेरीस तो विसर्जन पावावा यासाठीं त्यांची धडपड चाललेली आहे असें अनेक वर्षांच्या अनुभवानंतर दिसून आल्यामुळेंच वरील निर्णय घेण्यांत आला. कम्यूनिस्ट स्वतःच्या पार्टीव्यतिरिक्त इतर कोठल्याहि पक्षाला क्रांतिकारी अथवा समाजवादी मानावयास तयार नसतात. त्यामुळें अन्या पक्षांवर कबजा करण्याकरतां किंवा ते मोडून टाकण्याकरतां

तेथें चंचुप्रवेश मिळविण्याचें एक साधन इतकाच त्यांच्या दृष्टीनें एकजुटीचा अर्थ असतो. त्यामुळें कम्युनिस्टांबरोबर एकजूट होणें कदापीहि शक्य नाहीं.

युद्धामुळें कम्यूनिस्ट पार्टीबरोबर एकजूट किंवा सहकार्य घडून येण्याच्या मार्गांत आपखोहि मूलभूत अडचणी कशा आहेत त्यांचें चांगलें प्रत्यंतर आलें. जगांतील सर्वच कम्यूनिस्ट पक्षांवर रशियन सरकारचा संपूर्णपणें ताबा असतो याची अस्पष्ट जाणिव पूर्वीहि आली होती. परंतु युद्धकाळांत तें अधिकच स्पष्ट झालें. सर्व ठिकाणचे कम्युनिस्ट पक्ष त्या सरकारच्या धोरणाबरहुकूम आपलें धोरण ठरवितात आणि कम्यूनिझमच्या सिद्धान्ताच्या नावावर त्या सरकारचे हुकमी पंचमस्तंभी म्हणून कामें करतात. इतर देशांतील कम्युनिस्टांप्रमाणेंच आपल्या देशांतील कम्युनिस्टांची गणनाहि अनेकदा डाव्या गटांत केली जाते. परंतु खरें म्हणजे ते डावेहि नाहींत आणि उजवेहि नाहींत. ते केवळ रशियन राष्ट्रवादी आहेत, आणि रशियाच्या धोरणांत बदल झाल्याबरोबर ते खुशाल या टोंका-पासून त्या टोंकापर्यंत हेलकावे खातात! ब्रिटिशांना त्यांनी पाठिंबा दिला काय, किंवा त्यांच्या विरुद्ध आघाडी उभी केली काय, पाकि-स्तानी झेंड्याखाली ते गोळा झाले काय, किंवा त्याला त्यांनी विरोध केला काय, त्यांनी काँग्रेसमध्यें प्रवेश केला काय, किंवा ते काँग्रेस बाहेर पडले काय, यापैकी कशाच्याच मागें मार्क्सवादाची किंवा हिंदी कामगार वर्गाचें हित साधण्याची त्यांची दृष्टी नसते. या सर्व

 सुलट भूमिका स्वीकारताना त्यांच्यापुढें एकच दृष्टी असते

आणि ती म्हणजे रशियानें चालविलेलें सत्तेचें राजकारण उचलून धरण्याची.

समाजवादी पक्ष आणि कम्यूनिस्ट पार्टी यांच्यात तिसरा मूलभूत फरक असा आहे कीं, समाजवादी पक्षाला लोकशाही समाजवादाची प्रस्थापना करावयाची आहे तर, कम्यूनिस्ट पार्टीचे उद्दिष्ट हुकूमशाही कम्यूनिझमची निर्मिति करणें हें आहे. समाजवाद्यांना कामगार लोकशाही किंवा शेतकरी कामकरी राज्य स्थापन करावयाचें आहे तर, कम्युनिस्टांना त्यांच्या पक्षाची एकतंत्री हुकूमत देशांतील शेतकरी कामकऱ्यांवर लादावयाची आहे. ज्या पक्षाची ध्येयें इतकीं विभिन्न आहेत, त्यांच्यात कोठल्याहि प्रश्नावर एकवाक्यता असूंच शकणार नाही.

कम्यूनिस्ट पार्टीची विचारसरणी ही अशा प्रकारची असल्यामुळे तिच्या बरोबर एकजूट अथवा सहकार्य कधींहि होवू शकणार नाहीं.

## रशिया

कम्यूनिस्ट पार्टी रशियाची पंचमस्तंभी आहे अशी टीका केली म्हणजे आम्ही रशियालाच विरोध करीत आहोंत अशी समजूत कम्यूनिस्ट करून घेतात व समाजवादी पक्ष रशिया विरोधी आहे असा ओरडा ते करूं लागतात. कम्युनिस्टांच्या तोंडाला कोण हात लावणार ! परंतु समाजवादी पक्ष मात्र असें जाहीर करीत आहे कीं, तो रशिया विरोधी तर नाहींच उलट रशियाचा तो मित्र आहे पक्षाचा असा दृढ विश्वास आहे कीं, स्वतंत्र हिंदुस्ताननें रशिया-

बरोबर अत्यन्त सलोख्याचे संबंध ठेवणें हेंच देशाच्या हिताचें आहे. हा सलोखा घडून येण्यासाठीं पक्ष सतत प्रयत्न करीत राहील. परंतु त्याचबरोबर पक्ष हेंहि जाहीर करूं इच्छितो कीं, ही मैत्री संपूर्ण समानतेवरच आधारलेली असली पाहिजे. स्वतंत्र हिंदुस्तान आपल्या प्रश्नांत कोठल्याहि देशानें—मग त्याबरोबरचे संबंध किती का मित्रत्वाचे असेनात—केलेले हस्तक्षेप सहन करणार नाहीं.

त्याचप्रमाणें पक्ष हेंहि स्पष्ट करूं इच्छितो कीं, रशियानें नियोजन आणि राष्ट्रीय ऐक्य याचे बाबतींत फार मोठी कामागिरी बजावली आहे. आणि रशियाच्या प्रश्नाच्या बाबतींत इतरानी हस्तक्षेप करता कामा नये हें पक्ष मान्य करीत असला तरी, रशियांतील यशापयशापासून जरूर ते धडे घेणें समाजवादी चळवळीच्या दृष्टीनें आवश्यक आहे असें पक्षाचें मत आहे.

६ एप्रिल १९४७

# स्वातंत्र्याच्या मार्गांतील अडचणी

[ कोइमतूर जिल्हा कापड कामगार परिषदेच्या अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणांतील उतारा. ]

आजच्या घडामोडीचा हिंदी कामगार वर्गाच्या भवितव्यावर जबरदस्त परिणाम घडून येणार आहे. आज आपण अत्यंत बिकट परिस्थितींतून जात आहोंत. आणि जी क्रांतिकारी स्थित्यंतरें आज घडून येत आहेत, त्यामध्यें कामगार वर्गाचा फार मोठा वाटा उचलावा लागणार आहे.

ज्या स्वातंत्र्यासाठी गेलीं दहा वर्षें आपण लढा देत आलों आहोंत तें स्वातंत्र्य आतां अगदीं नजीक आलें आहे. कांहीं आठवड्यापूर्वीं ब्रिटिशांनीं अशी घोषणा केली कीं, जून १९४९ पर्यंत ते हिंदी लोकांच्या हातीं सत्ता सुपूर्द करतील. या घोषणेंत अनेक धोके संभवतात. ब्रिटिशांच्या प्रामाणिकपणावर आपण विश्वास ठेवावा असें आपले पुढारी सांगत आहेत. परंतु याठिकाणीं प्रामाणिकपणाची भाषा अप्रस्तुत होय. कारण वैयक्तिक नीतिमत्ता आणि सामुदायिक किंवा राष्ट्राची नीतिमत्ता यांत तफावत असते.

ऐतिहासिक परिस्थितीमुळेंच ब्रिटिशांना हा निर्णय घेणें भाग पडत आहे. ब्रिटिश सरकार आणि ब्रिटिश जनता यांच्यापुढें जे

दोनच पर्याय आहेत. एक तर हिंदुस्तानबरोबर शांततेच्या मार्गानें तडजोड करून याठिकाणीं गुंतलेल्या त्याच्या आर्थिक आणि राजकीय हितसंबंधापैकीं कांहीं भाग तरी सुरक्षित राखणें किंवा आणखी एका क्रांतीला तोंड देणें. पैकीं क्रांतीला तोंड देण्याची ब्रिटनची आज तयारी नाहीं.

## नवी जागृती

१९४२ च्या क्रांतीनंतर हिंदी जनतेंत नवी जागृति निर्माण झाली आहे. त्या क्रांतीमध्यें कामगार वर्गानें फार मोठा भाग घेतला होता. १९३९ पेक्षा जनतेची आजची मनःस्थिति अगदी निराळी आहे. आणि आपल्यापेक्षांहि ब्रिटिश सरकारला त्याची जास्त जाणीव आहे नेताजी सुभाषचंद्र बोस यांच्या उज्वल नेतृत्वाखालीं आग्नेय आशियातील देशभक्तांमधून जें सैन्य उभारण्यांत आलें त्या सैन्यानें या देशांत नवी आशा आणि नवें जीवन प्रफुल्लित केलें असून हिंदी जनतेला एक नवा रस्ता त्यानें खुला करून दिला आहे. सर्व जगांत जीं स्थित्यंतरें झपाट्यानें घडून येत आहेत, त्यामुळें ब्रिटिश सरकारचा पायाच हादरूं लागला आहे. सरकारचीं सशस्त्र दलेंहि आतां इंग्लंडशीं एकनिष्ठ राहिलेलीं नाहींत. देशांतील आणि देशाबाहेरील सैन्यांत एकप्रकारची बंडखोर वृत्ति पसरूं लागली आहे.

१९४२ च्या क्रांतीनें आपली प्रतिष्ठा वाढविली आहे. एका बाजूला हिंदुस्तानची ताकद आणि सत्ता वाढली आहे तर, दुसऱ्या बाजूला ब्रिटिश साम्राज्याची किंमत घटत आहे. ब्रिटिशांचें येथील सपुष्टांत आलें असून केवळ ' हिंद छोडो 'चीच नव्हे

तर, 'आशिया छोडो 'ची घोषणाहि सर्वत्र घुमू लागली आहे. ब्रिटन आपली शक्ति आजमावून पहात आहे. एक तर त्यानें शांततामय सत्तादानाची तयारी दाखविली पाहिजे, नाही तर क्रांतीला तोंड दिलें पाहिजे अशा तऱ्हेचे उद्गार भारतमंत्रि श्री. पेथिक लॉरेन्स यानीं पार्लमेन्टमधील आपल्या भाषणात काढल्याचें प्रसिद्ध झालें आहे. इंग्लंडच्या सुदैवानें आपल्या पुढाऱ्यानीं मात्र अनेक कारणामुळें तडजोडीचाच मार्ग पसंत केला आहे. त्रिमंत्रि शिष्टमंडळ ज्यावेळीं हिंदुस्तानात आलें होतें, त्यावेळीं त्या मार्गांतील धोके दाखवून देऊन लढ्याच्या मार्गाचा अवलंब करण्याची विनंती आम्ही आपल्या पुढाऱ्यांना केली होती. तो मार्ग जर स्वीकारला गेला असता तर, ब्रिटिशाना जून १९४८ च्या कितीतरी आधी हिंदुस्तान सोडावा लागला असता. मग आपल्याला इतके दिवस वाट पाहाण्याची किंवा प्रतिगामी शक्तींशीं तडजोड करण्याचीहि जरूर पडली नसती.

या मार्गानें आर्थिक सवलती आणि आरमारी व हवाई तळ आपल्याला मिळू शकतील अशी इंग्लंडची अपेक्षा आहे. त्याचे काहीं सैन्य ते येथें ठेवूं शकतील असेंहि त्याना वाटतें. या देशात त्यांना त्याचें वर्चस्व असलेले काहीं टापू निर्माण करावयाचे आहेत. आणि त्यासाठींच त्यानी तडजोडीचा एवढा आटापीटा चालविला आहे.

कॉंग्रेसनें क्रांतिकारी लढ्यामधून सत्ता हस्तगत केली असती तर, ब्रिटिशाचें हें वर्चस्व अजिबात नष्ट झालें असतें. परन्तु हाच

तर ब्रिटिशांचा कावा आहे.

## अखंड भारत

ज्या प्रांतांचा कारभार कॉंग्रेस मंत्रिमंडळांच्या हातीं आहे, आणि ज्याठिकाणीं राष्ट्रीय भावना तीव्र आहे, युवक चळवळी आणि किसान कामगारांच्या संघटना मजबूत आहेत, ते भाग जून १९४८ ला निश्चित स्वतंत्र होतील. परंतु पंजाब, बंगाल किंवा संस्थानांतील आपली कमजोरी आणि फाटाफूट यांचा फायदा घेऊन तेथें आपली पकड कायम ठेवण्याचा प्रयत्न ब्रिटिशांकडून केला जाण्याचा संभव आहे. त्या भागांत ते आपले टापू निर्माण करूं पाहतील. तसें झालें तर, संपूर्ण स्वातंत्र्याच्या संग्रामाला त्या भागांत तोंड फुटेल. म्हणून संस्थानी जनतेची चळवळ इतकी प्रखर झाली पाहिजे कीं, कोणत्याहि संस्थानिकाला ' मला परकीयांची मदत घेता येईल ' असें म्हणण्याची छाती होता ... हैद्राबादचा निजाम

मिळणार नाहीं याची दक्षता आपण घेतली पाहिजे.

जे प्रांत घटना समितीनें तयार केलेली घटना मान्य करतील ते स्वतंत्र होतील. इतर प्रांतांना ब्रिटिशांच्या वर्चस्वाखालीं रहावें लागेल. हें आपण मान्य केलें तर, हिंदुस्थाननें संपूर्ण स्वातंत्र्य संपादन केलें आहे असें आपल्याला मुळींच म्हणता येणार नाहीं. त्यामुळें ब्रिटिश-विरोधी लढ्यालाच अखंड हिंदुस्तानसाठीं कराव्या लागणाऱ्या लढ्याचें स्वरूप प्राप्त होतें.

## हितविरोध

मद्राससारख्या प्रांतांतील जनतेला यापेक्षा अगदीं निराळी जबाबदारी पार पाडावी लागणार आहे. त्यांनीं आतापासूनच आपण स्वतंत्र झालों आहोंत असें समजून वागावयाला सुरवात केली पाहिजे. राजकीय सत्तेचीं सूत्रें जनतेच्या हातात जातील अशी दक्षता त्यांनीं घेतली पाहिजे. राष्ट्रीय क्रांतीची अवस्था त्यांनीं पार पाडली असून आतां सामाजिक क्रांतीच्या कार्यास त्यांनीं लागलें पाहिजे. अशा प्रांतांतील सत्ता जमीनदार किंवा भांडवलदार यांच्यासारख्या मूठभर लोकांच्या गटाच्या किंवा वर्गाच्या हातीं जातां कामा नये. तसें होणें फार धोक्याचें ठरेल. ब्रिटिश ज्यावेळीं सत्ता सोडतील त्यावेळीं ती शेतकरी, कामगार आणि मध्यमवर्ग—कारण या देशांतील मध्यमवर्गहि श्रमजीवीच आहे—यांच्याच हातीं आली पाहिजे.

जे लोक ४२ सालीं काँग्रेसच्या वाऱ्यालाहि उभे रहात नसत, इतकेंच नव्हे तर, काँग्रेसचें नाव उच्चारण्याची देखील ज्यांना भीति वाटत असे, तेच लोक आतां काँग्रेसच्या हातीं सत्ता आली

आहे असें पाहताच एकदम खादीचे कपडे अंगावर चढवून आणि मोटारीवर राष्ट्रीय निशाणें लावून दिल्लीतील आपल्या पुढाऱ्याभोंवतीं गोंडा घोळूं लागले आहेत.

आपल्या पैशाच्या जोरावर काँग्रेस ताब्यांत घेण्याच्या ते खटपटींत आहेत, आणि १९४८ पूर्वी त्यांना हें घडवून आणावयाचें आहे. त्याचा हा डाव साधणार नाहीं अशी माझी अपेक्षा आहे. परंतु समजा, ते विजयी झाले तर आपल्या राष्ट्रीय संघटनेची काय अवस्था होईल ?

लढाऊ संघटना आणि सत्ताधारी पक्ष या काँग्रेसच्या दोन स्वरूपात महदंतर आहे. जोपर्यंत काँग्रेस ही लढाऊ संघटना होती, तोपर्यंत श्रीमंतापासून गरीबापर्यंत सर्वांना तिच्यात स्थान होतें. परंतु सत्ता हातीं आल्यापासून एक सत्ताधारी पक्ष एवढेंच तिचें स्वरूप बनलें. व त्यामुळें तिचें पूर्वीचें लढाऊ स्वरूप आतां टिकूं शकणार नाहीं अशी परिस्थिति निर्माण झाली. आपल्या सभासदातच हित-विरोध आहेत, याकडे काँग्रेसला दुर्लक्ष करून चालणार नाहीं. काँग्रेसनें जर गिरणीवाल्याची बाजू घ्यावयाची ठरविलें तर, त्याचवेळीं तिला कामगाराच्या बाजूनें कसें उभें राहतां येईल ? जमीनदार आणि त्यांचीं कुळें याचे हितसंबंधहि असेच परस्पर विरोधी असतात. त्यामुळें काँग्रेसनें काय तो निर्णय घेतला पाहिजे. सत्ताधारी पक्षाचें स्वरूप प्राप्त झाल्यानंतर भाडवलदार आणि कामगार याना आपले दरवाजे सारखेच उघडे आहेत असें काँग्रेसला म्हणता यावयाचें नाहीं. सत्तेसाठीं काँग्रेसमध्यें जी स्पर्धा सुरू झाली आहे त्याचा

शेवट अखेर कसा होणार आहे कोणास ठाऊक !

## कॉंग्रेसचें विसर्जन करा

कॉंग्रेसच्या घटनेंत फेरबदल करण्यांत येणार आहेत. त्यांचा विचार करण्यासाठीं जी समिति नेमण्यांत आली आहे तिच्या बैठकीला मीहि हजर होतों. सध्या कॉंग्रेसची सभासद संख्या साठ लाख आहे. त्यापैकीं खादीधारी किती आहेत तें मी सांगूं शकणार नाहीं. परंतु कामगार सहसा खादी वापरीत नाहींत. खादीचा एखादा पंचा किंवा फार तर सदरा त्यांच्यापाशीं असूं शकेल. खादी वापरणें ज्यांना परवडूं शकते असे लोक कोणत्या वर्गांतील असतात ? काळ्या बाजारात सूत खरेदी करून खादी मिळविणें श्रीमंतानाच फक्त शक्य आहे. नव्या घटनेप्रमाणें मतदानाचा अधिकार फक्त त्यांनाच मिळणार आहे. खादीच्या अटीमुळें तरूण कार्यकर्त्यांना कॉंग्रेसमध्यें बहुमत करून घेणें अशक्य होणार आहे.

श्रीमंत लोकांनीं तर आजच कॉंग्रेसचा अधःपात करून टाकला आहे. हे कॉंग्रेसजन म्युनिसिपालिट्यांची आणि लोकल बोर्डांचीं कंत्राटें घेतात. खादी वापरणें त्यानाच शक्य आहे. आणि ते जहाल विचारसरणीच्या बाजूनें मतें देतील ही आशाच नको. आजची आपल्या देशाची आणि कॉंग्रेसची परिस्थिति एकंदर ही अशी आहे.

आपण आपल्या रक्ताचें पाणी करून वाढविलेली कॉंग्रेससारखी इतकी महान संघटना तत्वच्युत करणाऱ्यांच्या हातीं जावूं देण्यापेक्षां विसर्जित केलेली काय वाईट ! कॉंग्रेसनें हातीं घेतलेलें कार्य एकदा

तडीस गेल्यानंतर दिल्लीला नाहींतर वर्ध्याला एक मोठा समारंभ करून तिचें विसर्जन करून टाकावें. मांडवलदारांच्या अथवा अन्य एकाद्या गटाचें ती बाहुलें - बनता कामा नये. राष्ट्रीय झेंडा किंवा राष्ट्रीय संघटना असल्या शब्दांमागील भावनांनी जनतेला झुलवीत ठेवण्यासाठीं त्यांना तिचा उपयोग करूं देतां कामा नये. काँग्रेसचें स्वरूप स्पष्ट होवूं द्या. जरूर तर राजकीय आणि आर्थिक कार्यक्रमावर नवे पक्ष स्थापन करतां येतील. समाजवादी म्हणून नव्हे तर, वीस वर्षेंपर्यंत जिच्यासाठीं मी झीज सोसली त्या काँग्रेसचा एक सभासद म्हणूनच मी ही सूचना तेथें मांडली. सत्तेच्या राजकारणाची चिखलफेक इतक्या मोठ्या संघटनेत व्हावयास नको अशी माझी सूचना होती. आणि आपल्या कांहीं सर्वश्रेष्ठ पुढाऱ्यांचेंहि असेंच मत आहे. योग्य-वेळीं ते तें व्यक्त करतील. दरम्यान जून १९४८ पर्यंत जो अवधी मिळणार आहे, त्याचा हिंदुस्तानांतील समाजवाद्यांनी जनतेंत जागृति करण्यासाठीं उपयोग करून घेवून कामगार संघटना, किसान सभा वगैरेंच्या मार्फत तिची तांकद इतकी वाढविली पाहिजे कीं अखेर सत्ता तिच्याच हातीं जाईल.

## समाजवादी कार्यक्रम

समाजवाद्यांवरील जबाबदारीचा मी उल्लेख केला म्हणून तुम्ही कदाचित असें म्हणाल कीं, काँग्रेससारखी संघटना असतांना मी समाजवादी पक्ष निर्माण करण्याचा आग्रह कां धरतो ! माझ्या मतें काँग्रेस ही साम्राज्यशाहीविरोधी राष्ट्रीय आघाडी होती. एकदा मिळाल्यानंतर स्वातंत्र्य पोंचणारें किंवा सत्ता कोणाच्या हातीं

रहाणी असे प्रश्न उपस्थित होतात आणि त्याना तावडतोब उत्तरें हीं दिलीच पाहिजेत.

सरदार पटेल हे आम्हांला काँग्रेस सोडून जाण्याची विनंती करीत असतात. गेलीं पाच वर्षे ते आणि त्याचे मित्रच आम्हाला काँग्रेसमधून हाकलण्याची खटपट करीत होते परंतु इतकें असूनहि आम्ही काँग्रेसमध्यें राहिलों. आता मात्र आम्हीं एका नव्या अवस्थेप्रत येऊन पाहोंचलों आहोंत. आम्हाला आमच्या फायद्यासाठीं काँग्रेसच्या नावाचा उपयोग करून घेण्याची इच्छा नाहीं. आम्ही स्वतंत्र कार्यक्रम घेवून पुढें जाणार आहोंत, आणि यापुढें हिंदुस्तानातील सोशॅलिस्ट पार्टी स्वतःच्या नावावरच जनतेला आवाहन करणार आहे

सोशॅलिस्ट पार्टी ही तुमची पार्टी आहे. तो गरिबांचा पक्ष आहे स्वतंत्र्य मिळेपर्यंत आम्हीं प्राथमिक काँग्रेसजन म्हणूनच कार्य करूं. समाजवादी पक्ष हा गरीब जनतेचा पक्ष आहे. कामगारानी निर्माण केलेल्या संपत्तीचा उपयोग त्याना घेता आला पाहिजे असें आमचें म्हणणें आहे. आज गिरण्यावर मूठभर लोकाची मालकी आहे, त्याऐवजी त्या कामगाराच्या मालकीच्या केल्या पाहिजेत.

४ मे १९४७

## चलन वाढीवर ताडगा

[ समाजवादी पक्षाच्या मार्गदर्शनाखाली सामाजिक व आर्थिक क्षेत्रांत संशोधन कार्य करीत असलेल्या 'खोज परिषद' या संस्थे-मार्फत ता. २७-२८ व २९ ऑगस्ट १९४८ रोजीं कलकत्ता येथे चलनवाढीच्या प्रश्नाचा विचार करण्यासाठीं एक परिषद बोलावण्यात आली होती. त्या परिषदेचें उद्घाटन करताना जयप्रकाशजींनी केलेल्या भाषणातील हा उतारा आहे.]

चलनवाढीचा प्रश्न हा आपल्या देशापुढील सर्वांत निकडीचा असा प्रश्न आहे. या प्रश्नानें इतकें गंभीर स्वरूप धारण करण्याचीं चलन, भांडवली उत्पादन, विभजन अशीं अनेक कारणें आहेत परंतु त्यापैकीं उत्पादन विषयक कारणेंच अयत महत्वाचीं आहेत हिंद सरकारच्या आर्थिक व औद्योगिक धोरणामुळेंच उत्पादन क्षेत्रा पेचप्रसंग निर्माण झालेला असून आज हिंदुस्तानवर जें आर्थि आरिष्ट ओढविलें आहे त्याला उत्पादनांतील ही घटच कारणीभू आहे.

यंत्रसामुग्री पुरेशा प्रमाणांत मिळूं शकत नाहीं हें औद्योगि क्षेत्रांतील पेचप्रसंगाचें मुख्य कारण आहे. आज सर्व जगांतच वस्तु दुर्मिळ झाल्या आहेत हें खरें असलें तरी, हिंद सरकारनें

प्रश्नाकडे पुरेसें लक्ष पुरवून त्याबाबत खंबीर धोरण अवलंबिलें असतें तर, याबाबतींत आपल्या देशाची परिस्थिति खास सुधारूं शकली असती. आजपर्यंत आपला निर्यातीचा व्यापार खाजगी व्यापाऱ्यांच्या हातीं असून त्याबाबत सरकारने कोणतेंहि निश्चित असें धोरण ठरविलेलें नाहीं.

## निर्यातीच्या मालावर नियंत्रण

त्याचबरोबर औद्योगिक विकासासाठीं यंत्रसामुग्री मिळणें आवश्यक असूनहि सर्व देशभर आज जी लांचलुचपत बोकाळली आहे त्यामुळें सरकार त्या बाबतींत कांहीं करूं शकत नाहीं. कांहीं पदार्थांच्या निर्यातीबाबत हिंदुस्तानची परिस्थिति अत्यंत मोक्याची असूनही सरकार तिचा पुरेपूर उपयोग करून घेवूं शकलें नाहीं. सरकारनें आपल्या देशाची सर्व साधनसामुग्री उपयोगांत आणली असती, हिंदुस्तानला जे पदार्थ परदेशांतून आणावे लागतात त्यांची वेळींच एक यादी तयार करून आपलें धोरण आणि कार्यक्रम नेटानें पुढें रेटला असता तर, देशाची परिस्थिति एव्हांना पुष्कळ सुधारली असती. सरकारनें सर्व निर्गत व्यापार आतां आपल्या हातीं घेण्याची वेळ आली आहे. परंतु असें करीत असतांना ही कामगिरी पार पाडण्यासाठीं सरकारनें आपल्या खात्याव्यतिरिक्त स्वतंत्र अशी यंत्रणा उभी करून तिच्या हातीं याबाबतची सर्व सत्ता सोपविली पाहिजे.

## बड्या भांडवलदारांचा असहकार

बडे भांडवलदार थोड्याशा नफ्यावर संतुष्ट राहाण्यास तयार नाहींत हेंहि उत्पादनांतील घटीचें आणखी एक महत्वाचें कारण

आहे. नव्या नव्या उद्योगधंद्यांत मांडवल गुंतविण्याचें कामीं देशातील मोठमोठे भांडवलदार सरकारबरोबर असहकार करीत आहेत. कारण त्यांना सरकारकडून स्वतःसाठीं ज्यादा सवलती हव्या आहेत. या उद्योगपतींनीं आपलें कर्तव्य जर नीट पार पाडलें असतें तर, देशाची इतकी दुर्दशा झाली नसती. वस्तूंच्या किंमती आणि त्यावरील नफा यावर घालावयाच्या मर्यादाबाबत देशातील सर्व घटकाचें एकमत झाल्याखेरीज हा आर्थिक पेचप्रसंग गुण्यागोविंदानें सुटणें शक्य नाहीं. तसें एकमत झालें नाहीं तर देशात दंगेधोपे आणि क्रांतिकारी उठाव होण्याचा धोका मात्र उलट वाढेल.

हिंद सरकारनें आज प्रचंड योजना हातीं घेतल्या असून त्या पूर्ण होण्यास फार काळ लागणार आहे परंतु दुय्यम आणि छोट्या छोट्या धंद्याचा विकास करण्यासाठीं त्यांना साहाय्य देण्याची जरूर असतांना पुढारलेल्या पाश्चात्य देशाचें अनुकरण करून अशा तऱ्हेच्या प्रचंड योजनांना हात घालण्यात सरकारकडून चूक होत आहे.

## विकेंद्रित उद्योगधंदे

महात्मा गांधींनीं उद्योगधंद्यांच्या विकेंद्रिकरणावर भर देऊन त्या कार्यक्रमाचा जोरानें पुरस्कार केला. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, आज ज्यांच्या हातीं या देशातील अधिकाराचीं सूत्रें आहेत त्यांचा त्यावर फारसा विश्वासच नाहीं. हिंदुस्तानच्या आजच्या परिस्थितींत उद्योगधंद्यांचें विकेंद्रिकरण हाच एक आर्थिक अरिष्टांतून मार्ग काढण्याचा सर्वोत्तम पर्याय आहे. परंतु तोंडदेखली सहानुभूति दाखविण्याखेरीज सरकारकडून या दिशेनें कसलेहि प्रयत्न केले जात

नाहींत ही अत्यंत खेदाची गोष्ट होय.

छोट्या उद्योगधंद्यांचें स्वरूप, त्यांना लागणारा कच्चा माल आणि तंत्रविशारद, आणि बाजारपेठा यांचा बारकाईनें अभ्यास करून या धंद्यांना सुसूत्रपणें चालना देण्याच्या दृष्टीनें कांहीं महि-न्यात सरकारनें एखादी योजना तयार करावी अशी माझी सूचना आहे.

## अल्प मुदतीच्या योजना

शेती हाच आपल्या जनतेचा मुख्य आधार असून त्याबाबत मोठमोठ्या विकास योजना सरकारनें आखलेल्या असल्या तरी सत्ता घेतल्यापासून भरीव अशी कोणतीच कामगिरी सरकारनें बजावलेली नाहीं. सरकारनें अल्प मुदतीच्या योजना हातीं घेतल्या असत्या तर याहून चांगला परिणाम घडून आला असता. त्याचप्रमाणें कमी खर्चाच्या परंतु जास्तीतजास्त लोकांना फायदा मिळूं शकेल अशा कांहीं योजना हातीं घेतल्या असत्या तर, हजारों एकर जमीन लागवडीखालीं घेवून जनतेला अन्नधान्य मिळूं शकलें असतें. आणि 'अधिक धान्य पिकवा' मोहिमेसाठीं आज जो सदुसष्ट कोटी रुपयांचा चुराडा करावा लागत आहे त्याचीहि गरज भासली नसती.

## लांचलुचपत

लांचलुचपतीचा प्रश्नहि असाच अत्यंत गंभीर आहे. राज्य-कारभागत आमूलाग्र बदल घडवून आणल्याखेरीज आणि आज बोकाळलेली लाचखोरी समूळ नष्ट करण्यासाठीं खोलवरचे प्रयत्न झाल्याखेरीज सरकारची कोणतीहि योजना तडीस जाणें शक्य नाहीं.

सरकारला या चलनवाढीच्या गंभीर प्रश्नास हात घालण्याची खराखुरी तळमळ असेल तर, एक नवा सनदी नोकरवर्ग निर्माण करण्यांत आला पाहिजे. पुरेसें ज्ञान व प्रत्यक्ष कामाचा अनुभव असलेले आणि आजच्या सनदी नोकरांपेक्षां निराळीं ध्येयें असलेले असे कर्तबगार लोक या नोकरीसाठीं निवडले गेले पाहिजेत.

केवळ अशा तऱ्हेचें खातें सुरू करून भागणार नाहीं तर, देशांतील लाचलुचपतीचा संपूर्ण विमोड करणें हें राष्ट्रापुढील आद्य कर्तव्य मानलें गेलें पाहिजे. ही लांचलुचपत थांबविण्यासाठीं सरकारनें नवे कायदे केले पाहिजेत. त्याचप्रमाणें राज्यकारभारांत कोणी लांचलुचपत करतांना आढळल्यास सरकारनें अत्यंत कडक शिक्षा ठोठावाव्यात. हायकोर्ट आणि सुप्रीम कोर्टाच्या न्यायाधिशाची एक गुप्त चौकशी समिति नेमून तिच्याकडे लाचलुचपतीच्या प्रकरणांची चौकशी करण्याचे आणि गुन्हेगारांना शासन करण्याचे सर्व अधिकार सोपविण्यांत यावेत, आणि तिनें दिलेल्या शिक्षा या अखेरच्या समजण्यांत याव्यात. गृहखात्याला जोडूनच एका गुप्तखात्याची स्थापना करण्यांत येवून त्याच्याकडे सरकारी कचेऱ्यांत चाललेले लांचलुचपतीचे प्रकार उघडकीस आणून ते कायमचे बंद पाडण्याचेंच तेवढें काम सोंपविण्यांत यावें.

सर्व सरकारी नोकरांना प्रत्येक वर्षी किंवा दर दोन वर्षांनी त्यांच्या स्थावर आणि जंगम मालमत्तेचा तपशील जाहीर करण्यास लावावें. त्याचप्रमाणें एखादी मालमत्ता अनधिकृतपणें कोणी ताब्यांत घेतली असेल तर, त्याची चौकशी करण्याचा अधिकार सरकारनें

आपल्या हातीं घ्यावा. राज्यकारभारांतील लाचलुचपतीला आळा बसल्याशिवाय नियंत्रणें बसविलीं किंवा अन्य कितीहि उपाय योजले तरी चलनवाढ थांबू शकणार नाहीं.

कांहीं गोटांतून असें सुचविण्यांत येतें कीं, चलनवाढ विरोधी मोहिमेंत कामगारांनीहि वाटा उचलला पाहिजे. परंतु अद्यापहि आपल्या देशांतील कामगारवर्गाच्या प्राथमिक अडचणीदेखील दूर करण्यात आलेल्या नसल्यामुळें तो अत्यंत असंतुष्ट आहे. जीवन वेतन आणि घराची सोय या त्याच्या किमान मागण्याहि मान्य करण्यांत आलेल्या नाहींत.

### काटकसर

सरतेशेवटी सर्वांत महत्वाची गोष्ट म्हणजे, सार्वपणा. अनावश्यक बाबींवरील खर्च आणि उधळपट्टी यांना कात्री लावली पाहिजे. सक्तीची बचत आणि अनेक प्रकारें काटकसर करण्याचें धोरण अवलंबिण्यांत आलें पाहिजे. त्याचप्रमाणें नफ्यांतील बोनस किंवा इतर स्वरूपाचें व्याज, अशासारख्या बाबींवरील खर्च तहकूब करून तो नंतर केव्हांतरी देण्याची व्यवस्था केली पाहिजे.

जोपर्यंत आपल्या देशातील प्रत्येक व्यक्तीला याची जाणीव होत नाहीं कीं, आपल्याला स्वार्थत्याग करावा लागणार आहे आणि तो समप्रमाणांत करावा लागणार आहे, तोंपर्यंत आपल्याला या अरिष्टांतून पार पडतां यावयाचे नाहीं. इतकेंच नव्हे तर, इतकी किंमत देवून मिळविलेल्या स्वातंत्र्याचा उपयोगहि आपल्याला करून घेतां घेणार नाहीं.

आज देशावर ओढविलेलें आर्थिक अरिष्ट टाळून सौख्य आणि समृद्धि यांचें युग निर्माण करण्याकरतां आपलें सरकार कोणती उपाय योजना करतें तें पहाण्यासाठीं केवळ हिंदुस्तानचेच नव्हे तर साऱ्या आशिया खंडाचे डोळे दिल्लीकडे लागून राहिले आहेत.

२७ ऑगस्ट १९४८

# पुढारीपण घसरलें कोठें ?

नियोजित घटना समितींत कॉंग्रेसनें भाग घ्यावा या वर्किंग कमेटीच्या निर्णयाला पाठिंबा देणारा वर्किंग कमेटीचा ठराव २०४ विरुद्ध ५१ मतांनी पास झाला. ठरावाच्या बाजूनें इतकीं प्रचंड मतें पडावींत हें आश्चर्यकारक आहे. विशेषतः १९४२ चा लढा आणि हिंदुस्तानांत संचरत असलेलें नवचैतन्य लक्षांत घेतल्यावर तर, या घटनेचें अधिकच आश्चर्य वाटूं लागतें.

ठरावाच्या बाजूनें झालेलें मतदान हें देशाचें आणि विशेषतः कॉंग्रेसचें खरेखुरें प्रतिनिधिक आहे असें समजावयाचें कां ? मला तसें वाटत नाहीं. ज्यावेळीं दिल्लीला तडजोडीच्या वाटाघाटी चालू होत्या त्यावेळीं सर्व सामान्य माणूस त्याविषयीं साशंकच होता. त्याच्या परिणामावाबत त्याला अद्यापहि धास्तीच वाटत आहे. आणि पुष्कळवेळां सामान्यमाणसाचें व्यक्तीबद्दलचें किंवा परिस्थितीबद्दलचें निदान अचूक ठरतें.

कॉंग्रेसच्या मताविषयीं बोलावयाचें तर, सध्याच्या कॉंग्रेस कमेट्यांत बहुसंख्य कॉंग्रेसजनांच्या मताचें यथायोग्य प्रतिबिंब पडलेलें आढळत नाहीं. त्याचीं कारणें अनेक आहेत. परंतु याठिकाणी

ती चर्चा करणें अप्रस्तुत ठरेल.

तथापि मी इतकें मात्र निःशंकपणे म्हणूं शकतों कीं, काँग्रेसच्या निवडणुका योग्य प्रकारानें घेतल्या गेल्या असत्या तर, मागच्या अखिल भारतीय काँग्रेस कमेटींत ज्यांनी ठरावाच्या विरोधी मतें दिलीं त्यांच्याशीं नव्या काँग्रेस कमेटयांतील ५० टक्के समासद तरी सहमत होत असल्याचें आढळून आलें असतें.

काँग्रेसमध्यें सतत वाढत असलेल्या या गटाला यापुढें काँग्रेसमध्यें कांहीं स्थान उरणार आहे कीं नाहीं तें काळच ठरवील. परंतु या प्रश्नाच्या उत्तरावरच प्रामुख्यानें काँग्रेसचें भवितव्य अवलंबून आहे हें खास.

## याला उत्तर मिळालेंच नाहीं

अखिल भारतीय काँग्रेस कमेटींत झालेल्या वादविवादानें माझी फार निराशा झाली. विशेषतः विरोधकांना उत्तर देण्यासाठीं म्हणून मौलाना आझादांनीं जें भाषण केलें तें तर मला फारच निराशाजनक वाटलें. गांधीजींच्या भाषणानेंहि माझा अपेक्षाभंगच झाला. माझ्या निराशेचें कारण असें होतें कीं, वर्किंग कमेटीच्या बाजूचेंच नुसतें समर्थन न करतां, विरोधकांच्या टीकेला कोणी तरी उत्तर देईल अशी माझी अपेक्षा होती. परंतु आम्ही उपस्थित केलेल्या मुद्यांना उत्तरें देण्याचा कोणी मनापासून प्रयत्नच केला नाहीं असें मला आढळून आलें. आमच्या कांहीं विधानांची टर उडविण्यासाठीं आणि आम्ही जीं विधानें कधी केलींच नाहींत तीं खोडून काढण्यासाठीं आपल्याजवळचें शब्द भांडार खर्च करण्यांतच सर्वजण दंग होते.

वर्किंग कमेटीची बाजू सर्वांच्या परिचयाची आहे. आमचें म्हणणें असें होतें कीं, हिंदुस्तानची ताकद आज पूर्वी कधी नव्हती इतकी वाढली आहे. १९४२ च्या लढ्यामुळें जनमनांत क्रांति घडून आलेली आहे. आझाद हिंद फौजेमुळें देशांत नवी जागृति आणि आत्मविश्वास निर्माण झाला असून आज जनता क्रांतीला जितकी उत्सुक आहे, तितकी ती यापूर्वी कधींच नव्हती. ब्रिटिशांना याची पुरती जाणीव आहे. परंतु आपल्या पुढाऱ्यांना मात्र या परिस्थितीचें यथायोग्य आकलन झालेलें दिसत नाहीं. म्हणून कांहींतरी तडजोड घडवून आणली पाहिजे हें ब्रिटिशांनीं ओळखलें आहे. परंतु असें करीत असतांना त्यांनीच आपल्यांत जी दुही आणि कमकुवतपणा निर्माण करून ठेवला आहे, त्याचा पुरेपूर फायदा घेण्याचा प्रयत्न त्यांनी करून पाहिला. याच्या उलट आपल्या ताकदीचा आपण चांगल्या प्रकारें उपयोग करून घेतला नाहीं आणि आपण असहाय्य आहोंत, शत्रूबरोबर तडजोड करण्याखेरीज आपल्याला गत्यंतरच नाहीं अशी आपली समजूत करून घेतली. त्यामुळें त्यांच्याकडे लवादाची भूमिका सोंपवून ते देतील तो निर्णय मानण्याचें कबूल केलें.

आपल्या पुढाऱ्यांना आपल्या ताकदीची यथायोग्य जाणीव असती तर, त्यांनीं ब्रिटिशांना हिंदुस्तान सोडून जाण्यास भाग पाडलें असतें. म्हणजेच देशांतील घटनात्मक प्रश्नांना हात घालण्यापूर्वी त्यांनीं ब्रिटिशांना सर्व सत्ता जनतेच्या हातीं सोंपविण्यास भाग पाडलें असतें. तसें न करतां ब्रिटिशांनीं सर्व सत्तेनिशीं याठिकाणीं राहून आपले अंतर्गत प्रश्न सोडविण्याचें कामीं आपणांस मार्गदर्शन

करावें या गोष्टीस काँग्रेसनें मंजुरी दिली.

परंतु स्वराज्याकडे जाण्याचा मार्ग हा नव्हे अशी बाजू आम्ही मांडली. आम्ही असें दाखवून दिलें कीं, घटना समितींत स्वतः ब्रिटिश राहणार नसले तरी, स्वातंत्र्य आणि लोकशाही यांच्या मार्गांत अडथळे निर्माण करण्यासाठीं त्यांनीं मुस्लीम लीग आणि संस्थानिकांचे होयबा तेथें घुसविलेच आहेत. त्यामुळें आगामी घटना समितीला क्रांतिकारी स्वरूप प्राप्त होवून स्वातंत्र्य व लोकशाही लढ्याच्या रणमैदानांत तिचे रूपांतर करता येणार नाहीं. उलट अशी घटनासमिति उघड उघड प्रतिगामी म्हणून गणल्या गेलेल्या लोकशाही विरोधी शक्तींबरोबर आणि साम्राज्यशाहीच्या बगलबच्च्यां-बरोबर तडजोड करण्यांतच गुंतून पडणार हेंहि आम्ही त्याचवेळीं नजरेला आणून दिलें होतें. अशा प्रकारच्या घटनासमितीमधून आपल्याला स्वराज्य, आणि त्यांतल्या त्यांत जनतेचें स्वराज्य, कधींहि मिळूं शकणार नाहीं.

ब्रिटिश सरकारनें देऊं केलेली घटनासमिति आणि काँग्रे-सला आजवर अभिप्रेत असलेली किंवा राष्ट्रपति नेहरूंनीं आमच्या डोळ्यापुढें उभी केलेली घटनासमिति यांत महदंतर आहे. आगामी घटना समितीचें जनकत्व परकीय सरकारकडे आहे. त्याचप्रमाणें तिचे घटकावयव ह्या सरकारनें ठरवून दिलेले आहेत. कांहीं वादाचे मुद्दे उपस्थित झाले, तर त्याचा निवाडा करण्यासाठीं ते त्या सरकारकडे सोंपवावे लागणार आहेत, व इंग्रजाचे बगलबच्चे ह्या घटना समितींत बसणार असल्यामुळें ती खरीखुरी सार्वभौम राष्ट्र

शकणार नाहीं.

देशाची आजची परिस्थिति आणि आपलें बलाबल लक्षांत घेतां अशा तऱ्हेची तडजोड मान्य करणें समर्थनीय ठरणार नाहीं अशी भूमिका आम्ही मांडली. ही घटनासमिति अव्हेरून शक्य तितक्या लवकर खरीखुरी सार्वभौम घटनासमिति बोलविण्यासाठीं जरूर ती ताकद उत्पन्न करणें हाच एक पर्याय होता.

कॉंग्रेस संघटना आणि जनतेवरील तिचें प्रभुत्व हीच आपली खरी ताकद असून ब्रिटिशांचा मसुदा मान्य केला तर, तिला ओहोटी लागेल असेंहि आम्हीं सांगितलें. वर्किंग कमेटीच्या सभासदांची मुक्तता झाल्याबरोबर सिमल्यास ज्या वाटाघाटी सुरू झाल्या त्यामुळें कॉंग्रेस संघटनाचें सारें लक्ष निव्वळ सनदशीर कार्य आणि शत्रूबरोबर होणारी तडजोड यांवरच केंद्रित झालें आहे. प्रांतीय राज्यकारभाराची जबाबदारी पत्करल्यामुळें कॉंग्रेसमध्यें आधींच लांचलुचपत माजली आहे. क्षुद्र महत्वाकांक्षा, कारस्थानें आणि सत्तेचें राजकारण यांना ऊत आला आहे. आणि गटबाजी, जातीय वैमनस्य आणि प्रांताप्रांतांतील हेवेदावे वाढत आहेत. या सर्वांचा परिणाम असा झाला आहे कीं, कॉंग्रेस संघटनानीं जनसेवेच्या आणि लोकांचें आत्मिकबल वाढवून स्वातंत्र्य लढ्यासाठीं त्यांना तयार करण्याच्या प्रधान कर्तव्यास फाटा दिला आहे.

आगामी घटनासमितींत भाग घेऊन आपल्याला स्वातंत्र्य व लोकशाही तर प्राप्त करून घेतां येणार नाहींच, उलट ज्या रोगांनीं कॉंग्रेस पछाडली गेली आहे ते मात्र अधिक चिवळत जातील असेंहि

त्यावेळीं आम्हीं बजावलें.

आज काँग्रेस ज्या एका दुर्दैवी फेऱ्यांत सांपडली आहे, त्यातून तिला बाहेर काढून तिच्यात नवा जोम ओतावयाचा असेल तर, १९२१ सालचें वातावरण पुन्हां निर्माण झालें पाहिजे असें आमचें सांगणें होतें.

या सर्वांचा परिणाम जनतेत आज सर्वत्र आढळून येणारी अभूतपूर्व जागृति आणि उत्साह, त्याचप्रमाणें लढ्याची आणि संकटाला तोंड देण्याची आणि त्यासाठीं त्याग करण्याची तिची तयारी उघडली जाण्यांत होणार आहे. म्हणून आम्ही असें म्हटलें कीं, मृगजळामागें धावण्याऐवजी अगर अयोग्य तडजोड स्वीकारण्याऐवजी आपण मोहवश न होता आपली ताकद पुन्हां संघटित करण्याचें काम खंबीरपणें हातीं घेतलें पाहिजे. आपली तशी तयारी झाली म्हणजे इंग्रजांनीं आपला देश सोडून चालते झाले पाहिजे अशी मागणी पुन्हां पाखेपेला केली पाहिजे. आणि यावेळीं ती अखेरची म्हणूनच असली पाहिजे.

इंग्रज हिंदुस्थानचा किनारा सोडून गेल्यानंतर किंवा ब्रिटिश सत्तेची येथील निशाणी प्रत्यक्ष जातांना दिसूं लागल्यानंतरच घटना समिति बोलावण्यांत यावी.

संपूर्ण सत्तासंक्रमण होवूं नये म्हणून मुस्लीम लीगसारख्या आपल्या हस्तकांना पुढें करूं न देतां काँग्रेसच्या हातीं सत्ता देण्यास इंग्रजांना भाग पाडण्यासारखें वातावरण आपण तयार केलें पाहिजे. आणि अल्पावधींत तसें घडवून आणणें आपल्याला शक्य आहे.

शेवटी आम्ही असें सांगितलें कीं, कॉंग्रेसचा मार्ग अगदी स्पष्ट आहे. ब्रिटिशांची योजना धुडकावून देणें आणि पुन्हां एकदां जनतेंत मिसळून शेवटच्या लढ्यासाठीं तिची तयारी करणें हाच तो मार्ग होय. स्वातंत्र्य, लोकशाही, प्रजाराज्य आणि राष्ट्रीय ऐक्य संपादण्याचा सर्वोत्कृष्ट मार्ग हाच होय.

## भीति कशाची ?

वर्किंग कमेटीच्या प्रवक्त्यांकडून यापैकी कशालाच उत्तर मिळालें नाहीं. म. गांधींनीं आमची भाषणें ऐकलीं नव्हती. परंतु त्यांचा आशय त्यांना समजला होता असें दिसलें. संकटापासून पळून जाणें हा खऱ्या सत्याग्रहीचा मार्ग नव्हे असा मुद्दा त्यांनीं जोरानें प्रतिपादिला. ब्रिटिश योजनेंत अनेक धोके दडलेले असल्यामुळेच मुख्यतः तिच्या स्वीकाराला आमचा विरोध आहे असें कोणी तरी त्यांच्या कानावर घातलें असावें. आणि म्हणून सत्याग्रहानें संकटाचें भय बाळगता कामा नये, उलट त्यानें संकटात उडी घालण्याची तयारी ठेवली पाहिजे असा मुद्दा त्यांना मांडता आला. ब्रिटिश योजनेंत धोके तर आहेतच परंतु ती नाकारण्याचें तें एकमेव वा, सर्वांत महत्त्वाचेंहि कारण नव्हे. क्रांतिकारकांचा खंबीर गट असेल तर कोठल्याहि धोके-बाज योजनेचा स्वीकार करून त्यातून सहीसलामत बाहेर पडण्याची आशा त्याना बाळगतां येईल. सत्याग्रहानें भयापासून दूर असले पाहिजे असें गांधीजी म्हणाले. परंतु घटना समितीच्या निवडणुकांचा हव्यास असलेले सारे सत्याग्रहीच आहेत असें का त्याना म्हणावयाचें आहे ? लाचलुचपत आणि व्यक्तिगत महत्वाकांक्षा तडीस नेण्याचा

लागलेला हव्यास याबाबत काँग्रेसजनांना इशारा देतांना सरदार पटेल आपल्या अखिल भारतीय काँग्रेस कमेटीच्या भाषणांत म्हणाले कीं, प्रत्येक जागेसाठीं काँग्रेसवाल्यांचे शेकडों अर्ज येऊन पडत आहेत. कोणतीहि कसोटी लावली तरी अशा काँग्रेसजनांना सत्याग्रही म्हणून खासच संबोधतां येणार नाहीं. वस्तुतः घटनासमितीमध्ये क्वचितच कोणी सत्याग्रही उपस्थित होणार आहे याची जाणीव असूनहि घटनासमितींत सत्याग्रही असतील अशी संपूर्णपणें अवास्तव भूमिका त्यांनीं कां मांडावी हेंच मला समजत नाहीं.

हिंदुस्तानने जी नवी ताकद कमावली आहे त्यामुळें सत्तादान करून काँग्रेसला आजवर हवी असलेली घटनासमिति मान्य करणें इंग्लंडला कसें भाग पडलें तें पटवून देण्यासाठीं मौलाना आझादांनीं आपलें सर्व वक्तृत्व खर्ची घातलें. परंतु मी वर दाखविल्याप्रमाणें इंग्लंडला सत्तादान करण्यास भाग पाडण्यासाठीं आपण आपल्या नव्या ताकदीचा उपयोग तर करून घेतला नाहींच, उलट आपल्या स्वातंत्र्याच्या मार्गात खोड होऊन राहिलेली आपली दुही आणि आपला दुबळेपणा यांचा मात्र त्यांना फायदा घेऊं दिला आहे.

ब्रिटिशांबरोबर कसली तडजोड व्हावयाची असेल तर ती हिंदुस्तानचें स्वातंत्र्य आणि अखंडत्व या तत्वावरच आधारलेली असली पाहिजे. ही तर काँग्रेसनें वारंवार जाहीर केलेली भूमिका आहे. परंतु अद्याप स्वातंत्र्याची घोषणा करण्यांत आलेली नाहीं; किंवा तशी खात्रीहि देववत नाहीं. तसेंच राष्ट्रीय ऐक्यहि कमालीचे

धोक्यांत आलें आहे. आणि तरीहि काँग्रेसनें तडजोड मान्य केली आहे.

आगामी घटना समिति ही काँग्रेसच्या आजवरच्या कल्पनेशी जुळणारी आहे असें कोणत्याहि परिस्थितींत म्हणतां येणार नाहीं. त्यांतील खाचखळगे आणि धोके ज्यांनीं दाखवून दिले त्यांना मित्रे ठरवून मौलाना आझादानी त्यांची टिंगल केली. आणि ते म्हणाले कीं, काँग्रेसचे पुढारी तत्वच्युत होतील, कमकुवतपणा दाखवतील किंवा इंग्रजांच्या जाळ्यांत सांपडतील असें भय बाळगण्याचें कारण नाहीं. कांहीं कटु सत्यांचें देशाला स्मरण करून देणें मौलाना-साहेब मला भाग पाडीत आहेत. ज्या आमच्या पुढाऱ्याचा मौलाना साहेबांनीं आपल्या अमोघ वाणीनें एवढा गुणगौरव केला तेच पुढारी सुमारें नऊ महिन्यापूर्वी सिमल्याला चलेजावची घोषणा विसरून तात्पुरत्या सरकारांत प्रवेश करावयास आणि इंग्लंडबरोबर युद्धात गोवून घेण्यास तयार झाले होते. आणि तेच पुढारी आज नऊ महिन्यानंतर दिल्लीला शत्रूबरोबर कांहीं तरी करून एकदां तडजोड घडवून आणण्यासाठीं काँग्रेसच्या संपूर्ण राष्ट्रीयत्वाचा बळी देण्यास तयार झाले. ही सर्व वस्तुस्थिति लक्षांत घेतां असें म्हणावें लागतें कीं, मौलाना साहेबांनीं अ. भा. कॉं. क.त जें एवढें वक्तृत्व माजवलें तें मानसशास्त्रांत ज्याला 'स्वसंरक्षण योजना' (Defence Mechanism) असें म्हणतात त्याच स्वरूपाचें होतें.

२१ जुलै १९४६.

## हुकूमशाहीकडे

माझ्या आयुष्यांत याचवेळीं मी प्रथम निवडणुकीच्या प्रचारांत भाग घेतला. जूनच्या १९ तारखेपासून २८ तारखेपर्यंत मी संयुक्त प्रांतांत अलिगडपासून गाझीपूरपर्यंत दौरा केला.

आज जुलैची पहिली तारीख आहे, आणि निवडणुकांचे निकाल जाहीर होण्यास अद्याप दोन चार दिवसांचा अवधी आहे. निवडणुकांचे निकाल काय लागतील तें मी सांगूं शकत नाहीं. मात्र आमचे उमेदवार पराभूत झाले तर मला त्याचें आश्चर्य वाटणार नाहीं. पक्ष कॉंग्रेसमधून बाहेर पडल्याला अद्याप फारसे दिवस झालेले नाहींत आणि पक्षाच्या विजयाबद्दल आत्मविश्वासाचें वातावरण निर्माण होण्यासाठीं संघटनात्मक आणि विधायक स्वरूपाचें किती तरी कार्य होणें, त्याचप्रमाणें जनतेची सेवा आणि जागृति करणें जरूर आहे. या पोटनिवडणुकांमुळें इतके मोलाचे अनुभव आले आणि धडे मिळाले कीं, ते एरवी मिळूं शकले नसते. त्यादृष्टीनें या निवडणुकांचें महत्व अपार आहे.

पक्षीय दृष्टीनें या निवडणुकांतील यशापयशाला तात्कालिक महत्व फारच थोडें आहे. तथापि युक्तप्रांतीय सरकार आणि प्रांतिक कॉंग्रेस कमेटी यांनीं या निवडणुकी कशा तऱ्हेनें लढविल्या या प्रश्नाला

देशाच्या भवितव्याच्या दृष्टीनें अत्यंत महत्व आहे. गेल्या कांहीं महिन्यांपासून प्रांतिक सरकारकडून नागरिक स्वातंत्र्याचा वाढत्या-प्रमाणात अनादर केला जात आहे. ती परिस्थिति तर चिंताजनक होतीच, परंतु या निवडणुकीच्या वेळीं लोकशाही पद्धतीविषयीं युक्तप्रांत सरकारनें दाखविलेली कमालीची तुच्छता आणि प्रांतिक कॉंग्रेस पुढाऱ्यांनी दाखविलेली मनोवृत्ति यामुळें हिंदी लोकशाहीची गळचेपी होऊन हुकमशाहीचा विजय होणार, इतकेंच नव्हे तर, सार्वजनिक जीवनांतील सदभिरुचि आणि प्रामाणिकपणा देखील विलयास जाणार अशीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागलीं आहेत.

निवडणुकाचे वेळीं जनता जरा खालच्या पातळीवर येते ही गोष्ट खरी असली तरी महात्मा गांधींच्या निकट सानिध्यांत राहणाऱ्या देशाचा दर्जा याहून अधिक उच्च असला पाहिजे अशीच कोणीहि अपेक्षा करील. युक्त प्रांतीय निवडणुकीच्या वेळीं समाजवादी पक्षा-कडील कांहीं कार्यकर्त्यांची भाषणें सदभिरुचीला सोडून झाली असतीलहि कदाचित, परंतु पक्षाच्या कोणत्याहि प्रांतिक किंवा बाहे-रून प्रचारार्थ गेलेल्यापैकीं एकाद्या पुढाऱ्यानें हीन दर्जाचीं भाषणें केलीं असा आरोप कोणालाहि करतां येणार नाहीं. आचार्य नरेंद्र देव, राममनोहर लोहिया, अरुणा असफअली, अच्युत पटवर्धन या सर्वांचीच भाषणें राजकीय प्रचाराच्या दृष्टीनें फार वरच्या दर्जाचीं होतीं. याच्या उलट संयुक्त प्रांताचे मुख्य प्रधान पंडित गोविंद वल्लभ पंत यांनीं निवडणूक प्रचाराच्या पहिल्या भाषणापासूनच वैयक्तिक हल्ले करण्यास आणि शिष्टाचाराला सोडून भाषणें करण्यास सुरवात केली.

पंडित पंतांचीं कांहीं मुक्ताफळें मुद्दाम खालीं देत आहे:

१ विरोधी पक्ष असण्याची मुळींच जरूर नाहीं.

२ ज्याप्रमाणें आम्ही मुस्लीम लीग, हिंदू महासभा, आर् एस्. एस्., कम्युनिस्ट इत्यादींना चिरडून टाकलें त्याप्रमाणें आम्हांला जो कोणी विरोध करील त्याचीहि आम्ही तशीच वाट लावूं.

३ समाजवादी हे स्वार्थसाधू आहेत आणि स्वतःच्या फायद्यासाठींच ते काँग्रेसमधून बाहेर पडले.

४ समाजवादी म्हणजे विषारी सर्प आहेत.

५ समाजवाद्यांना मत म्हणजे रझाकारांना आणि काश्मीरवर हल्ला करणाऱ्या टोळीवाल्यांना मत.

६ काँग्रेसला मत देणें म्हणजे गांधीजींच्या आत्म्याला शांती मिळवून देणें.

७ युक्तप्रांत सरकारनें हिंदी ही राजभाषा ठरविली आहे. समाजवादी तिचें उच्चाटन करून त्याजागीं हिंदुस्तानीची स्थापना करतील.

८ समाजवादी धर्मलंड आहेत. ते सत्तारूढ झाले तर मंदिरें राहणार नाहींत.

९ एका बाजूला नेहरू आणि पटेल व दुसऱ्या बाजूला जयप्रकाश आणि लोहिया यांपैकीं कोण निवडावयाचें तें ठरवा.

१० काँग्रेसच्याविरुद्ध मत देणें म्हणजे देश कमकुवत करणें होय.

अशीं आणखीहि उदाहरणें देतां येतील.

खुद्द पंडित पंतांनींच जर ही तार लावली तर त्यांच्याहून दुय्यम दर्जाच्या कॉंग्रेसभक्तांनीं काय तारे तोडले असतील त्याची सहज कल्पना येवूं शकेल. सर्व युक्तप्रांतीय कॉंग्रेसवाल्यांच्यांत एकच अपवाद होता आणि तो म्हणजे, बाबू पुरुषोत्तमदास टंडन यांचा- त्यांनीं मात्र आपली सदभिरुची आणि सदाचार यांची कास सोडली नाहीं.

परंतु पंडित पंत आणि त्यांचे अनुयायी यांनीं दाखविलेल्या हीन मनोवृत्तीकडे आपण दुर्लक्ष करूं या. त्यापेक्षां या प्रश्नाच्या दुसऱ्याच दोन महत्त्वाच्या पैलूंवर मला प्रकाश टाकावयाचा आहे.

पंडित पंतांनी पुन्हां पुन्हां असें जाहीर केलें कीं, विरोधी पक्षाची कसलीहि आवश्यकता नाहीं. कारण विरोधी पक्ष ही कितीहि झालें तरी, पाश्चात्यांची राजकीय पद्धत असून आपल्या देशाच्या दृष्टीनें ती कुचकामी आहे. टंडनजींनींहि पंडित पंतांची ही विचार- सरणी उचलून धरली व त्यामुळें तर तिला अधिकच महत्व प्राप्त झालें. सरकारच्या बाबतीत कॉंग्रेसनें पाश्चिमात्य पद्धतीचें सहीसही अनुकरण केलेलें असतांना, पंडित पंतांच्या सारख्या उच्चपदस्थ कॉंग्रेस- नेत्यानें लोकशाही विरोधाच्या कल्पनेला, ती केवळ पाश्चिमात्य आहे म्हणून विरोध करावा हें दुर्दैव म्हटलें पाहिजे. परंतु पंडित पंतांनी विरोधासाठीं हें जें कारण दाखविलें त्याला मी फारसें महत्व देत नाहीं. कारण तसें करण्यांत आपल्या देशांतील अनेकांच्या मनांत जी एक पाश्चात्य विरोधाची विचित्र भूमिका ठाण मांडून बसली आहे तिचाच

पंडित पंतांना फायदा करून घ्यावयाचा होता. पंडित पंतांनी दिलेल्या कारणापेक्षां त्यांनी विरोधी पक्षाची गरजच मुळीं अमान्य केली, आणि त्याबाबत असहिष्णुतेची वृत्ति दाखविली ही गोष्ट अत्यंत अर्थसूचक आहे. अशातऱ्हेनें विचार करणारांची वृत्ति हुकूमशाहीचीच असली पाहिजे.

## दहशतवादी मार्ग

या मनोवृत्तीचें प्रतिबिंब प्रत्यक्ष कृतींत पडूं लागलें म्हणजे तर तिच्या परिणामाचें स्वरूप अधिकच गंभीर बनूं लागतें. ज्या ज्या ठिकाणीं मी गेलों त्या त्या ठिकाणीं मला असें सांगण्यांत आलें कीं, जाणून बुजून भीतीचें वातावरण तयार करण्यांत आलें आहे. व त्यामुळें आपला मताधिकार खुलेपणानें बजावण्यास लोक भीत आहेत. कॉंग्रेस पुढारी, मंत्री, पार्लमेंटरी सेक्रेटरी, होम गार्ड्स, सरकारी नोकर हे सारेच लोकांच्या मनांत दहशत निर्माण करण्याचें कामीं एकमेकाशीं सहकार्य करीत होते. समाजवादी हे सरकार विरोधी असल्यानें जो कोणी त्याना मत देईल तो देखील देशद्रोही समजला जाईल व त्याचे परिणाम त्याला भोगावे लागतील. राष्ट्रीय स्वयंसेवक संघ वगैरे संस्थांवर नुकतीच झडप घालण्यांत आली असल्याकारणानें अशा तऱ्हेच्या जबरदस्त दमबाजीचा जनतेवर भयानक परिणाम घडून आला. कॉंग्रेसबद्दल मनातून असंतोष असूनहि एकतर मतदारानीं मतदानच केलें नाहीं किंवा भीतीमुळें स्वतःच्या इच्छेविरुद्ध कॉंग्रेस उमेदवारांना मतें दिलीं.

अशा तऱ्हेचे मार्ग अवलंबिण्यांत येवूं लागले म्हणजे कोणाचा

विजय होतो याला काहींच महत्व उरत नाहीं. कारण कोणीहि जरी निवडून आले तरी त्यात देशाचें नुकसानच असतें. खरीखुरी लोकशाही हें जर आपलें ध्येय असेल तर, मी वर म्हटल्याप्रमाणें अशा तऱ्हेचे मार्ग त्या लोकशाहीची आणि नागरिक स्वातंत्र्याची चागलीच गळचेपी करणार आहेत पंडित पत आणि त्याच्यासारखे इतर कॉंग्रेसजन याना पायबंद घातला नाहीं तर ते हिंदुस्तानला गुलामांच्या देशाचें स्वरूप आणून दिल्याशिवाय राहणार नाहींत. व हिंदी जनतेनें इंग्रजांपासून जें स्वातंत्र्य मिळविलें तें हुकूमशाहीच्या पाठिराख्यांच्या घशात गेल्याशिवाय राहणार नाहीं.

पंडित पतांच्या प्रचार मोहिमेंतील ज्या दुसऱ्या मुद्याचा मला उल्लेख करावयाचा आहे तो म्हणजे, जनतेच्या जातीय भावनांची त्यानी केलेली आळवणी. समाजवाद्याचें धर्मद्वेष्टे म्हणून त्यानीं केलेलें वर्णन, आणि हिंदी–हिंदुस्तानीचा त्यानी उकरून काढलेला प्रश्न याकडे उदाहरण म्हणून बोट दाखविता येईल. एकदा ते असें म्हणाले कीं कॉंग्रेसला मत देणें म्हणजे गाधीजींच्या आत्म्याला शाती लाभू देणें, तर लगेच त्याच सपाट्यात गांधीजींच्या शिकवणुकीकडे संपूर्ण दुर्लक्ष करून पुन्हां त्यानी युक्तप्रांत सरकारनें हिंदी ही राजभाषा ठरविली असून समाजवादी अधिकारावर आले तर पुन्हा हिंदुस्तानीचें प्रस्थ माजेल या सबबीवर मतदाराकडे मताची मागणी करण्यासहि कमी केलें नाहीं.

कॉंग्रेस आणि समाजवादी पक्ष यांची भूमिका निदान कांहीं बाबतींत तरी समान आहे अशी माझी समजूत होती. उदाहरणार्थ

अवलंबून आहेत. तथापि आपल्यावर कोणी गुलामगिरी लादूं नये म्हणून आपणच डोळ्यांत तेल घालून जपलें पाहिजे अशी जाणीव जोंपर्यंत जनतेला होत नाहीं, तोंपर्यंत त्यांची या खोड्यांतून कोणीहि मुक्तता करूं शकणार नाहीं.

४ जुलै १९४६

## संयुक्तप्रांतांतील निवडणुकी

संयुक्त प्रांतांतील निवडणुकींत आपल्या पक्षाचा जो धुव्वा उडाला त्यापासून आपण कोणता बोध घ्यावयाचा? या निवडणुकीचे वेळीं सर्वांना मताधिकार मिळालेला नव्हता किंवा कॉंग्रेसच्या हुकूमशाही. राजवटीखालीं लोकशाही ही नांवालाच तेवढी शिल्लक राहली आहे अशा सबबीवर निवडणुकांच्या निकालाकडे दुर्लक्ष करून चालणार नाहीं मतदानाचा अधिकार जास्त लोकांना असता, अथवा मतदारांना धाक दपटशा दाखवून त्यांच्यावर दडपण आणण्यासाठीं कॉंग्रेसनें सरकारी यंत्रणेचा उपयोग करून घेतला नसता तर, निवडणुकांचे निकाल यापेक्षां निराळे लागले असते यांत शंकाच नाहीं.

परंतु त्या सबबीवर स्वतःचें समाधान करून घेणें आणि ' कॉंग्रेसबरोबर लढत तर निकराची दिली कीं नाहीं ' असें म्हणून स्वतःची पाठ थोपटून घेणें आत्मघातकीपणाचें ठरेल.

### संघटना आणि काम

निवडणूक मोहिमेच्यावेळीं मी स्वतःला नेहमी असा एक प्रश्न विचारीं कीं, मी जर युक्तप्रांतांतील एकादा खेडुत असतों तर मी समाजवादी पक्षाला मत दिलें असतें का? आणि माझें उत्तर प्रत्येक वेळीं 'नाहीं' असेंच येई. याचें कारण काय? मी ज्यावेळीं या प्रश्ना-

बाबत विचार करूं लागे त्यावेळीं माझ्या मनांत येई कीं, तो खेडुत म्हणेल 'मला समाजवादी पक्षाविषयीं कांहींहि माहिती नाहीं, निवडणूकीपूर्वीं त्यांचे कार्यकर्ते कधींहि माझ्याकडे आलेले नाहींत, किंवा त्यांनीं माझ्यासाठीं कांहीं केलेलेंहि नाहीं.'

मग असें असून समाजवादी उमेदवारांना इतकीं मतें कशीं पडलीं ! उमेदवारांचें वैयक्तिक वजन आणि त्यांचा नावलौकिक हेंच प्रामुख्यानें याचें कारण आहे. शिवाय काँग्रेसबद्दलची आजची अप्रीति हेंहि एक कारण आहेच. ग्रामीण भागांत तरी निदान समाजवादी पक्षाबद्दल जनतेला फारच थोडी माहिती होती आणि शहरांतील जनतेला पक्षोपपक्षांमधील तात्विक मतभेदांचें अधिक ज्ञान असलें तरी आपली पक्ष संघटना तेथें जवळ जवळ नव्हतीच असें म्हटलें तरी चालेल.

## मीरतचा धडा

मीरतचें उदाहरण घ्या. आपण त्याठिकाणी आपला उमेदवार उभा केला होता. आणि उमेदवारांची वैयक्तिक लायकी लक्षांत घेतां, रघुकुल तीलक हे अगदी सहज निवडून यावयास हवे होते. काँग्रेसवाले मतदानांत हस्तक्षेप करू लागले म्हणून त्यानी आपलें नांव काढून घेतलें हें सर्वांना माहीतच आहे. परंतु त्यांनीं आपली उमेदवारी मागें घेतली नसती, तरी देखील त्यांचा पराभव हा ठरलेलाच होता. कां ? कारण निवडणुकीपूर्वीं फक्त तीन पक्ष-सभासद मीरत शहरांत होते आणि नांव घेण्यासारखी अशी पक्ष-संघटना तर अजिबातच नव्हती. याच्या उलट, काँग्रेसची संघटना

ही पूर्वीपासूनच सुव्यवस्थित होती आणि अगदी परवा परवापर्यंत टीळकजी आणि इतर समाजवादी कार्यकर्तेच त्यासाठीं झटत होते. प्रत्येक मोहोल्ल्यामोहोल्ल्यांत कॉंग्रेस कमेट्या आणि अनेक कार्यकर्ते त्यांच्या हाताशीं होते. कॉंग्रेसपाशीं असलेली पैसा वगैरे साधनें सोडून दिलीं तरी त्यांच्या संघटनेच्या मानानें आपली संघटना अगदीच बाल्यावस्थेत होती. निवडणुकीच्या वेळीं अनेक नवे कार्यकर्ते पुढें आले हें खरें, तथापि ते सर्वच नवखे आणि अननुभवी होते. आणि कांहीं झालें तरी निवडणुकीसाठीं घाईगर्दीने कशीतरी उभी केलेली यंत्रणा सुसंघटित अशा राजकीय संघटनेची जागा कशी भरून काढणार ?

अशा परिस्थितीत मीरतच्या उदाहरणावरून—आणि सर्व मतदार संघांना तें सारखेच लागूं पडण्यासारखें आहे— आपण काय बोध घ्यावयाचा तें अगदी उघड होतें. दोनच शद्बांत सांगावयाचें तर 'संघटना आणि काम' हाच तो बोध होय.

## एकच मार्ग

परंतु आश्चर्याची गोष्ट म्हणजे आपल्यापैकीं मीरतला गेलेल्या अनेक कार्यकर्त्यांना हा बोध झालेला नाहीं. या निवडणुकीबाबत त्यांनीं काढलेलें सार कांहींसें पुढील आशयाचें होतें. हिंदुस्तानांत लोकशाहीची भाषा बोलणें हा एक भ्रम आहे. आजच्या सत्ताधारी पक्षानें सत्ता आपल्या ताब्यांत ठेवण्याचा चंग बांधला आहे आणि वेळ पडली तर त्यासाठीं लोकशाहीचा बळी देण्याचीहि त्याची तयारी आहे. तेव्हां आपण लोकशाही व लोकशाही मार्ग यांची भाषा सोडून

आतां क्रांतीच्या तयारीस लागावें हें बरें. आणि मला असेंहि सांगण्यांत आलें कीं, दिल्लीतील आपले कांहीं साथी पं. पंतांच्या सभा कशा उधळून लावावयाच्या त्याचेहि मनसुबे रचूं लागले होते. त्यांच्या क्रांतीच्या उद्घाटनाचीच बहुधा ती तयारी असावी.

कमालीच्या पोरकटपणाचाच हा नमुना म्हटला पाहिजे ! कारण ज्याला समाजवाद चांगला समजला आहे, तो हें ओळखून असतो कीं, लोकशाही किंवा क्रांतिकारी अशा दोन मार्गांपैकीं एकाची निवड करण्याचा मुळीं सवालच नाहीं. विशिष्ट परिस्थितींत यशाकडे नेणारा एकच एक मार्ग असतो आणि त्याचाच खंबीरपणें अवलंब करावा लागतो. परंतु मार्ग कोणताहि वापरला तरी आपली संघटना मजबूत नसेल आणि जनतेचा आपल्याला पाठिंबा नसेल तर, तो यशस्वी होणें शक्य नाहीं. क्रांतिकारी मार्ग म्हणजे केवळ कटबाजी नव्हे. क्रांति आणि विशेषतः सामाजिक क्रांति, म्हणजे प्रस्थापित सरकार विरुद्ध होणाऱ्या उठावांत जनतेनें स्वखुशीनें इतकेंच नव्हे तर अत्यंत कडवेपणानें भाग घेणें होय. कांहीं अंशीं सामाजिक शक्ति जनतेला अशा उठावांत सहभागी करतात तर कांहीं अंशीं क्रांतिकारी पक्षाच्या चळवळीमुळें जनता तसें करण्यास उद्युक्त होते. खरें म्हणजे अशा तऱ्हेचें राजकीय कार्य झालेलें नसेल तर, सामुदायिक उठाव होऊनहि जनतेच्या शक्ति निरर्थक कृत्यें करण्यातच फुकट जातात.

म्हणून कोणताहि मार्ग अवलंबिला तरी, पक्ष संघटन आणि-जनतेला जागृत करून पक्षाच्या राजकीय मार्गदर्शनाखालीं आण-

त्यासाठीं प्रत्यक्ष कार्य करीत राहणें हेंच आद्य कर्तव्य ठरतें. आणि हें प्राथमिक कार्य करण्याच्या बाबतींत आपण कित्येक योजनें मागें आहोंत हेंच युक्तप्रांतातील निवडणुकींनीं दाखवून दिलें आहे.

त्यामुळें युक्तप्रांतीय निवडणुकीतील पराजयामुळें प्रत्येक सच्च्या समाजवाद्याची अशी खात्री होऊन चुकली पाहिजे कीं, पंतांच्या सभा उधळून लावण्याच्या फंदांत पडण्याऐवजीं पक्षसंघटन वाढविण्यासाठीं त्यानें शहरें व खेडीं, शाळा, आणि कचेऱ्या, खाणी व कारखाने या प्रत्येक ठिकाणीं अधिक नेटानें झटलें पाहिजे. प्रत्येक कार्यकर्त्यानें धर्मोपदेशकाच्या तळमळीनें पक्षाचा संदेश हिंदुस्तानांतील कामगारांच्या—मग तो श्रमजीवी असो वा बुद्धिजीवी असो—घरोंघरीं पोहोंचेपर्यंत अविश्रांत झटलें पाहिजे. लोकशाही मार्गाच्या युक्तायुक्ततेविषयीं नसता काथ्याकूट करण्यांत आपण आपली शक्ति फुकट घालवितां कामा नये.

## लोकशाहीचें समर्थन

आपण विशिष्ट परिस्थितींत कोणत्या मार्गाचा अवलंब करणार त्यावरच आपण कशाप्रकारें तयारी करावयाची तें अवलंबून राहील असें कांहींजण म्हणतील. आणि कांहीं अंशीं तें खरेंहि आहे. तथापि, तें संपूर्ण सत्य मात्र नव्हे. समाजवादी पक्षाला सामाजिक क्रांतीच्या तयारीसाठीं बॉंबचे कारखाने काढावयाचे नाहींत. जनतेची संघटना करून तिच्यांत समाजवादीनिष्ठा निर्माण करण्यासाठीं जेवढीं म्हणून साधनें आज उपलब्ध असतील त्या सार्‍यांचा पक्षाला जास्तीत जास्त फायदा करून घ्यावयाचा आहे. म्हणूनच सर्व कायदेमंडळांचा

व तत्सम साधनाचा जास्तीतजास्त उपयोग करून घेण्याचें पक्षानें ठरविलें आहे. लेनिननें तर त्याच्या सहकाऱ्याना प्रतिगामी आणि कसलेहि अधिकार नसलेल्या ड्यूमात जाण्याचा आदेश दिला होता. आज मध्यवर्ति कायदेमंडळात जो पक्ष आपलें बहुमत करूं शकेल, त्याला या देशाचें भवितव्य बदलून दाखवता येईल ही गोष्ट हिंदुस्तानात कोण नाकारू शकेल ! कायदेमंडळाच्या यापुढील निवडणुका प्रौढमतदानानुसार होणार आहेत. इतक्या व्यापक मतदार संघाचा फायदा करून घेण्याचें पक्षानें नाकारलें तर तो मूर्खपणाच ठरेल. सत्ताधारी पक्षानें निवडणुकीपाठीमागील तत्वांची गळचेपी करण्याचा प्रयत्न केला तरी आपण हें विसरता कामा नये कीं, लोकशाहीच्या प्रस्थापनेसाठीं झगडण्याची जबाबदारी काहीं फक्त सत्तारूढ पक्षाचीच नाहीं. सामान्य जनता, त्याचप्रमाणें विरोधी पक्ष यानींहि या कामीं फार मोठा वाटा उचलला पाहिजे. आपण आपले प्राथमिक हक्कहि जर गमावून बसलों तर अधिकारारूढ पक्षाच्या कारवायाइतकीच जनतेची त्याबाबतची उदासीनता आणि आपली निष्क्रीयताहि त्याला जबाबदार म्हटली पाहिजे. एखादा मतदार धकदपटशामुळें स्वत.च्या इच्छेनुरूप मत देण्यास भिऊ लागला तर सरकारच्या दडपशाही इतकीच आपली बेफिकीरीहि त्याला कारणीभूत असणार हें उघड आहे. आपण मतदारांच्यात काम केलें असतें, आणि त्याना योग्य शिक्षण दिलें असते तर, त्यांना त्याच्या हक्काची अधिक जाणीव झाली असती, आणि तो बजावण्याचें धैर्यहि त्यानीं दाखविलें

असते. म्हणून नागरिक स्वातंत्र्याचें रक्षण करण्याचा प्रयत्न न करतां हुकुमशाही पद्धतीचा अवलंब करणें म्हणजे स्वातंत्र्य,इतकेंच नव्हे तर समाजवादाचाहि द्रोह करण्यासारखें आहे. देशांत आज जी हुकुमशाही प्रवृत्ति निर्माण होत आहे त्याविरुद्ध करावा लागणारा लढा व समाजवादी लढा हिंदुस्तानात एकरूपच झाले आहेत. आपल्याला समाजवादी लढा चालवायचा असेल तर, हुकुमशाही पक्षाच्या जाळ्यात आपण सांपडता कामा नये. आपल्या हातून एखादी तरी चूक होईल, म्हणून याक्षणीं कॉंग्रेसमधील हुकुमशाही गट डोळ्यात तेल घालून वाट पहात आहे. त्यांना हवी असलेली संधी आपण त्यांना मिळवून देण्याचा अवकाश कीं, लगेच ते आप-ल्यावर झडप घालतील आणि समाजवादी पक्ष सरकारनें बेकायदा ठरविल्याचें वृत्त अचानकपणें तुमच्या कानावर येईल. त्यामुळें हिंदी समाजवाद्यांच्या मार्गांत अधिकच अडचणी निर्माण होतील. जाणून बुजून आपल्यामधील अडचणी वाढवून घेणें ही अक्षम्य चूक ठरेल. आजच्या क्षणीं समाजवादी चळवळ उभारण्यासाठीं अस्तित्वात अस-लेल्या सर्व नागरिक स्वातंत्र्याचा उपयोग करून घेणें अत्यंत निकडीचे आहे. परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, आधी हुकुमशाही सत्तारूढ करण्यासाठीं आपल्या जिवाचें रान करावयाचें, आणि मग हुकुमशाही विरोधी मोहीमा काढावयाच्या हा हिंदी समाजवाद्यातील एका विशिष्ट प्रवृत्तीच्या गटाचा नित्यक्रमच होऊन बसला आहे. या चुकीची पुनरावृत्ति होवू देता कामा नये. हिंदुस्तानांतील फासिझमला तोंड देण्याचा एकमेव मार्ग म्हटला म्हणजे, जनतेच्या लोकशाही हक्कासाठीं

प्राणपणानें लढणें हाच होय.

म्हणून मी पुन्हां एकदां बजावितों कीं युक्तप्रांतांतील निवडणुकीनें दिलेला धडा दुसरा तिसरा कोणताहि नसून संघटना आणि काम, अधिक काम आणि चांगली संघटना हाच होय.

:१ जुलै १९४८

# नव्या कामगार एकजुटीचा पाया

[ साथी जयप्रकाश नारायण यांनीं ता. २७ व २८ नोव्हेंबर १९४८ रोजीं मुंबईस प्रमुख कामगार कार्यकर्त्यांची एक बैठक बोलावली होती. या परिषदेस हिंदुस्तानांतील सर्व भागांतून निरनिराळ्या राजकीय गटांतील कार्यकर्ते हजर होते. आधीच अत्यंत निकृष्ट असलेलें राहणीचें मान टिकवून कसें धरतां येईल याचा विचार यावेळीं करण्यात आला. या सभेचें अध्यक्षस्थान हिंदुस्तानांतील ख्यातनाम कामगार पुढारी श्री. ना. म. जोशी यांनी स्वीकारलें होतें. परिषदेचें मुख्य उद्दिष्ट सरकारला आपलें मुत्सद्दी धोरण सोडावयास लावून चलनवाढीला आळा घालण्याकरता कांहीं निश्चित विधायक मार्ग शोधून काढणें हें होतें. या परिषदेचें उद्घाटन करतांना जयप्रकाशजींनीं केलेलें समग्र भाषण खालीं दिलें आहे ]

माझ्या निमंत्रणाला मान देऊन आपण सर्वजण या ठिकाणीं आलांत याबद्दल मी तुम्हां सर्वांचे अत्यंत मनःपूर्वक आभार मानतों. त्याचप्रमाणें हिंदी कामगार चळवळीचे अध्वर्यु श्री. ना. म. जोशी यांनीं या परिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याचें मान्य केलें म्हणून मी त्यांचाहि आभारी आहे.



ही अनौपचारिक आणि विचार विनिमयार्थ बोलविण्यांत

आलेली परिषद आहे. कामगार वर्गाच्या किंवा अधिक यथार्थतेनें बोलावयाचें तर सर्वसाधारण नोकरवर्गाच्या अत्यंत जिव्हाळ्याच्या अशा एका विशिष्ट प्रश्नावर चर्चा करण्यासाठीं आपण येथें जमलेले आहोंत आणि या प्रश्नातूनच आणखीहि अनेक प्रश्न निर्माण होऊं लागले आहेत. मध्यमवर्गीय पगारदारांसकट सर्वच नोकरवर्गाच्या राहणीचें मान एकसारख्या वाढत जाणाऱ्या किंमतींमुळें हळूंहळूं खालावत चाललें आहे. कामगार वर्गाचे प्रतिनिधी—या ठिकाणीं कामगार हा शब्द मी व्यापक अर्थानें वापरीत आहे—आणि हिंदी नागरिक अशा दुहेरी भूमिकेवरून आपण या ठिकाणीं जमलों असून या प्रश्नावर गंभीरपणें विचार करून कामगारांच्या खरोखरींच्या वेतनांत हळूंहळूं जी घट होत आहे, ती थोपविण्याचा मार्ग आपणांस शोधून काढावयाचा आहे. मुख्यतः कामगार वर्गाचें हित डोळ्यापुढें ठेवून त्या अनुरोधानेंच आपल्याला या प्रश्नाचा विचार करावयाचा आहे. तथापि कामगार आणि मालक यांचे हितसंबंध परस्परविरोधी असले तरी, सर्वसाधारण जनतेचें कल्याण साधणारा नवा समाज स्वतंत्र हिंदुस्तानला निर्माण करावयाचा असल्यानें कामगारवर्गाचें हित तेंच राष्ट्राचें हित असा आपला विश्वास आहे. भांडवलदार वर्गाचे हितसंबंध राष्ट्रीय हिताच्या आड येण्याचा संभव असतो— नव्हे ते तसे येतातहि. परंतु कामगार वर्गाच्या हितसंबंधावरच राष्ट्राचें सर्व हित अवलंबून असतें असें आपण मानतों. आणि म्हणून कामगारवर्गाची सेवा बजावून आपण राष्ट्रकार्य साधण्याचाच प्रयत्न करीत आहोंत.

## सरकारी नोंकर

महागाईच्या प्रश्नाची झळ सर्वसाधारण कामगारवर्गाला लागत असली तरी, मध्यवर्ति आणि प्रांतिक सरकारच्या नोंकरवर्गाचे बाबतींत त्या प्रश्नानें विशिष्ट स्वरूप धारण केलें आहे. किंमतीच्या दर्शक नंबराच्या अनुरोधानें महागाई भत्ता देण्यात यावा अशी शिफारस मध्यवर्ति पे कमिशननें केली. आणि दर्शक नंबर २७० धरून त्यावर कमीतकमी महागाई भत्ता रु. २५ मिळावा व दर्शक नंबर वाढत गेल्यास दर २० ला रु. ५ प्रमाणें महागाई भत्त्यात वाढ व्हावी असें सुचविलें हें आपणा सर्वांस माहीतच आहे. माझी खात्री आहे कीं, राष्ट्राचा आजचा दर्शक नंबर ३८० च्या खाली नाहीं. त्यामुळें पे कमिशनच्या शिफारसीनुसार सरकारी नोंकरांना रु. ५५ हून कमी महागाई भत्ता मिळता कामा नये. याबातींत पे कमिशननें केलेल्या शिफारसी लागू करण्यांत याव्यात येवढीच सरकारी नोंकरांची मागणी आहे. परंतु सरकारनें अद्यापपर्यंत तिकडे लक्ष पुरविलेलें नाहीं.

कामगार वर्गाची आणि आपल्या नोंकराची दुःखें दूर करण्याची सरकारची तयारी अथवा इच्छा तर नाहींच, उलट आपली परिस्थिति सुधारण्याचे कामगार वर्गानें केलेले सर्व प्रयत्न दडपून टाकण्याचाच सरकारनें चंग बांधला आहे असें गेल्या काहीं महिन्यातील अनुभवावरून आढळून आलें आहे.

लाक्षणिक संपासारख्या साध्या निदर्शनांत देखील सरकारला बंडाचा वास येवूं लागला आहे. आपली परिस्थिति सुधारण्यासाठीं

लढा देणें अगवड करून सोडणारे कायदे सरकार पास करीत आहे. या कायद्याची परिणति शेवटी हिंदुस्तानांतील कामगारांना गुलाम बनविण्यातच होणार हें खास.

हे प्रश्न फार गभीर स्वरूपाचे असून जर वेळींच त्यातून मार्ग काढला नाहीं तर, देशाचें आर्थिक व त्याचबरोबर राजकीयहि स्थैर्य धोक्यात येईल आणि सर्वत्र गोंधळ व अराजक माजेल. म्हणून देशाचें हित डोळ्यापुढें ठेवून हे प्रश्न सोडविण्याचें कामीं संघटित व योजनाबद्ध रीतीनें वागण्याचा मार्ग कामगार वर्गास दाखविणें हें तुमचें काम आहे.

## किंमतीवर नियंत्रण

प्रथमतः वस्तूंच्या किंमतींत होत चाललेली वाढ थांबवून त्या योग्य प्रमाणात उतरविण्यासाठीं सरकारनें नेमकें काय करावयास हवें तें तुम्ही दाखवून दिलें पाहिजे. काहीं दिवसापूर्वी सरकारनें निरनिराळ्या कामगार संघटनांच्या प्रतिनिधींना चलनवाढ कमी करण्याच्या प्रश्नावर मंत्रिमंडळाबरोबर वाटाघाटी करण्यासाठीं बोलाविलें होतें हें तुम्हांस स्मरत असेलच. परंतु या प्रतिनिधींनीं केलेल्या सूचनांकडे सरकारनें अजिबात दुर्लक्ष केलें. त्यामुळें सरकारला सध्याचें आर्थिक धोरण बदलण्यास भाग पाडण्यासाठीं सरकारवर कसें दडपण आणावयाचें, त्यासाठीं कोणते मार्ग वापरावयाचें ठरविण्याचें काम तुमचें आहे.

सरकारनें नुकत्याच स्वीकारलेल्या चलनवाढ विरोधी धोरणान्वये आयात मालावरील जकाती व नव्यानें सुरू करण्यांत येणाऱ्या

उद्योगधंद्यावरील प्राप्तीकर कमी करणें, अशा स्वरूपाच्या सवलती भांडवलदारवर्गाला देण्यात आल्या आहेत. स्वतः पंतप्रधानच ज्याचें वर्णन भांडवलाचा संप असें करतात त्याबद्दल भांडवलदार वर्गाला मिळालेलें हें बक्षीस होय! काळाबाजार करणें, कर चुकविणें, आणि स्वतःला हव्या असलेल्या सवलति मिळाल्या नाहींत तर, उत्पादन करण्यास नकार देणें यावरून हिंदी भांडवलदारवर्गाचें खरें स्वरूप उघड झालें आहे. आणि तरीहि त्यांच्या देशद्रोही वर्तणुकीबद्दल आपल्या सरकारनें भांडवलदार वर्गाला भरपूर सवलती बहाल केल्या आहेत. कामगारवर्गानें देशाविषयींचें कर्तव्य बजावलें असून देशाच्या हाकेस ओ दिली आहे असें खुद्द श्री. जगजीवनराम यांच्यासारखी अत्यंत उच्च अधिकाराच्या जागेवरील व्यक्ति म्हणत असूनहि, चलनवाढ विरोधी धोरण आखतांना त्यांच्यासाठीं काहीं तरतूद करण्याचें मात्र सरकार विसरून गेलें.

या दुःखपूर्ण परिस्थितींत योग्य ती सुधारणा कशी घडवून आणावयाची तें या परिषदेला ठरवावयाचें आहे. त्यासाठीं पहिल्या प्रथम चलनवाढ कमी करण्याची एक योजना विचारपूर्वक बनवून ती सरकारपुढें व देशापुढें मांडली पाहिजे. केवळ पगारदारच नव्हेत तर, सर्वसाधारणपणें सर्वच नागरिकांना या चलनवाढीमुळें जबरदस्त तडाखा बसला असून आपल्या प्रयत्नांत त्या सर्वांचा पाठिंबा आपणास मिळविता आला पाहिजे.

## सरकारी धोरणांत बदल

त्यानंतर सरकारनें जर आपलें सध्याचें धोरण बदललें नाहीं

तर कामगार वर्गानें काय करावयाचे तेंहि आपण ठरविलें पाहिजे. सध्याचें धोरण चालू असेपर्यंत कामगार वर्गाचे हाल संपणार नाहींत. हे हाल थांबविण्यासाठीं आणि वाढत्या किंमतीपासून स्वतःचा बचाव करण्यासाठीं महागाई भत्त्यांत वाढ करून घेण्याकरितां कामगार वर्गानें कोणते उपाय योजले पाहिजेत, त्याचाहि विचार करावयास हवा. कामगारांच्या महागाई भत्त्यांत वाढ केली तर, त्यामुळें पुन्हा चलनवाढ होईल अशी सबब सरकारकडून पुढें करण्यांत येते. आणि म्हणून कामगारवर्गानें सर्व अडचणी अशाच सोशीत राहिलें पाहिजे असें सरकारनें ठरवून टाकलें आहे. परंतु सरकारची ही सबब निखालस खोटी आहे हें तुम्ही जनतेला पटवून दिलें पाहिजे. कांहीं उपाय योजना केली म्हणजे किंमती खालीं येतील असा सरकारचा विश्वास आहे. आणि त्याप्रमाणें किंमती एकदां खालीं आल्या म्हणजे मग महागाई भत्त्यांत केलेली वाढ तशीच कायम कशी राहील ? अनेक कारणांमुळें चलनवाढ झाली असून तिच्या मुळाशीच हात घालणें आवश्यक आहे. सरकारनें जर योग्य प्रकारें चलनवाढ विरोधी उपाय अमलांत आणले तर महागाई भत्ता वाढविल्यानें त्या मार्गांत विघ्नें येतील किंवा किंमती उतरणें अवघड होऊन बसेल असें मुळींच नाहीं. ज्यावेळीं किंमती वाढण्याचें बंद होऊन त्या उतरूं लागतील त्यावेळीं, महागाई भत्ताहि आपोआपच कमी होऊं लागेल. आणि अशा तऱ्हेनें किंमतींच्या चढउतारावर आधारलेल्या महागाई भत्त्यामुळें किंमतींत वाढ होण्याऐवजीं त्या उतरण्यासच मदत होणार असल्यानें तें चलनवाढविरोधी धोरणास पूरकच ठरेल. परंतु चलनान

गारांनी एकत्र येवून एखादा मार्ग अवलंबिणें अथवा आपली परिस्थिति सुधारून घेण्यासाठीं व आपल्यावरील निर्बंध दूर करण्यासाठीं लढा देणें कसें शक्य होईल ?

दोस्तहो, या सर्व प्रश्नांची चर्चा करण्यासाठीं मी आपणांस या ठिकाणीं बोलाविलें आहे. एखादें लांबलचक भाषण तुमच्यावर लादण्याची माझी इच्छा नाहीं. या प्रश्नाचें स्वरूप तुम्हाला स्पष्ट करून सांगणें एवढेंच माझें काम होतें असें मी समजतों. पुन्हा एकदां मी तुमचें आभार मानतो.

५ डिसेंबर १९४८

## घटनासमितीचें विसर्जन करा

आपल्या देशांतील लोक स्वातंत्र्यासंबंधीं दाखवीत असलेलें कमालीचें औदासिन्य पाहून एक प्रकारची निराशा वाटूं लागते. ज्यावेळीं इंग्रजांबरोबर आपला लढा चालूं होता, त्यावेळीं सर्वत्र उत्साह संचरत होता. परंतु परकीय सत्तेपासून स्वातंत्र्य मिळविल्यानंतर जनतेला त्यांत आतां रस वाटेनासा झाला आहे. राष्ट्रीय स्वातंत्र्य मिळालें म्हणजे स्वातंत्र्याचें ध्येय तडीस गेलें असेंच बहुतेक लोक बहुधा मानीत असावेत. एकदा परकीयांच्या दास्यांतून मोकळे झाल्यानंतर जनता आतां स्वतंत्रच आहे आणि त्याबाबत आतां अधिक कांहीं करावयाची जरूर नाहीं याच भ्रमांत ते असतात. स्वतंत्र जीवनाची सवयच नसल्यामुळें परकीयांकडून मिळविलेलें स्वातंत्र्य आपल्याच देशांतील मूठभर लोक हिरावून घेतील हें त्यांच्या लक्षातच येत नाहीं. राजकीय गुलामगिरीप्रमाणें इतर स्वरूपाची गुलामगिरीहि असूं शकते हें अजून त्यांना शिकावयाचें आहे.

दुर्दैवानें स्वातंत्र्य संग्रामाची उज्वल परंपरा पाठिशीं असूनहि आज ज्यांच्या हातीं अधिकाराचीं सूत्रें आलीं आहेत त्यांना देखील या प्रश्नाबद्दल आस्था वाटत नाहीं. त्याचें सारें लक्ष हातीं

सत्तेवरच केंद्रीभूत झालेलें आहे. आपण संकट कालातून जात असतांना लोकशाही स्वातंत्र्याची वाफ्कळ वडबड कशाची करतां ! असें म्हणणें ही सत्ताधारी वर्गाची फॅशनच होवून बसली आहे. हैद्राबाद संकटात आहे, काश्मीरवर संकट ओढवलें आहे असें या ना त्या संकटाविषयींच ते एकसारखे बोलत असतात. परंतु लोकांचें स्वातंत्र्य हें सर्वांत अधिक संकटांत सांपडलें आहे हें कांही त्यांच्या लक्षांत येत नाहीं. लोकांचें स्वातंत्र्य जर हिरावून घेतलें गेलें तर हैद्राबाद अगर काश्मीरची त्यांना काय मातवरी वाटणार !

आपल्या स्वातंत्र्याचें रक्षण करण्याच्या कामीं जर जनता जागृत असती तर सत्ताधाऱ्यांच्या या वृत्तीबद्दल फारशी फिर्याद करण्याची जरूर नव्हती. परंतु लोकांचें औदासिन्य आणि सत्ताधारी वर्गाची बेपर्वाई यामुळें जनतेचें स्वातंत्र्य संपुष्टांत येवून हुकूमशाहीचा मार्ग सुलभ होवून बसण्याची पाळ वेळ येवून ठेपते.

### घटनासमिति

घटना समितींत चाललेल्या कामासंबंधीं जनतेकडून जी वृत्ति दाखविली जाते ते या औदासिन्याचें सर्वोत्कृष्ट उदाहरण म्हणून दाखवितां येईल. जो देश स्वतंत्र राष्ट्र या नात्यानें पुढें येवू पहात आहे, त्याच्या दृष्टीनें घटनेइतकी महत्वाची गोष्ट दुसरी कोणतीच असूं शकणार नाहीं. राजकीय जीवन, स्वातंत्र्याचा दर्जा, सामाजिक व आर्थिक जीवनाचें स्वरूप या सर्व गोष्टी देशाच्या घटनेवरच अवलंबून असतात. आणि असें असूनहि देशाची घटना ठरविण्याबाबत येथील जनतेनें आजवर कमालीचें औदासिन्य दाखविलें आहे.

खरोखरी जनतेची ही उदासीनता इतकी भयंकर आहे कीं, राज्यकर्त्यांनी लोकांचा मतदानाचा हक्क हिरावून घेण्याचें ठरवून प्रौढ मतदानाऐवजी अत्यंत तुटपुंजा मताधिकार द्यावयाचा मनांत आणलें तर तें देखील लोक मोठ्या आनंदानें मान्य करतील. "नेहरू आणि पटेल तुमच्या हितासाठीं झटत असतांना तुम्हांला मताधिकाराची तरी जरूर काय?" असें कोणी म्हटलें तर लोक त्यालाहि मान डोलावतील.

## प्रतिगामित्वाचा बालेकिल्ला

लोकांच्या या उदासीनतेचा फायदा घेऊन सत्ताधारी गटानें घटनेचा जो मसुदा तयार केला आहे, तो अत्यंत असमाधानकारक आहे. आपल्या राष्ट्रीय जीवनाचा पाया या घटनेवर आधारला गेला तर ती हिंदुस्तानवरील मोठीच आपत्ति ठरेल. घटनेच्या या मसुद्यामुळें जनतेचें स्वातंत्र्य अबाधित राहूं शकणार नाहीं किंवा सामाजिक परिवर्तन घडवून आणणेंहि शक्य होणार नाहीं.

सध्याचाच मसुदा मंजूर झाला तर, आपली घटना म्हणजे प्रतिगामित्वाचा बालेकिल्ला होऊन बसेल व संपूर्ण लोकशाही निर्माण करण्याच्या मार्गांत त्यामुळें कमालीचे अडथळे निर्माण होतील. जनतेच्या मूलभूत हक्कांचा इतका संकोच करण्यांत आला आहे कीं, ते जवळजवळ नष्टप्रायच झाले आहेत. अंमलबजावणी खात्याला इतके भरमसाट जादा अधिकार दिले गेले आहेत कीं, त्यामुळें हुकूमशाहीला उत्तेजन मिळत आहे. प्रांतिक सरकारांच्या बाबतींतहि दोन दोन कायदेमंडळें ठेवण्यांत आल्यामुळें घटनेंतील

प्रतिगामी वृत्ति पुरतीच उघड होते. सरकारनें ताब्यात घ्यावयाच्या मालमत्तेबद्दलच्या नुकसानभरपाईची जी तरतूद करून ठेवण्यांत आली आहे, त्यामुळें पुरोगामी धोरणाचा अमलब करणें अवघड होऊन बसणार आहे. हिंदुस्तानची एक तृतियांश लोकसंख्या संस्थानातील आहे. परंतु त्यांना इतरांदतर्के लोकशाही हक्क उपभोगता येतील अशी व्यवस्था करण्यात आलेली नाहीं. आणि सरतेशेवटीं घटनेंत बदल घडवून आणण्याचे मार्ग इतके अडचणीचे करून ठेवले आहेत कीं, ही राक्षसी घटना कायमची आपल्या मानगुटीला बसणार आहे.

संपूर्ण स्वातंत्र्य आणि लोकशाही यांच्या दिशेनें हिंदुस्तानची प्रगति करून घ्यावयाची असेल तर, घटनेच्या मसुद्यात मूलभूत फरक करून घेतले पाहिजेत. परंतु आज जी घटनासमिति अस्तित्वांत आहे ती या मसुद्यात अशा तऱ्हेचे काहीं फरक घडवून आणील हें जवळ जवळ अशक्यच आहे.

संस्थानी प्रजाजनांसकट सर्व हिंदवासीयांनी प्रत्यक्ष मतदान पद्धतीनें निवडलेली नवी घटनासमितीच हें कार्य तडीस नेवू शकेल.

तसें झालें तरच कदाचित आपले लोक घटना तयार करण्याच्या कामीं खरीखुरी आस्था दाखवूं लागतील.

ही घटना आम हिंदी जनतेची म्हणून बनविण्यांत येत आहे असा सध्याच्या मसुद्याचा दावा आहे. " आम्ही हिंदुस्तानचे नागरिक गंभीरपणें असें ठरवितो इ." हे घटनेच्या मसुद्यातील सुरवातीचे शब्द आहेत. परंतु सध्याच्या घटनासमितीला हिंदी जनतेच्या वतीनें

बोलण्याचा हक्क आहे असें कोणाला तरी म्हणतां येईल कां ? तिची निवड सर्व हिंदी लोकांनी खासच केलेली नाहीं.

ही घटनासमिति प्रांत व संस्थानें यांच्या प्रतिनिधींची मिळून बनलेली आहे हें प्रसिद्धच आहे. प्रांतांतील प्रतिनिधी प्रौढमतदान पध्दतीनुसार प्रत्यक्षपणें निवडण्यांत आलेले नाहींत तर प्रांतिक कायदेमंडळातर्फे अप्रत्यक्षपणें त्यांची निवड करण्यात आलेली आहे. आणि ही कायदेमंडळें तरी कसलीं तर १९३५ च्या कायद्यान्वये फक्त १५ टक्के लोकांनीं निवडलेलीं !

याचा अर्थ असा कीं, प्रांतांतील ८५ टक्के लोकांना या घटना-समितीत प्रतिनिधित्व मिळालेलें नाहीं.

प्रांतिक कायदे मंडळाची निवड झाली त्यावेळीं मतदारांनीं त्यांच्या प्रतिनिधींना घटना समितीसारख्या एखाद्या संस्थेवर त्यांच्या-वतीनें प्रतिनिधी धाडण्याचा अधिकार दिलेला नव्हता ही गोष्टहि घटनासमितीतील प्रांतांचे प्रतिनिधी कसे अप्रातिनिधिक आहेत तेंच दाखवितें.

संस्थानी प्रतिनिधींकडे पाहिलें म्हणजे तर त्यांचें अप्रातिनिधिक स्वरूप अधिकच स्पष्ट होतें. एकंदर ६९ संस्थानी प्रतिनिधींपैकीं २८ संस्थानिकांनीं नेमलेले आहेत. आणि ४१ प्रतिनिधी "निवडून" आलेले आहेत. संस्थानिकांनी नेमलेल्या प्रतिनिधींना जनतेच्या वतीनें बोलण्याचा कसलाहि अधिकार पोहोंचत नाहीं हें उघड आहे.

आणि संस्थानांत खऱ्याखुऱ्या प्रातिनिधिक स्वरूपाच्या संस्थाच अस्तित्वांत नाहींत हें लक्षांत घेतलें म्हणजे जे ४१ प्रतिनिधी

"निवडून" आले असें म्हणण्यात येतें तेंहि जनतेचे प्रतिनिधी कसे होवूं शकत नाहींत तें स्पष्ट होतें. या ४१ प्रतिनिधींपैकी एकाचीहि निवड प्रत्यक्ष जनतेनें केलेली नाही आणि त्यांपैकी बहुतेक जण अ. भा. संस्थानी प्रजा परिषदेवर वजन असलेल्या काँग्रेस पुढाऱ्यांचे होयवा आहेत.

अशा तऱ्हेनें सध्याची घटनासमिति ही सर्वस्वी अप्रातिनिधिक स्वरूपाची आहे आणि म्हणून न्यायाची जर कांहीं चाड असेल तर ती बरखास्त झालीच पाहिजे.

हिंदुस्तानांतील सर्व जनतेनें—प्रांतांतील व त्याचबरोबर संस्थानांतीलहि—मिळून प्रौढ मताधिकारानुसार निवडलेली नवी घटना समितीच घटनेचा अखेरचा मसुदा मंजूर करण्यासाठीं बोलावण्यांत आली पाहिजे. जो स्वतःला लोकशाहीवादी म्हणवीत असेल आणि या देशांत लोकशाहीचा उदय व्हावा असें ज्याला वाटत असेल तो या मागणीला पाठिंबा दिल्याखेरीज कधींहि राहणार नाहीं. जें न्याय्य आहे तें घडवून आणण्याच्या मार्गांत मानसिक आळस किंवा संकुचित पक्षाभिनिवेश आड येतां कामा नये.

घटना समितीचें विसर्जन कोणी करावयाचें ? तें तिचे तिनेंच केलें पाहिजे. कारण तिला सार्वभौम सत्ता आहे.

१८ जुलै १९४९.

## पक्ष आणि राष्ट्रसभा

ज्यांनीं समाजवादी तत्त्वप्रणालीचा अंगिकार केला होता आणि ज्यांना राष्ट्रसभेचें ध्येयधोरण समाजवादी धरणावर नेण्याची जरूर भासूं लागली होती अशा काहीं कॉंग्रेस कार्यकर्त्यांनीं १९३४ सालीं पक्षाची स्थापना केली. त्यामुळें पक्ष आणि राष्ट्र-सभा यांचे परस्पर संबंध अत्यंत निकटचे, इतकेंच नव्हे तर, जवळजवळ घरगुति स्वरूपाचे होते. पक्ष हा कॉंग्रेसचा अधिकृत घटकावयव समजला जात नसे. किंवा तशी अधिकृत मान्यता पक्षाकडून कधीं मागण्यांतहि आली नव्हती. तथापि पक्षाचे व कॉंग्रेसचे संबंध अत्यंत घनिष्ठ होते. यच्चयावत सर्व पक्षसभासद हे निष्ठावंत कॉंग्रेससेवक होते आणि जनतेची साम्राज्यशाहीविरोधी आघाडी म्हणून कॉंग्रेसची शक्ति वाढावी यासाठीं त्यांचे सतत प्रयत्न चालू असत.

कॉंग्रेससंबंधीं पुढील उद्दिष्टें पक्षानें आपल्या डोळ्यासमोर ठेवलीं होतीं. एकः-पिळल्या गेलेल्या जनतेच्या आर्थिक लढ्याची कॉंग्रेसच्या कार्यक्रमाशीं सांगड घालून त्या कार्यक्रमांत शेतकरी व कामगार संघटनांना अग्रेसरत्व मिळवून देणें; दोन : कॉंग्रेसची घटनात्मक राजकारणाकडे होणारी घसरगुंडी व त्यामुळें स्वातंत्र्याच्या लढ्यात येणारी ढिलाई थांबविणें; तीन : स्वराज्याची व्याख्या जन-

तेच्या आशाआकांक्षांशी मिळती जुळती करून घेणें. सहाजिकच या पैकीं तिसरें उद्दिष्ट साध्य करून घेण्यासाठीं पर्यायानें सर्वेच्या सर्व काँग्रेसलाच समाजवादी कलाटणी देणें जरूर होतें. म्हणजेच तिचें रूपांतर समाजवादी संघटनेंत व्हावयास हवें.

बऱ्याचशा प्रमाणांत हीं उद्दिष्टें साध्य झालीं असलीं तरी त्याबाबतींत पक्षाला संपूर्ण यश मात्र प्राप्त झालेलें नाहीं. मध्यंतरीच्या काळांत घडलेल्या घटनांमुळें हे प्रश्न आतां अत्यंत निकडीचे होऊन बसले आहेत.

## धनिक वर्ग

आजपर्यंत काँग्रेस ही साम्राज्यशाही विरोधी सर्ववर्गीय अशी राष्ट्रीय आघाडी होती. आणि त्यामुळें परकीय सत्तेला विरोध असणारे सर्व वर्ग काँग्रेसमध्यें समाविष्ट झालेले असत. त्याचप्रमाणें स्वातंत्र्याच्या प्रश्नावर एकमत असलेल्या भिन्नभिन्न प्रवृत्तींना देखील काँग्रेसमध्यें स्थान असे. अलिकडील राजकीय घडामोडी व देशातील क्रांतिकारी शक्तींचें वाढतें सामर्थ्य यामुळें स्वातंत्र्याचा प्रश्न जवळ जवळ सुटण्याच्या मार्गाला लागला आहे. त्यामुळें सहाजिकच संयुक्त आघाडी हें काँग्रेसचें पहिलें स्वरूप हळूं हळूं नष्ट होवूं लागलें असून काँग्रेसमध्यें सत्तेसाठीं चाललेल्या भांडणांना प्रसंगी ऊत येवूं लागला आहे. संयुक्त आघाडी म्हणून काँग्रेसची वाढ झालेली असल्यामुळें आणि स्वातंत्र्यासाठीं तिनें यशस्वीपणानें लढे दिले असल्यामुळें समाजातील सर्व वर्गांचा विश्वास तिनें संपादन केला आहे. त्यामुळें ज्याच्या हातीं काँग्रेसचीं सूत्रें जातील त्याला

सत्ता मिळविणें सुलभ होणार आहे. राजसत्तेवर प्रभुत्व ठेवतां यावें म्हणून धनिक वर्ग व सत्तेचे राजकारण खेळणारे हे काँग्रेसजन यांची युति जमण्याचा फार मोठा धोका निर्माण झाला आहे. समाजवाद्यांची काँग्रेसमधून हकालपट्टी करण्याची घोषणा, काँग्रेस घटनेला लोकशाही विरोधी स्वरूप देण्याचा प्रयत्न, काँग्रेसमध्यें माजलेली कमालीची लांचखोरी आणि काँग्रेस कार्यकर्त्यांना निरनिराळ्या जागा देऊन विकत घेण्याचा मंत्रिगटानें चालविलेला प्रयत्न या सर्व घटनांमुळें काँग्रेस हा हिंदुस्तानातील हुजूर पक्ष ठरणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत.

यांतून काँग्रेसपुढें एकच पर्याय आहे. आणि तो म्हणजे समाजवादी पक्षांत स्वतःचें रूपांतर करून घेणें. या खेरीज अन्य मार्ग नाहीं. आणि हा मार्ग देखील फारसा लांबणीवर टाकतां येण्यासारखा नाहीं. मूलभूत स्वरूपाचे आर्थिक व सामाजिक प्रश्न निर्माण होत असून त्याबाबत काँग्रेसनें निश्चित निर्णय घेण्याची वेळ येऊन ठेपली आहे. अधिक राष्ट्रीय स्वरूपाच्या आड दडून असले प्रश्न यापुढें काँग्रेसला लांबणीवर टाकतां यावयाचे नाहींत. धनिक वर्ग आणि श्रमजीवी यांच्या लढ्यांत आपलें नेमकें स्थान कोणतें तें काँग्रेसनें ठरविलें पाहिजे.

काँग्रेसला समाजवादाच्या मार्गावर रेटण्याचा आणि ती धनिक वर्गाच्या हातीं पडूं न देण्याचा प्रयत्न पक्ष करील. जर हा प्रयत्न यशस्वी झाला तर, काँग्रेसची प्रतिष्ठा आणि प्रभाव खूप वाढेल. परंतु जर हे प्रयत्न यशस्वी होऊ शकले नाहींत, तर मात्र काँग्रेसमध्यें

फूट पडणें अपरिहार्य होऊन बसेल.

### समाजवाद

समाजवादी शक्ति आणि धनिकशाही यांच्यामधील झगड्या-बाबत फार मोठा गोंधळ निर्माण केला जातो. कारण समाजवाद हा शब्द अत्यंत मोघमपणानें वापरण्यांत येतो. आज राजकीय वातावरण समाजवादाला इतकें अनुकूल आहे कीं, प्रत्यक्ष धनिक वर्गाचे प्रतिनिधी आणि यच्चयावत सर्व संधीसाधू हे देखील समाजवादी घोषणांचा पुकारा करून त्याची शहवा करूं लागतात. परंतु जे स्वतःला समाजवादी म्हणवीत असतील त्यांनीं हातांत सत्ता आल्याबरोबर त्यांच्या समाजवादी निष्ठेचा पुरावा सादर केला पाहिजे. समाजवादाच्या रोखानें त्यांनीं प्रत्यक्ष पावलें टाकलीं पाहिजेत. धनिकशाहीची सत्ता त्यांनीं मोडून काढणें, किसान, कामगार, आणि इतर पिळल्या जाणाऱ्या वर्गांचे लढे उचलून धरणें आणि या लढ्यांमधूनच मुख्यतः आपली ताकद व स्फूर्ति मिळविणें या गोष्टी त्यांना करतां येण्यासारख्या आहेत. समाजवादाला स्पष्ट आकार देऊन केवळ सिद्धांतिक स्वरूपाऐवजीं त्याचें प्रत्यक्ष व्यावहारिक दर्शन घडविण्याचें दृष्टीनें हा लढा व्यापक करीत जाणें हा पक्षाचा प्रयत्न राहील. ही जबाबदारी पक्ष ज्या प्रमाणांत पार पाडूं शकेल त्यावरच काँग्रेसला समाजवादी वळण देण्याच्या कामीं पक्ष कितपत यशस्वी होतो तें ठरणार आहे.

३० मार्च ४७

## समाजवादाचें उद्दिष्ट

काँग्रेस समाजवादी पक्षाच्या मूलतत्त्वांची रूपरेखा प्रथम 'मीरत प्रबंधा'त विशद करण्यांत आली होती. पुढें फैजपूर येथें त्याचें अधिक स्पष्टीकरण करण्यांत आलें व 'फैजपूर प्रबंध' म्हणून त्याचा उल्लेख होऊं लागला. त्या गोष्टीस आता दहा वर्षें झाली. परंतु या दहा वर्षांत इतिहासातील एका संबंध कालखंडाचे अनुभव आणि घटना यांची नुसती खेचाखेच झाली आहे. सहाजिकच या आणीबाणीच्या काळांत आपल्या पक्षाच्या ध्येय धोरणांतहि प्रगति होत गेली आणि आज अशी वेळ येऊन ठेपली आहे कीं, पक्षाचा जुना प्रबंध त्या ध्येय धोरणाचा आविष्कार करण्याच्या दृष्टीनें अत्यंत अपुरा पडूं लागला आहे. त्यामुळें गेल्या दहा वर्षांतील अनुभव जमेस धरून पक्षाच्या मूलभूत धोरणाचें स्पष्टीकरण करण्याची व आपल्या पुढें आज उभ्या असलेल्या समस्या व जबाबदाऱ्या विशद करून सांगण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे.

कोणत्याहि राजकीय पक्षाचें धोरण हें त्याचें अंतिम ध्येय गाठण्याचें केवळ एक साधन असतें. म्हणून धोरण विशद करण्या-पूर्वी जें साध्य गांठण्यासाठीं तें धोरण अवलंबावयाचें तें साध्य किंवा उद्दिष्ट कोणतें तें प्रथम विशद केलें पाहिजे. पक्षाच्या घटनेत नमूद

करण्यांत आल्याप्रमाणें पक्षाचें उद्दिष्ट 'ब्रिटिश साम्राज्यापासून पूर्णपणें अलिप्त' असें संपूर्ण स्वातंत्र्य आणि समाजवादी समाजव्यवस्था निर्माण करणें हें आहे.

संपूर्ण स्वातंत्र्याचा अर्थ पुरेसा स्पष्ट आहे. आणि ब्रिटिश साम्राज्यांतून फुटून निघण्यावर घटनेंत जो भर देण्यांत आला आहे, त्यामुळें तर त्याबद्दल कसल्याहि शंकेला जागा रहात नाहीं.

## समाजवादाचें स्वरूप

समाजवादी समाजरचनेच्या उद्दिष्टासंबंधीं मात्र अधिक खुलासा करण्याची जरूर आहे. आपलें पहिलें म्हणजे संपूर्ण स्वातंत्र्याचें उद्दिष्ट साध्य होण्याची वेळ जवळ येवून ठेपली असल्यामुळें आणि समाजवादाच्या ज्या निरनिराळ्या कल्पना जनतेसमोर मांडल्या जात आहेत, त्यापैकीं एकाची निवड करणें भाग असल्यामुळें तर समाजवादी समाजव्यवस्थेबाबत स्पष्टीकरण करणें अधिकच आवश्यक झालें आहे.

## हुकूमशाही कम्युनिझम

आज मुख्यतः लोकशाही समाजवाद आणि हुकूमशाही साम्यवाद (कम्युनिझम) असे दोन पर्याय आपणापुढें आहेत. हुकूमशाही साम्यवादामध्यें (कम्युनिझममध्यें)—त्याला साम्यवाद ही संज्ञा देणेंच चुकीचें ठरेल—सत्ताधारी पक्षाखेरीज इतर सर्व पक्ष दडपून टाकले जातात; सरकारला म्हणजे सत्ताधारी नोकरवर्गाला विरोध करण्याची कसलीहि मुभा असत नाहीं, कामगार संघटना या कामगारांच्या स्वतंत्र संघटना असूं शकत नाहींत, त्यांना संप करण्याचें अथवा सरकार आणि सत्तारूढ पक्ष यांच्या संमतीशिवाय कोणतीहि गोष्ट

करतां येत नाहीं. हुकूमशाही राजवटींत कामगार संघटनांना वस्तुतः सर्वशक्तिमान अशा सरकारच्या एखाद्या पोट अवयवासारखेंच स्वरूप प्राप्त झालेलें असतें. व्यक्तीला कोठल्याहि तऱ्हेचें स्वातंत्र्य उपभोगतां येत नाहीं इतकेंच नव्हे तर त्याच्या आधीच संकोच पावलेल्या हक्कांच्या, त्याच्या नोकरीच्या येवढेंच नव्हे तर त्याच्या जीविताच्या देखील संरक्षणाची हमी घेतली जात नाहीं. अशा तऱ्हेच्या हुकूमशाही साम्यवादालाच कांहीं वेळीं "समाजवाद" म्हणून संबोधण्यांत येतें. या प्रकारच्या राज्यव्यवस्थेंत सरकारचा आपल्या प्रजेचे जीवित, स्वातंत्र्य आणि सौख्य यावर अनियंत्रित ताबा चालतो. एकपक्षीय राजवटीमुळें सरकारवर मात्र कामगार वर्गाचें कोटल्याहि प्रकारचें लोकशाही नियंत्रण राहूं शकत नाहीं. आणि जो एकच एक पक्ष अस्तित्वांत असतो त्या पक्षांतील सत्ताधारी गटाच्या हातचें तें बाहुलें बनून जातें. पक्ष, उद्योगधंदे, शेती आणि सैन्य यांतील पुढाऱ्यांचा एक स्वतंत्र वर्ग तयार होतो. तो सर्व-साधारण कामगार वर्गापासून अलग पडत जातो आणि त्यांना मिळणाऱ्या खास सवलती व सामान्य कामगारापेक्षां त्यांना मिळणारे भरगसाट पगार यामुळें त्यांचें स्थान अढळ बनूं लागतें आणि ते जरी कामगारांच्या नांवानें हुकूमत गाजवीत असले तरी, वस्तुतः कामगार मात्र त्यांच्यावर कसलेंहि नियंत्रण ठेवूं शकत नाहींत.

## लोकशाही समाजवाद

काँग्रेस समाजवादी पक्ष अशा प्रकारचा "समाजवाद" त्याज्य समजतो. पक्षाला अभिप्रेत असलेल्या समाजवादी समाज-

व्यवस्थेत संपूर्ण आर्थिक आणि राजकीय लोकशाही उपभोगावयास मिळेल. मार्क्सवादाचा असा एक सिद्धांत आहे की, लोकशाहीखेरीज समाजवाद अस्तित्वांतच येवूं शकणार नाहीं. त्यामुळें पक्षाच्या कल्पनेनुसार समाजवादी समाजव्यवस्थेत प्रत्येक व्यक्ति म्हणजे कामगार, संपूर्ण स्वतंत्र असेल व योग्य त्या कायद्याखेरीज सरकारला कोणाहि व्यक्तीचे हक्क किंवा सवलती काढून घेतां येणार नाहींत. तसेंच कामगार संघटनांचें स्वातंत्र्य अबाधित राहील इतकेंच नव्हे तर, जरूर तर त्यांना संपहि करतां येईल. कामगारांच्या इतर स्वयंस्फूर्त संघटना देखील स्वतंत्र राहतील. तसेंच सत्ताधारी पक्षाव्यतिरिक्त इतर राजकीयपक्ष स्थापन करून त्यांचें कार्य खुलेपणानें चालविण्याची मुभा राहील. वृत्तपत्रें, रेडिओ अथवा प्रचाराची इतर साधनें यावर सरकारची मिरासदारी राहणार नाहीं. कामगारांचे संघ, त्यांचे पक्ष, सामुदायिक सहकारी संस्था, म्युनिसिपालिट्या आणि कामगारांच्या इतर संस्था यांना स्वतःची वृत्तपत्रें आणि प्रचार साधनें वापरतां येतील. सरकार किंवा सरकारी नोकर अथवा एकादें खातें यावर टीका करण्याचा अथवा त्याला विरोध करण्याचा प्रत्येक कामगाराला घटनेनुसार हक्क बहाल करण्यांत आलेला असेल व त्यास सरकारी वृत्तपत्रांतून आपलें विचार व्यक्त करतां येतील. अशा तऱ्हेच्या समाजवादी समाजव्यवस्थेत सर्व आर्थिक सत्ता म्हणजे उत्पादनाचें नियोजन करण्याची, कामाची परिस्थिति, किंमती, राष्ट्रीय उत्पन्नाचें वाटप करण्याची वगैरे सर्व सत्ता केवळ सरकारी नोकरशाहीच्या हातीं न राहतां कामगार संघटना, सहकारी संस्था आणि कामगार वर्गाच्या

इतर सोयिस्कर प्रातिनिधिक संस्था यांचें देखील त्यावर नियंत्रण राहील, सरकारी अधिकारी, विशेषतः पोलिस व न्यायखातें, यामधील वरिष्ठ अधिकाऱ्यांची योग्य त्या मतदारांकडून निवड केली जाईल व त्यांना कमी करण्याचा अधिकारहि मतदारांकडे राहील. सामान्य पगाराच्या प्रमाणापेक्षां कोणाचेंहि उत्पन्न फारसें जास्त असणार नाहीं. आणि वरिष्ठ पगारदारांच्या मुलांना कसल्याहि प्रकारच्या खास सवलती मिळणार नाहींत. सरकारी आर्थिक व्यवहार हे शक्य तितके सुलभ केले जातील. म्हणजे सामान्य जनतेला त्यांत जास्तींत जास्त भाग घेणें शक्य होईल.

लोकशाही समाजवादाची हीं मूलतत्वें असून पक्ष त्यालाच चिकटून राहील व त्याच्या अनुरोधानेंच पक्षाचें भावी धोरण आखण्यांत येईल. परंतु पक्षाला अभिप्रेत असलेल्या समाजवादाचें हें संपूर्ण चित्र मात्र नव्हे. समाजवादाची हुकूमशाहींत अवनती होवूं नये यासाठीं कोणत्या तरतुदी केल्या जातील त्याचें हें स्थूल दर्शन आहे.

## समाजवादी लोकशाहीचें अपयश

दोन युद्धाच्या मधील काळात यूरोपांत हुकूमशाही कम्युनिझम मधील उणीवा जशा प्रत्ययाला आल्या, त्याचप्रमाणें समाजवादी लोकशाहींतील–विशेषतः जर्मनींतील क्रांतिकाळांत–कमकुवतपणाहि स्पष्टपणें नजरेस आला. जर्मनी आणि यूरोपमधील इतर देशांतील समाजवादी लोकशाही चळवळींच्या बाबतींत प्रामुख्यानें जर कोणती गोष्ट प्रत्ययास आली असेल तर, ती म्हणजे क्रांतिकाळांत किंवा

आणीबाणीच्या प्रसंगी कोणताहि निश्चित निर्णय न घेणें ही होय ! ज्यावेळीं ऐतिहासिक घटनांचा रेटा निश्चित निर्णय घेऊन कांहीतरी क्रांतिकारी कृतीची अपेक्षा करीत होता, त्यावेळीं हिंसा आणि अशांतता माजेल या भयानें आणि सिद्धांतिक कल्पनांच्या जाळ्यात गुरफटून समाजवादी लोकशाही पक्षांनीं आपल्यावरील ऐतिहासिक जबाबदारी विसरून लोकशाही आणि सनदशीरपणा यांच्या नांवाखाली मांडवलशाहीला आपलें आसन स्थिर करण्याची संधी दिली. समाजवादी लोकशाही पक्षांचें हें कचखाऊ धोरण, त्यांनीं केलेल्या घोडचुका आणि जागतिक कम्युनिस्टांनीं वापरलेली भेदनीति यामुळेंच अखेर नाझीशाही सत्तारूढ होणें शक्य झालें.

म्हणून समाजवादी पक्षाचा लोकशाही समाजवादावर संपूर्ण विश्वास असला आणि हुकूमशाही कम्युनिझममधील धोक्यांची पुरेपूर जाणीव असली तरी, क्रांतिमार्गापासून पक्ष कधीहि च्युत होणार नाहीं. क्रांति आणि लोकशाही यांत पक्षाला कसलीहि विसंगति वाटत नाहीं. मांडवलशाही क्रांतीनें मांडवलशाही लोकशाहीला जन्म दिला, त्याचप्रमाणें समाजवादी क्रांतीमधून समाजवादी लोकशाही जन्मास येईल.

### समाज — एकवर्गीय कीं वर्गविहीन ?

मांडवलशाही समाजपद्धति ही खाजगी नफ्यासाठीं होणाऱ्या कामगार वर्गाच्या पिळवणुकीवर आधारलेली आहे. स्वतंत्र मांडवलशाही पद्धतींत ही पिळवणूक किती आणि कशाप्रकारें चालावी तें मांडवलदार वर्ग ठरवीत असतो. नियंत्रित मांडवलशाहींत हें कार्य मुख्यतः

सरकार मार्फत होतें. परंतु अशावळीं खुद्द सरकारवरच भांडवलदार वर्गाचें फार मोठें नियंत्रण असतें. त्यामुळें भांडवलशाही समाजव्यवस्थेंत सरकारनें नफा, मजुरी आणि किंमती यावर नियंत्रणें बसवलीं तरी त्या समाजाच्या आर्थिक चौकटीवर त्याचा फारसा परिणाम घडून येत नाही. समाजवादी समाजव्यवस्थेंत ती चौकट संपूर्णपणें -अगदीं आमूलाग्र, बदललेली असते. समाजवादी समाजव्यवस्थेंत भांडवलशाहीच अस्तित्वांत नसते. म्हणजे वाढवा संपत्ति निर्माण करण्याकरतां ज्या उत्पादन साधनावर श्रमशक्ति खर्च केली जाते अशा उत्पादन साधनांवर खाजगी मालकी असणाराचा वर्गच समाजवादी समाजव्यवस्थेत नष्ट झालेला असतो. भांडवलशाही, एक तर लोकशाही पद्धतीनें अथवा क्रांति करून नष्ट करता येईल. मार्ग कोणताहि वापरला तरी समाजवादी समाजव्यवस्थेंत भांडवलदार वर्गाचें अस्तित्व राहूं शकत नाहीं. त्याचप्रमाणें जमिनदार किंवा बडे शेतमालक यांच्या सारखा दुसरा एकादा पिळवणूक करणाराचा वर्गहि असूं शकत नाहीं. पिळवणूक करणाऱ्या वर्गाचा बीमोड याचा अर्थ असा कीं, समाजांत फक्त एकच वर्ग शिल्लक उरतो आणि तो म्हणजे कामगारांचा; मग ते कामगार कारखान्यांत, शेतांत, कचेऱ्यांत किंवा अन्य धंद्यांत कोठेंहि काम करीत असोत. अशा प्रकारच्या समाजपद्धतींत सरकार हें कामगारांचें असतें. वर सांगितलेल्या प्रकारची राजकीय आणि आर्थिक स्वरूपाची लोकशाही अस्तित्वांत असेल तर तें सरकार नोकरशाही किंवा हुकूमशाही स्वरूपाचें बनण्याची शक्यता उरत नाहीं.

## उत्पादनाचें सामाजीकरण

भांडवलशाहीमध्यें भांडवलदाराच्या अथवा जमिनदाराच्या मालकीची मालमत्ता असते. ती समाजवादामध्यें कामगारांच्या ताब्यात जाते. मात्र कोणाहि कामगाराची त्यावर वैयक्तिक मालकी न राहतां ती सामुदायिक राहते. निराळ्या भाषेत सांगावयाचें तर, सरकार त्याचे निरनिराळे घटकावयव, नगरपालिका, ग्रामपंचायती, सहकारी संस्था आणि इतर तत्सम सामुदायिक संस्था आणि सर्व आर्थिक व्यवहार बघणारे व्यवस्थापक व डायरेक्टर्स या सर्वांचा मिळून त्या मालमत्तेवर ताबा राहतो. संरक्षण आणि इतर पायाभूत उद्योगधंदे यासारख्या मोठ्याप्रमाणावरील सर्व उद्योगधंद्यांची मालकी व व्यवस्था सरकारकडेच असते. विनिमयाच्या आणि इतर लहानप्रमाणावरील धंद्यावर मात्र अन्य सामुदायिक संस्थांची मालकी चालते. जमिनीची मालकी खेड्यातील सर्वच्या सर्व जमातीकडे मिळून सोपविण्यांत येते, आणि त्या जमिनींपैकीं कांहीं किमान अथवा कमाल एकर इतकी जमीन प्रत्येक शेतकऱ्याला दिली जाते. त्या जमिनींची लागवड मात्र सहकारी संस्थेमार्फत केली जाते आणि प्रत्येक शेतकरी हा त्या सहकारी संस्थेचा सभासद असतो.

### व्यापार आणि बँकिंग

अगदी छोट्याप्रमाणावर चालणारा आजूबाजूचा व्यापार खाजगी व्यक्तींच्या हातीं राहूं दिला जातो. परन्तु त्याव्यतिरिक्त इतर सर्व व्यापार हा सरकार मार्फत किंवा त्यासाठीं काढण्यात आलेल्या सहकारी संस्थांमार्फतच चालतो. बँकिंगचे सर्व व्यवहार देखील

संपूर्णपणें सरकारच्याच ताब्यांत असतात.

## तंत्रशास्त्र व विज्ञान

सध्याच्या समाजपद्धतींतील अर्थव्यवस्था खाजगी नफ्यावर आधारलेली असते. समाजवादी समाजपद्धतींत मात्र मानवी गरजा पुऱ्या करणें हेंच साऱ्या आर्थिक व्यवहारांचें उद्दिष्ट असतें. हिंदुस्तान हा कमालीचा दरिद्री देश आहे. आपल्या देशाच्या गरजा भागवि-ण्याच्या दृष्टीनें पुरेसें उत्पादन सध्या होत नाहीं. आज समाजांत ज्यांना खास मानाच्या जागा प्राप्त झाल्या आहेत, ते आपल्या देश-बांधवांचा वाटा हिरावून घेतात असें मानलें तरी देखील सर्व लोक-संख्येच्या प्राथमिक गरजा भागूं शकतील इतकी निर्मिति आज होत नाहीं. यावरून हें उघड आहे कीं, आजच्या उत्पादनात कितीतरी पटीनें वाढ होणें जरूर आहे.

विज्ञान आणि तांत्रिक शोध यांच्या सहाय्यानें श्रमशक्ति अधिक उत्पादक केल्याखेरीज उत्पादन वाढणें शक्य नाहीं. त्याच-प्रमाणें समाजवादी समाजव्यवस्थेंत मानवी श्रम अधिकाधिक उत्पादनक्षम बनवीत जाणें एवढाच उद्देश नसतो तर, उत्पादनक्षमता वाढवीत असतानाच कामगाराला कंटाळवाणें किंवा थकल्यासारखें वाटणार नाहीं, त्याला विश्रांति व करमणूक यासाठीं अधिक अवसर मिळेल आणि जास्त सुख उपभोगता येईल अशी व्यवस्था करण्याचाहि प्रयत्न केला जातो. अशा तऱ्हेनें श्रम अधिक उत्पा-दनक्षम आणि कमी त्रासदायक करण्यासाठीं विज्ञान आणि तंत्र-शास्त्र यांचा जास्तींत जास्त उपयोग करून घेणें आवश्यक आहे.

## छोटे विरुद्ध मोठे उद्योगधंदे

मोठ्या प्रमाणावरील उद्योगधंदे आणि छोटे छोटे उद्योगधंदे यासंबंधीं सतत चालत आलेला वाद याठिकाणीं उपस्थित करणें अप्रस्तुत ठरेल. समाजवादी समाजव्यवस्थेचें ध्येय भौतिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या जीवनाचा जास्तींत जास्त वरचा दर्जा गांठणें हें असतें. म्हणून विज्ञान, तंत्रशास्त्र, कला या सर्वांचा तें ध्येय साध्य करण्यासाठीं शक्य तितका उपयोग करून घेतला जातो. सर्व प्रकारचें उत्पादन, मग तें मोठ्या प्रमाणावरील असो या लहान प्रमाणावरील असो, केंद्रीभूत असो या विकेंद्रित असो, तें जनतेची गरज, आरोग्य आणि कलात्मकता यांच्याच कामीं लावलें जातें.

## योजनाबद्ध विकास

भांडवलशाही पद्धतींत जनतेच्या गरजा आणि उत्पादन याच्यात कमलाहि मेळ नसतो. उत्पादन हें सर्वस्वी बाजारावर अवलंबून असतें. आणि भांडवलशाही बाजारात सामाजिक गरजांचें प्रतिबिंब न पडता ग्राहक किती पैसा शिल्लक टाकूं शकतो आणि किती खर्च करू शकतो याचेंच प्रतिबिंब पडलेलें असतें. निराळ्या शब्दात सांगावयाचें तर, मजुरी आणि नफा यांच्या परस्पर संबंधावर भांडवलशाही पद्धतींतील बाजार अवलंबून असतो व त्या बाजाराच्या अनुरोधानें उत्पादन होत असतें. त्यामुळें भांडवलशाही पद्धतींतील उत्पादन हें अनुपयुक्त व योजनारहित असें असतें.

समाजवादी समाजव्यवस्थेंत समाजाच्या गरजा भागविणें हें उत्पादनाचें उद्दिष्ट असल्यामुळें त्या गरजानुसार तें करण्यात येतें.

म्हणजे सामाजिक गरजा लक्षात घेऊन एक निश्चित योजना आखण्यात येते व त्या बरहुकूम उत्पादन केलें जातें.

## विकेंद्रित नियोजन

परंतु नियोजन पद्धतींतहि एक धोका असतो. असें आढळून आलें आहे कीं, नियोजनाचे सर्व अधिकार केंद्रीय सत्तेच्या हातीं सोंपविण्यात आले तर, त्यामुळें हुकूमशाही आणि नोंकरशाही प्रवृत्ति निर्माण होते. परंतु नियोजित अर्थव्यवस्थेचें स्वरूपच असें आहे कीं, राष्ट्राचे प्राणभूत उद्योगधंदे, अयात निर्यात, चलन, वस्तूंच्या किंमती, भांडवलाचा पुरवठा वगैरे बाबतींत मध्यवर्ति सत्तेकडून नियोजन होणेंच क्रमप्राप्त असतें. परंतु त्यातील दुष्परिणाम जर टाळावयाचे असतील तर स्थानिक नियोजनाच्या बाबतींत, विशेषतः स्थानिक ठिकाणीं वापरल्या जाणाऱ्या वस्तूंच्या बाबतींत तरी त्या त्या ठिकाणच्या जनतेला नियोजनाचें कामीं जास्तीत जास्त विश्वासांत घेणें जरूर आहे. त्याचप्रमाणें मध्यवर्ति नियोजन समितीची रचना अशा तऱ्हेनें करण्यात यावी कीं, ती जास्तोत जास्त प्रातिनिधिक बनेल. म्हणजे मध्यवर्ति सरकारप्रमाणेंच प्रांतिक सरकार सहकारी संस्था आणि कामगार संघ याचेहि प्रतिनिधी त्या समितीवर असावेत.

## शहरें व खेडीं

भांडवलशाही अर्थव्यवस्थेत विशेषतः हिंदुस्तानांत खेड्यांची धुळधाण होण्यास शहरें कारणीभूत झालीं आहेत. समाजवादी हिंदुस्तानात शहरें व खेडीं यातील हा विरोध नष्ट करण्यांत येईल. आणि भांडवलशाहीपद्धतींत पैशाच्या जोरावर खेड्यापाड्यांची नाडण-

चालविली जाते ती थांबविण्यांत येईल. नागरी आणि ग्रामीण जीवन-मानांत आज जो तफावत दिसून येते ती राहणार नाहीं. आणि कामगार व शेतकरी यांना त्यांच्या श्रमाबद्दल सारखें वेतन मिळूं लागेल.

## संस्थानिकांचें उच्चाटन

आज हिंदुस्तान देश संस्थानी मुलुख, ब्रिटिश हिंदुस्तान व इतर परकीय देशांनी व्यापलेले टापू यामध्यें विभागला गेला आहे. समाजवादी हिंदुस्तानांत अशा तऱ्हेची विभागणी राहणार नाहीं. सबंध हिंदुस्तानांत लोकशाही समाजवादी राज्यपद्धति अस्तित्वांत येईल. आणि संस्थानिक अथवा सरंजामदार याना त्यामध्यें कसलेंहि स्थान उरणार नाहीं. संस्थानिक आणि त्याचे पाठिराखे हे क्रांतीमुळें नष्ट होतील, अथवा संस्थानि जनतेच्या मतदानामुळें त्याचें उच्चाटन होवों, एक गोष्ट निश्चित कीं, संपूर्ण समाजवादाची प्रस्थापना होण्यापूर्वी हा वर्ग नष्ट झालेला असेल. समाजवादांत सर्व व्यक्तींचा दर्जा समान असतो आणि संस्थानिक व त्याचे प्रजाजन यामधलि घटनात्मक अंतर देखील समाजवादाच्या दृष्टीनें गैरलागू ठरतें.

## धर्म

समाजवाद हा बुद्धिप्रामाण्यावर आधारलेला असला तरी, धर्माच्या बाबतींत तो ढवळाढवळ करीत नाहीं. समाजवादी हिंदुस्तानात धर्माचें स्थान सर्वस्वी स्वतंत्र राहील.

## जात

हिंदुस्तानांत आर्थिक विषमतेव्यतिरिक्त, विशेषतः हिंदू समा-

जांत, सामाजिक विषमताहि अस्तित्वांत आहे. जातीपातींचे निर्बंध हे समाजविघातक, लोकशाहीविरोधी आणि जुलमी ठरतात. कारण त्यामुळें मानवामानवांत उच्च-नीच, स्पृश्य-अस्पृश्य असे भेद पडतात व मानवी स्वातंत्र्याचा संकोच होऊन आर्थिक व्यवहारांतहि त्यामुळें अडथळे निर्माण होतात. समाजवादी हिंदुस्तानांत ही पद्धति अस्तित्वांत राहूं शकणार नाहीं; आणि जातीवर आधारलेला कसलाहि पक्षपात चालूं दिला जाणार नाहीं.

## स्त्रिया

१ हिंदुस्तानांतील आजच्या स्त्रिया या दडपल्या व पिळल्या गेलेल्या आहेत. समाजवादात स्त्रीचें स्थान पुरुषाच्याबरोबरीचें राहील व स्त्री म्हणून त्यांचेबाबतींत कसलाहि फरक केला जाणार नाहीं.

## समाजवाद

समाजवादी समाजाचें आपलें चित्र हें असें आहे. अशा प्रकारचा समाज हा लोकशाही प्रधान असेल. त्या समाजातील प्रत्येक व्यक्ति ही श्रम करणारी असेल, आणि सर्व स्त्रीपुरुषाचा दर्जा समान असेल. समाजांतील प्रत्येक घटकाला समान संधी मिळेल आणि कोणाच्याहि पगारामध्यें स्वतंत्र वर्ग निर्माण होण्याइतकी तफावत असणार नाहीं. राष्ट्रांतील सर्व संपत्तीवर समाजाची मालकी राहील. राष्ट्राचा विकास योजनाबरहुकूम घडवून आणण्यांत येईल. कामगारांना त्यांचे श्रम आनंददायी आणि उपयुक्त वाटतील; आणि व्यक्तीचें जीवन अधिक समृद्ध, सौख्यपूर्ण आणि कलात्मक असें असेल.

२३ मार्च १९४७

## कामगार चळवळींतील नवें पाऊल

हिंद मजदूर सभा ही इतर कामगार संस्थाप्रमाणेंच एक मध्यवर्ति कामगार संघटना आहे कीं कामगार चळवळींतील तें एक नवें पाऊल आहे ही गोष्ट काळच ठरवूं शकेल. माझ्या दृष्टीनें तिचें स्वरूप कसें असावें तें मी तुमच्या समोर ठेवणार आहे.

इतर अनेक चळवळींप्रमाणेंच कामगार चळवळीचीं दोन अंगें आहेत. एक आर्थिक, आणि दुसरें राजकीय. या दोन्ही अंगांच्या दृष्टीनें हिंद मजदूर सभेचें परीक्षण मी करणार आहे.

### हिंदी यूनियन्सचें स्वरूप

हिंदुस्तानांतील कामगार चळवळीचा ज्यांना अनुभव आहे, त्यांना तिची प्रगति किती बाल्यावस्थेंत आहे तें ठाऊक आहे. उदाहरण म्हणून हिंदुस्तानांतील सर्वांत मोठी कामगार संघटना, जी अखिल भारतीय रेल्वे कामगार फेडरेशन तिच्याकडे बोट दाखवितां येईल. या संघटनेला जोडलेल्या यूनियन्सची एकूण सभासद संख्या साडे चार लाख आहे. इतकी व्यापक संघटना अमेरिका किंवा यूरोपांतील एखाद्या देशांत असती तर, तिचें स्वरूप कसें दिसलें असतें? तिची एक सुसज्ज अशी मोठी मध्यवर्ती कचेरी दिसली असती. एक ग्रंथालय, संशोधन खातें, स्वतःचा छापखाना, निय-

तकालिकें, पुरेसा निधी, कायदेशीर सल्लागार, सहकारी संस्था, शाळा इत्यादि सारखीं विधायक व सांस्कृतिक कार्यक्रम चालविणारीं खातीं ठिकठिकाणीं पहावयास सांपडलीं असतीं. त्या संघटनेमार्फत शिकून तज्ञ झालेले आणि त्या उद्योगधंद्याच्या व्यवस्थापकाशी किंवा सरकारी मंत्र्याशी त्याच्या बरोबरीनें व तितक्याच अधिकारवाणीनें बोलूं शकतील असे त्या संघटनेचे अधिकारी दिसले असते. अ. भा. रेल्वे कामगार फेडरेशन स्थापन होऊन अनेक वर्षे झालीं असलीं तरी त्यांपैकीं फारच थोड्या गोष्टी तिच्याजवळ आहेत.

## पुढाऱ्यांचीं यूनियन

हिंदुस्तानातील सर्व साधारण कामगार संघटनेकडे पाहिलें तर, आपल्याला काय आढळून येतें ? तिचें सभासदत्व हें नेहमी अस्थिर असतें; कधी कमी तर कधी अधिक सभासदांची वर्गणी वर्षाकाठीं जमविली जाते. अशानें कामगारांना आपली संघटना मजबूत करण्याबद्दल आस्था कशी वाटणार ? यूनियनचे सभासद झाल्याबरोबर आपल्या पदरात चार पैसे अधिक पडतात किंवा नाहीं, एवढेंच कामगार पाहतो. कामगाराच्या या वृत्तीमुळें आपल्या संघटनेकडे पाहण्याची त्याची दृष्टी बव्हंशी मतलबी किंवा सौदेबाजीची असते आणि असें असूनसुद्धा यूनियनची मामुली वर्गणी भरण्यासही तो काकूं करीत असतो. यूनियनशीं एकरूप होऊन तिच्या शक्तीवर भरवसा ठेवण्याची वृत्ति कामगारात क्वचितच दिसते. आपला लढा एकादा पुढारी जिंकून देईल, असेंच ते मानतात. हिंदुस्तानातील यूनियन्स या कामगारावरून ओळखल्या जाण्याऐवजीं

त्यांच्या पुढाऱ्यांवरूनच ओळखल्या जातात.

## कार्यकर्त्यांचा दर्जा

कामगार कार्यकर्त्यांची तऱ्हाहि अशीच आहे. त्या त्या धंद्यातील किरकोळ खांचाखोचांची माहिती असणारे, संघटनेचे आडाखे बसवून ठेवलेले आणि मालकाला भरपूर शिव्या देऊन कामगारांना भरमसाठ आश्वासनें देणारे असेच कार्यकर्ते फार आढळतात. ज्या धंद्यांतील संघटनांत ते काम करतात, त्याची पूर्ण माहिती असणारे, कामगार चळवळीचा आणि संघटनाशास्त्राचा अभ्यास केलेले, कामगारांच्या प्रश्नांची आणि कायद्यांची माहिती असणारे, असे फारच थोडे कामगार कार्यकर्ते या देशांत माझ्या पाहाण्यांत आले आहेत. ज्या ठिकाणीं कामगार पुढाऱ्यालाच स्वतःच्या लोकप्रियतेसाठीं आणि पुढारीपणासाठीं भंपक आणि बाष्कळ प्रचारबाजीवर अवलंबून राहावें लागतें, त्याठिकाणच्या कामगारांच्या राजकीय आणि सामाजिक जागृतीची पातळी पाहिजेपेक्षां कमी असेल यांत नवल काय?

## नवा मनु

हिंद मजदूर सभा या सर्वच बाबतींत एक नवें परिवर्तन घडवून आणील अशी मला आशा आहे. कामगार संघटनांना त्यांचें दैनंदिन कार्य चालविण्यासाठीं, त्यांच्या कायदेमंडळांतील व सरकारी समित्यांवरील कामकाजासाठीं जरूर तें साहित्य व मालमसाला पुरवून त्यांना मार्गदर्शन करील अशा अभ्यासू तज्ज्ञांचा एक संच पहिल्या प्रथम हिंद मजदूर सभेनें उभा केला पाहिजे. एक नमुनेदार अभ्यासक्रम आंखून किमान एक तरी कामगार विद्यालय तिनें

चालविलें पाहिजे. औद्योगिक लोकशाहीच्या निर्मितीसाठीं कामगारात योग्य ती जागृति घडवून आणण्याच्या दृष्टीनें एक कार्यक्रम आखून तिला जोडल्या जाणाऱ्या संघटनाच्या सहकार्यानें कामगारांच्या शिक्षणाची एक प्रचंड मोहीम तिनें काढली पाहिजे.

हिंद मजदूर सभेला जोडल्या जाणाऱ्या कामगार संघटना खऱ्या कामगार संघटना असाव्यात. त्यांची सभासद संख्या खरी आणि स्थिर असावी. त्याचे हिशेब व निधि व्यवस्थित ठेवला व वापरला जावा. आणि त्याचें अस्तित्व हें केवळ 'कामगारांतील असंतोषावर अवलंबून न राहाता त्याच्या दैनंदिन व विधायक कामावर आधारलेलें असावें. त्याचे पदाधिकारी शक्यतों कामगारांमधूनच पुढें आलेले असावेत.

### काँग्रेसचा हुकूमी पत्ता

कामगार चळवळीचें राजकीय अंग हें तिच्या आर्थिक अंगापेक्षा कोठल्याहि प्रकारें कमी महत्वाचें नाहीं. उलट दूरवर विचार केला असता, तेंच तिचें अधिक महत्वाचें अंग आहे असें दिसून येईल.

संकुचित पक्षहित पाहाणारे लोक कामगारांचा उपयोग स्वतः-साठीं करीत आहेत असें म्हणण्याची काँग्रेस गोटांत फॅशनच पडून गेली आहे. लोकांची दिशाभूल करण्यासाठीं काँग्रेस आज सर्व प्रकारचे बरेवाईट मार्ग वापरीत आहे. आणि कामगारांची दिशाभूल होत असल्याचा कांगावा हा त्या बाबतींतील उच्चांक आहे. काँग्रेसनें कामगार क्षेत्रात नुकाच प्रवेश करून 'इंटक' ची स्थापना

केली आहे. 'इंटक'च्या प्रस्थापनेचा मूळ हेतूच मुळीं कामगारांची फसवणूक करून त्यांना भलत्याबुऱ्या मार्गानें कॉंग्रेसच्या दावणीला बांधणें हा आहे. कॉंग्रेसनें जर सन्मार्गाचा अवलंब केला असतां तर कम्युनिस्टांपेक्षां अधिक धोका कॉंग्रेसवाल्यांपासून कामगार चळवळीला पोहोंचला नसता. परंतु कॉंग्रेस सत्तारूढ असल्यानें प्रतिपक्षाच्या संघटकांना अटक अथवा हद्दपार करणें इत्यादि अनेक मार्गांचा अवलंब इतर कामगार संघटनांना चिरडून टाकण्यासाठीं ती करीत आहे. मालकांवर किंवा व्यवस्थापकावर दाब आणून कामगारांच्या अगदीं न्याय्य मागण्याहि धुडकावून देण्यास त्यांना भाग पाडणें आणि अशा रीतीनें प्रतिस्पर्धी यूनियनला संपाचा निर्णय घेण्यास भाग पाडून मग कायद्याच्या बडग्यानें ती संघटना मोडून काढणें हा तर कॉंग्रेसवाल्यांचा एक हुकुमी पत्ताच होऊन बसला आहे.

## समाजवादी पक्षाचें ध्येय

एखाद्या राजकीय पक्षानें कामगार चळवळीचा उपयोग स्वतः-च्या फायद्यासाठीं करून घेणें निराळें, आणि कामगार चळवळीचा राजकीय आशा आकांक्षा प्रतिबिंबित करणारा पक्ष बनणें निराळें. आपली स्वतःची सत्ता टिकविण्यासाठीं कॉंग्रेस कामगार चळवळीचा उपयोग करीत आहे. तर याच्या उलट इंग्लंडमध्यें अधिकारावर असलेला मजूर पक्ष हा कामगारांचाच पक्ष असूनहि तो कामगार संघटनेच्या पायावर तो उभा आहे.

हिंद मजदूर सभेमार्फत कामगारांचा उपयोग स्वतःच्या राज-

कारणासाठीं करून घेण्याचा समाजवादी पक्षाचा उद्देश नाहीं. तर कामगार संघटनावर ज्याची उभारणी झाली आहे आणि कामगारांच्या राजकीय आशा आकांक्षाचे पडसाद जो उमटवीत आहे, असा पक्ष बनण्याची समाजवादी पक्षाची उमेद आहे. कामगारांचा उपयोग स्वतःच्या राजकारणासाठीं करण्याऐवजी समाजवादी पक्षाला कामगारांचाच पक्ष बनावयाचें आहे.

कामगार वर्गापुढें दोन सवाल आहेत. एक म्हणजे सध्याच्या परिस्थितीविरुद्ध झगडून स्वतःचें जीवनमान सुधारण्याचा; आणि दुसरा भांडवलशाहीच्या तडाख्यांतून देशाची सुटका करण्यासाठीं देशाचें राज्ययंत्र ताब्यांत घेऊन कामगार राज्याची प्रस्थापना करण्याचा. पहिला सवाल कामगार संघटनेमार्फत सुटूं शकेल. आणि दुसरा कामगारांच्या राजकीय पक्षामार्फत सिद्धीस जाईल. म्हणून कामगार संघटना आणि कामगारांचा राजकीय पक्ष यामधील परस्परसंबंधास एक विशिष्ट महत्व असतें. कामगारवर्गाचें अधिष्ठान नसलेला राजकीय पक्ष स्वतःला कामगार पक्ष म्हणवून घेऊं शकत नाहीं. केवळ एखाद्या अडचणीच्या प्रसंगीं कामगारांचा पाठिंबा मिळविल्यानें किंवा त्यांची मतें मिळविल्यानें हें अधिष्ठान प्राप्त होणार नाहीं. अमेरिकेच्या गेल्या अध्यक्षीय निवडणुकींत तेथील कामगारांनी डेमोक्रॅटिक पक्षाला आपला पाठिंबा दिला होता. पण तेवढ्यामुळें कांहीं तो पक्ष कामगारपक्ष ठरूं शकत नाहीं. खरा कामगार पक्ष हा मुळांतच कामगारांतून निर्माण झाला पाहिजे. ज्यावेळी संघटित कामगारांचे निरनिराळ्या यूनियन्सचे प्रतिनिधी एकत्र येऊन अशा प्रकारच्या पक्ष ची उभारणी करतील तेव्हांच ही गोष्ट होऊं शकेल.

## कम्युनिझमचे सर्वांत मोठे शत्रू कम्युनिस्टच

एक सामाजिक ध्येय म्हणून कम्युनिझम ( साम्यवाद ) जगांतील अनेक लोकांचें स्फूर्तिस्थान बनला आहे. समाजवाद या शब्दापेक्षां साम्यवाद या शब्दाला कितीतरी जुना इतिहास आहे. समाजवाद हा शब्द युरोपीय वाङमयात १८व्या शतकापूर्वी वापरण्यात आलेला नाही. परंतु साम्यवाद ( कम्युनिझम ) हा शब्द मात्र जुन्या ग्रीक इतिहासातहि आढळतो. त्याचप्रमाणें स्पार्टन लोकांच्या साम्यवादाचाहि उल्लेख आढळतो. शास्त्रशुद्ध भाषेत बोलावयाचें तर साम्यवाद आणि समाजवाद यांचें सिद्धान्तिक अधिष्ठान आणि त्यांची मांडणी ही सारखीच आहे. तथापि रशियांत कम्युनिस्ट पार्टी अधिकारारूढ झाल्यापासून साम्यवाद या शब्दाला एक नवाच अर्थ प्राप्त झाला आहे. सध्या तेथें असलेली एकतंत्री राजवट आणि रशियांतील सत्ताधारी पक्षाच्या धोरणांत वेळोवेळीं होत जाणारे स्थित्यंतर म्हणजेच साम्यवाद अशी कल्पना रूढ होत चालली आहे.

कम्युनिस्ट आजहि मार्क्सच्या नांवाचा हवाला देतात. ही गोष्ट खरी आहे. परंतु धर्माप्रमाणेंच राजकीय बाबतींतहि इतिहासाचा अनुभव असा विचित्र आहे कीं, जे अनुयायी आपल्या गुरूच्या शिकवणीचा जास्तींत जास्त विपर्यास करतात, तेच आपण खरे

एकनिष्ठ अनुयायी आहोत असा उच्च स्वानें बकवा करीत असतात. समाजवादाच्या द्रष्ट्याची शिकवणूक अमलांत आणण्याऐवजी, बरोबर त्याच्या उलट कृत्यें करण्यासाठींच त्या द्रष्ट्याचें-- मार्क्सचें नांव वापरलें जातें.

## अशांतता माजविण्याचा कार्यक्रम

हिंदुस्तानांत साम्यवादाच्या शत्रूंनीं केलेल्या विरोधी प्रचारापेक्षा देखील कम्युनिस्ट पक्षाच्या कृत्यामुळेंच साम्यवादाची अधिक बदनामी झाली आहे. जानेवारी १९४८ पासून हिंदी कम्युनिस्ट पक्षाने खून, लूटमार, जाळपोळ, घातपात, आणि एकंदर अशांतता निर्माण करणें या कार्यक्रमाचा उघड उघड अवलंब केला आहे.

मार्क्सवादांत जशा इतर अनेक गोष्टी अंतर्भूत आहेत, त्या-प्रमाणेंच समाज परिवर्तन घडवून आणण्याची एक क्रांतिकारी पद्धत म्हणूनहि मार्क्सवादाकडे बघितलें जातें. तथापि मार्क्सवादाला अभिप्रेत असलेला क्रांतिकारी मार्ग कटबाजी किंवा दहशतवादी संस्था स्थापन करणें हा खासच नव्हे.

मार्क्सवाद हा कांहीं बॉम्ब पिस्तुलवाल्यांचा संप्रदाय नाहीं. उलट मार्क्सवाद म्हणजे जनताक्रांतीचें, पिळणारा व पिळला जाणारा वर्ग यामधील लढ्याचें आणि शोषण करणाऱ्या वर्गाला नामोहरम करण्याचें तत्वज्ञान आणि कार्यपद्धति.

रशियांत प्रथम प्लेखेनॉव्ह आणि नंतर लेनिन यांच्या नेतृत्वा-खालीं समाजवादी चळवळ उदय पावण्यापूर्वी, बॉम्ब आणि दहशतवाद यांचेंच वर्चस्व होतें. परंतु रशियांतील या दोन थोर

मार्क्सवादी पुढाऱ्यांच्या नेतृत्वाखालीं तेथील चळवळीला कलाटणी मिळाली. झार आणि त्याचे अधिकारी यांचे खून पाडण्याचे जे फुटकळ प्रयत्न केले जात होते, त्याऐवजी वर्गलढ्याचा संदेश देशभर घुमविला गेला. आधुनिक इतिहासांतील सर्वांत महान क्रांतिकारक जो लेनिन, त्याला त्यावेळीं रशियात हिंदुस्तानांतील आजच्या स्वातंत्र्यापेक्षां कितीतरी पटीनें कमी नागरिक स्वातंत्र्य उपलब्ध होतें. पण त्यानें ॲसिड बल्ब आणि रॉकेलच्या जळत्या चिंध्या टाकण्यास किंवा ट्रॅमगाड्यांना आगी लावण्यास आणि आपल्या राजकीय विरोधकांचे खून पाडण्यास कधींहि सांगितलें नाहीं. उलट लेनिननें अत्यंत जळजळीत भाषेत या मार्गाचें वैयर्थ दाखवून दिलें आहे.

## क्रांतीचा मार्ग

क्रांतीचा मार्ग हा जसा नेहमी सीधासाधा आणि सरळ असा नसतो तसाच क्रांतिकारी हा देखील कांहीं नेहमी नागवी तलवार उपसून बसलेला नसतो. क्रांति हें एक शास्त्र आहे, आणि क्रांतिकारकाला ज्या परिस्थितींत त्याला काम करावयाचें आहे, ती भोंवतालची परिस्थिति नीट लक्षांत घेऊन आपले मार्ग त्या परिस्थितीशीं जुळते करून घ्यावे लागतात. विशिष्ट अवस्थेत दिलेला सशस्त्र बंडाचा आणि हिंसेचा आदेश हा आत्मघातकी आणि प्रतिक्रांतिकारी ठरण्याचा संभव असतो तर, तोच आदेश निराळ्या परिस्थितींत देणें हा विजयाचा ऐकमेव मार्ग ठरणेंहि संभवनीय असते. हिंदुस्तानची आजची परिस्थिति आणि समाजवादी व कम्युनिस्ट चळवळींचं झालेली वाढ लक्षांत घेतां, आज सशस्त्र बंडाचा आदेश देणें म्हणजे मध्यम-

वादी तत्त्वप्रणालीवर सपशेल बोळा फिरविण्यासारखे आहे. फटवाजी लूटमार, खुनाखुनी आणि घातपाती कृत्यांचा अवलंब करणें म्हणजे तर मार्क्सवादाची सपशेल बदनामीच आहे. हा मार्ग हिंदी भांडवल-दार आणि सरंजामदार यांच्यापेक्षां साम्यवादालाच जास्त घातुक ठरणार आहे.

वंगालमधील कम्युनिस्टांच्या कृत्यांनीं आजकाल साऱ्या देशाचें लक्ष वेधून घेतलें आहे. परंतु मार्क्सवादाची ज्याला थोडीशी तरी माहिती आहे त्याच्या हें सहज लक्षांत येईल कीं, कम्युनिस्ट हे त्यांच्या आयुष्यांतील फार मोठी संधी गमावून बसत आहेत. कॉमिनफॉर्मचें घोडें पुढें रेटण्यापेक्षां, खऱ्याखुऱ्या साम्यवादाची आस जर त्यांना लागलेली असती आणि बंगालमध्यें साम्यवादी समाज-रचना स्थापन करण्याचें उद्दिष्ट जर त्यांनीं आपल्या डोळ्यासमोर ठेवलें असतें तर, त्यांच्यापैकीं सामान्यांतल्या सामान्य कार्यकर्त्याला देखील हें कळून चुकलें असतें कीं, 'ॲसिड बल्ब'च्या मार्गामुळें ते जनतेपासून अलग पडले जातील, व बंगालांत सत्तारूढ होण्याची संधि नाहक मात्र गमावून बसतील. परंतु साम्यवादापेक्षां रशियाच्या वर्चस्वाखालीं नसलेल्या राष्ट्रांना दुर्बल करण्याच्या कॉमिनफॉर्मच्या धोरणाच्यच ते आहारीं गेले आहेत.

उलटपक्षीं, कम्युनिस्टांनी जर खऱ्याखुऱ्या मार्क्सवादाचा अवलंब करून मोकळेपणानें काम करणाऱ्या राजकीय पक्षाप्रमाणें उघडपणानें व लोकशाही पद्धतीनें काम केलें असतें आणि लोक-शाहीमुळें मिळणाऱ्या सर्व संधींचा उपयोग करून घेतला असता

तर, प्रांतांतील इतर समाजवादी शक्तींच्या सहकार्यानें त्यांनी लोकमत सहज आपल्या बाजूला खेचून घेतलें असतें याबद्दल कोणाच्याच मनांत शंका येण्याचें कारण नाहीं. आणि मग जनतेच्या संमतीनें आणि प्रत्यक्ष लोकशाही पद्धतीनें जनतेला आवाहन करूनच त्यांनी सध्याची मोडकळीला आलेली राजवट नष्ट करून त्याजागीं समाजवादी सरकार स्थापन केलें असतें हेंहि तितकेंच खरें.

बंगालमध्यें हाताशीं आलेली सत्ता जाणून बुजून टाकून देऊन कम्युनिस्टांनी साम्यवादी आणि समाजवादी शक्तींचें सामर्थ्य कितीतरी खच्ची करून टाकलें आहे. अशा तऱ्हेनें भविष्यपुढें त्यांनी स्वतःला पुन्हा एकदां मूर्ख ठरवून घेतलें आहे. १९४२ सालीं इतिहासानें त्यांना दिलेली सुवर्ण संधी त्यांनीं गमावली आणि आज पुन्हां भवितव्यता त्यांच्या दाराशीं आली असतांना ते तिच्याकडे पाठ फिरवीत आहेत. आपण हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, कम्युनिस्टांनी या दोनहि प्रसंगीं आत्मघातकीपणाचें जें वर्तन केलें, त्याचें कारण एकच होतें आणि ते म्हणजे हिंदी जनतेपेक्षां देखील परकीय सत्तेची गुलामगिरी ते पत्करतात. म्हणूनच समाजवादाच्या रोखानें येणारी एक विधायक शक्ति म्हणून राष्ट्राला कम्युनिस्ट चळवळीचा काडीमात्र उपयोग होणार नाहीं हें आपण ओळखलें पाहिजे.

२१ ऑगस्ट १९५०

# गांधीजी आणि समाजवाद

"अरे हा समाजवादी तर गांधीवादीच दिसतो!" असें म्हणणें म्हणजे कांहीं जणांना समाजवाद्यांची पुरेपूर बदनामी केल्यागत वाटते, तर इतर कांहींजण गांधी जयंती साजरी करणें, हें जातीयवादि कृत्य करण्याअितकें मोठें पाप मानतात. परंतु अशा तऱ्हेच्या दूषित दृष्टिकोणामुळें गांधीजींचें अथवा गांधीवादाचें कसलेंच नुकसान होत नाहीं. नुकसान होतें तें समाजवादाचेंच.

गांधीजींच्या जीवनावर भाष्य रचण्याचा खटाटोप करीत बसण्याऐवजी तें समजावून घेण्याचा प्रयत्न करणें, हेंच समाजवादाच्या दृष्टीनें उपयुक्त ठरेल. कारण गांधीजी ही लोकविलक्षण विभूति होऊन गेली. गांधीजींनंतर जग त्यांची स्मृति पुसून टाकूं म्हणेल तर तें शक्य होणार नाहीं. कारण प्रत्येक क्षणीं, प्रत्येक प्रसंगीं त्यांची थोर वाणि निनादत राहील.

गांधीजी हे सत्याचे उपासक होते. आणि त्यानीं सत्याची आराधना केली ती सर्वसंग परित्याग करून नव्हे तर, मानवी संसारांत वावरत असतांनाच त्यांची सत्याची उपासना चालू असे. त्यांची उपासना कर्मनिष्ठि होती. दलितांची सेवा हा त्यांच्या उपासनेचा मार्ग होता. समाजवाद देखील मानवी जीवनांतील सत्य शोधून

काढूं पाहतो, आणि त्यासाठीं सामान्य जनतेच्या सेवेचा कर्ममय मार्गच समाजवाद पसंत करतो.

गांधीजी हे तत्त्वज्ञ नव्हते, क्रांतिकारक होते. जीवनाचा अर्थ लावणें एवढेंच त्याचें उद्दिष्ट नव्हतें तर त्यांना त्यांत परिवर्तन घडवून आणावयाचें होतें. त्यांनीं इतिहासाला कलाटणी दिली. स्वतःच्या मृत्यूनें देखील त्यांनीं समाज परिवर्तनाला अशी विलक्षण गति दिली कीं, निधड्या छातीच्या माणसाचेंहि धैर्य खचून गेलें. समाजवाद हें देखील क्रांतिकारी तत्त्वज्ञान आहे. समाजाचें नीट आकलन करून घेतलें पाहिजे असें जें समाजवाद सांगतो तें देखील समाजांत परिवर्तन घडवून आणण्यासाठींच.

- .गांधीजींचा सर्वसामान्य जनतेवर आणि तिनें केलेल्या सामुदायिक प्रयत्नांवर भरंवसा होता. म्हणून त्यांना आपण क्रांतिवीर म्हणतो. समाजवादाचा देखील सामान्य जनतेवर विश्वास असल्यानें सामुदायिक उठावावरच त्याची भिस्त असते.

गांधीजींना क्रांतिकारी म्हणावयाचें, कारण स्वतःच्या सिद्धांतावर त्यांचा विश्वास होता. आणि मध्यमवर्गीय पूर्वग्रहांपासून ते सर्वस्वी अलिप्त होते. समाजवादाची देखील अत्यंत कठोर अशी तर्कपद्धति असून मध्यमवर्गीय मनोवृत्तीचा ती पार धुव्वा उडविते.

गांधीजींची वृत्ति एकांतिक किंवा ठोकळेबाज नव्हती, तर ते व्यवहारवादी व परिवर्तनशील होते. आणि त्यांचे प्रयोग सतत चालू असत. समाजवादाचेंहि असेंच आहे.

समाजांत बदल घडवून आणण्यासाठीं आधी व्यक्तीमध्यें परि-

वर्तन घडवून आणलें पाहिजे असें गांधीजी आग्रहानें प्रतिपादीत. समाजवाद देखील हें मान्य करतो कीं, मनुष्यामध्यें बदल घडवून आल्याशिवाय समाज परिवर्तन टिकूं शकणार नाहीं.

गांधीजी भांडवलशाही व सरंजामशाही याच्याविरुद्ध होते. शक्य तर व्यक्तिगत सुधारणांच्यामार्फत त्यांत सुधारणा घडवून आणण्याची त्यांची मनीषा होती. परंतु जरूर तर कायद्याच्या जोरावर त्यांना कायमची मूठमाती देण्याचीहि त्यांची तयारी असे. समाजवादाचें गांधीजींशीं पहिल्या भागाच्या बाबतींत साम्य आहे. कारण लोकशाही अस्तित्वांत असेल तर, समाजवाद देखील ही गोष्ट कायद्यानें करूं इच्छितो. परंतु लोकशाही नसेल तर मात्र समाजवाद क्रांतीचा मार्ग अवलंबितो.

गांधीजींचा मोठ्या प्रमाणावरील उद्योगधंद्यास विरोध नव्हता. परंतु त्यांचें राष्ट्रीयकरण झालें पाहिजे असें ते मानीत. समाजवादालाहि हेंच अभिप्रेत आहे. गांधीजी राजकीय व आर्थिक सत्तेच्या विकेंद्रिकरणावर भर देत. समाजवादाची परिणति हुकूमशाहींत होऊं नये असें वाटत असेल तर, समाजवादाला देखील विकेंद्रीकरणाचा अंगिकार करावा लागेल.

गांधीजी हे हिंसेच्या विरुद्ध होते. हिंसेला समाजवादाचा विरोध नाहीं. परंतु समाजांतील हिंसेचें मूळ समाजवादाला नष्ट करावयाचें आहे.

जागतिक, विशेषतः हिंदी समाजवाद जर एकांतिक व ठोकळेबाज बनविण्यांत आला आणि त्याला शास्त्राचें किंवा पोथीचें स्वरूप प्राप्त

झालें व गांधीजींचें ऐतिहासिक स्थान दुर्लक्षिण्यात आलें तर समाजवाद स्वतःची मोठीच हानी करून घेईल.

३० जानेवारी १९४९

# फसवा युक्तिवाद

[ ता. ११ ऑगस्ट रोजीं मुंबईच्या कापड कामगारांचा एक दिवसाचा लाक्षणिक संप सरकारनें बेकायदा ठरवून कामगार संघटना चिरडून टाकण्याचा प्रयत्न केला. त्याला अनुलक्षून साथी जयप्रकाश यांनीं मुंबईच्या कामगारांसमोर केलेलें भाषण. ]

अध्यक्ष महाराज आणि कामगार बंधूंनो,

बऱ्याच दिवसानंतर तुमच्याशीं बोलण्याची संधी मिळत आहे. ४–५ महिन्यापूर्वी २९ डिसेंबरच्या हरताळानंतर राजकीय परिस्थिती-विषयीं मी तुमच्याजवळ बोललों होतो. आज परिस्थितींत बराच बदल झाला आहे. त्यासंबंधीं बोलणार आहे. तुमच्या दृष्टीनें ११ ऑगस्टच्या संपाची महत्वाची घटना घडली आहे. मी प्रत्यक्ष येथें नसल्यामुळें माझी माहिती तुमच्यापासूनच ऐकलेली आहे. कामगारांवर संपाच्या सफलतेविफलतेचा झालेला परिणाम मला सांगण्यांत आला. संपाच्या आधींची तयारी व नंतरची परिस्थिति यामुळें कामगारांत खळबळ आहे असें ऐकतों. प्रचंड विरोधामुळें तुमचा संप यशस्वी झाला नाहीं. परंतु हिंमत न हरतां तुम्हीं अधिक बळकट संघटना करायला उभे आहांत हें ऐकून बरें वाटलें. अपयशानें न खचतां, धडा घेऊन अधिक जोरानें कामाला ~.

पाहिजे.

## आपण कशासाठीं लढलों?

त्याचबरोबर सध्याच्या राजकीय परिस्थितीचाहि विचार करायला पाहिजे. देश दास्यमुक्त झाल्यावर कामगारवर्गानें राजकारणात न पडतां केवळ ट्रेड यूनियन चळवळ करीत राहणें अशक्य आहे; आणि तसें करून चालणारहि नाहीं. स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंतची परिस्थिति वेगळी होती. कॉंग्रेसच्या झेंड्याखालीं आपण एकजुटीनें लढत होतों. बरोबर भांडवलदार, जमिनदार हेहि होते. सारी जनता, सारें राष्ट्र, एका झेंड्याखालीं होतें. त्यावेळीं वर्गलढा पुढें दामटणें अयोग्य होतें, व आपण तसें केलेंहि नाहीं. परंतु आता आपल्या लढयाचें स्वरूप संपूर्णपणें बदललें आहे. कामगारापुढें निरनिराळे राजकीय प्रश्न उभे राहिले आहेत. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर आतां राज्य कोणाचें हा महत्वाचा प्रश्न आहे. आणि या प्रश्नाशींच शेतकरी कामकरीवर्गाचे हितसंबंध निगडीत आहेत. या प्रश्नापासून तुम्हांला दूर टेवण्याचा प्रयत्न फक्त स्वतःच्या हिताकडे पहाणारे लोक करतील. परंतु दूर राहाण्यांत धोका आहे. कामगारवर्ग अज्ञानी आहे. त्यांच्यांत जागृति कमी आहे. याचा फायदा हितशत्रू घेणार. कामगार डोळे नीट उघडे ठेवून बघतील तर त्यांना खरी जाणीव होईल. काय होत आहे, आणि काय व्हायास पाहिजे तें त्यांच्या लक्षांत येईल. स्वातंत्र्याच्या लढयांत प्रसंगीं प्राणाचें मोल देऊन आपण परसत्ता नष्ट केली. पण तिच्या जागीं जर भांडवलदारांची सत्ता येणार असेल तर, कामगारवर्गाच्या हिताच्या दृष्टीनें त्या स्वातंत्र्याला काय

अर्थ ! पुंजीपतींचें राज्य आम्हाला नको आहे. त्यासाठीं का आम्ही लढलों? जनतेचें, म्हणजे किसान कामगारांचें राज्य आम्हाला हवें आहे. विषमता नष्ट करण्याचा, किसान कामगार राज्य म्हणजे लोकशाही समाजवाद हा एकच मार्ग आहे.

## मत जनतेचें : राज्य भांडवलदारांचें

आज सरकारांत जाऊन बसलेले कॉंग्रेसचे लहान थोर पुढारी सारेच म्हणत आहेत कीं " कॉंग्रेसचें राज्य म्हणजे जनतेचेंच राज्य, जनतेनेंच आम्हाला निवडून दिलें. " अशा प्रचाराचा किसान कामगारावर परिणाम होतो. म्हणून खरी परिस्थिति समजून घेतली पाहिजे. सर्वांना मताधिकार हा लोकशाही प्रजातंत्राचा पाया आहे. बहुमतानें निवडून आलेलें सरकार हेंच लोकशाही सरकार म्हणून मानलें जातें. अनेक पश्चिमात्य राष्ट्रांत, तसेंच अमेरिकेंतहि जनमतानेंच सरकारें अस्तित्वात येतात. इंग्लंडमध्यें कित्येक वर्षांपासून जनतेनें सरकार निवडण्याची पद्धत आहे. तेथील बहुसंख्य जनता कामगार वर्गांतील आहे. असें असूनहि तेथें आजपर्यंत भांडवलदारांचें, चर्चिलसारख्यांचेंच राज्य होतें. त्या राज्याला किसान कामगारांचें राज्य म्हणता आलें असतें का ? मुळींच नाहीं. आज अमेरिकेंत काय परिस्थिति आहे ! तेथें मुख्यतः डेमोक्रॅटिक व रिपब्लिकन असे दोन पक्ष आहेत. परंतु हे दोन्ही पक्ष भांडवलदारांचेच आहेत. आणि किसान कामगारांच्या मतावरच ते निवडून येतात. त्यांच्यापैकीं कोणताहि पक्ष श्रमणाऱ्यांचा नाहीं. हे पक्षहि आम्हाला जनतेनें निवडून दिलें आहे असें म्हणतात. परंतु अमेरिकेंतील सरकार भांड--

वळदारांचें म्हणूनच ओळखलें जातें. मत जनतेचें, राज्य भांडवल-दारांचें ! हें असें कां होतें ?

## असें कां होतें ?

नव्वद टक्के मजूर व मध्यम वर्गातील जनता भांडवलदाराच्या हातीं सत्ता कां देते ? कामगार स्वतःच्या पायावर कुऱ्हाड कां घालतो ? याचें कारण पैसा. पैसा दिला कीं, मत मिळतें. मताचा सौदा होतो. दहा रुपयांना एक मत असा बाजार सुरू होतो. आणि दरिद्री कामगार लालचीनें मत विकतो. असें करून स्वतःचा व सर्व कामगार वर्गाचा आपण गळा कापीत आहोंत हा विचारच तो करीत नाहीं. कोठें मतांसाठीं पैसे देतात, कोठें जेवण, कोठें दारू, असें चालतें; तर कोठें गुंडगिरीहि असते. किसान कामगारांना फसविण्या-साठीं जातीयता वगैरे प्रकारानें भांडवलदार फूटहि पाडतात. हा तुमच्या जातीचा, तुमच्या गांवचा, असा प्रचार करतात. स्वतःच्या फायद्यासाठीं भांडवलवाले, जातीयतेचें विष पसरवतात. आणि अज्ञानी कामगार त्यास बळी पडतो. कामगारानें ओळखले पाहिजे कीं, आप-णास जातपात नाहीं. कामगार हीच आपली जात. उमेदवार भांडवल-दारी वृत्तीचा आहे कीं, कामगार हित पाहणारा आहे एवढेंच पाहिलें पाहिजे. जातीय राजकारणांतूनच पुढें जातीय झगडे निर्माण होतात. जातीय दंगलींत मरतात कामगार, आणि भांडवलदार मात्र आपलें राजकारण पुढें दामटतात. भांडवलदार कामगारांच्या डोळ्यांत धूळ फेकतात. जनतेचें राज्य म्हणून सत्ता चालवितात. कामगारांचे डोळे बंद असतात. परंतु ही परिस्थिति किती दिवस टिकणार ! आठ दहा

वर्षांत ती नक्कीच बदलेल. मग मालक मजुराला फसवूं शकणार नाहीं.

## हें म्हणें जनतेचें राज्य !

आज काँग्रेसचे छोटेमोठे पुढारी जनतेचे राज्य म्हणून डांगोरा पिटीत आहेत. परंतु मुंबईत असा एक तरी कामगार आहे कां कीं, ज्याला काँग्रेस सरकार आणि मालक यांच्या एकजुटीची जाणीव नाहीं ? ११ ऑगस्टला या सर्वांची कामगार विरोधी एकजूट पाहून कामगाराला पुरतीच जाणीव झाली असेल. जनतेचें म्हणविण्यार्‍या काँग्रेस सरकारनें कोणते कायदे केले ? संपाचा मूलभूत हक्क छिनून घेतला. कामगार संघटनांच्या बैठकांना बंदी घातली. हातांतील सत्ता कामगार चळवळी दडपण्यासाठीं उपयोगांत आणली. हेंच का जनतेचें, किसान कामगारांचें सरकार !

## शिपाई म्हणजे कालचा किसान कामगारच ना ?

आपल्यापुढें काश्मीर, हैद्राबादचा बाऊ नेहमी उभ करण्यात येतो. काश्मिरांत युद्ध चालू आहे. हैद्राबादेत कदाचित सुरू होईल. अशा वेळेस सरकारला अडचणींत आणूं नका म्हणून उपदेश केला जातो. कबूल. पण आज लढाईंत प्राण कोणाचे जात आहेत ? शिपाई म्हणजे कालचा किसान कामगारच ना ? तो मरतो आणि राज्य मात्र भांडवलदारांचें ! आम्ही मरतों तर राज्य आमचें कां नाहीं ? काँग्रेस सरकार स्वतःला जनतेचें म्हणवितें; परंतु मजदूर राज्याची घोषणा करणें तर दूरच, उलट त्यांच्या मार्गांत अडचणी आणल्या जात आहेत. तुम्हीं जनतेचे प्रतिनिधी ना ? मग पुंजीवाद कां नाहीं थांबवीत ?

## गांधींच्या नांवाचा दुरुपयोग

जनतेला फसविण्यासाठीं गांधीजींचें नांव, पंडितजींचें नाव वापरण्यांत येतें. " काँग्रेसला मत म्हणजे महात्माजींच्या आत्म्याला शांती " असा प्रचार करतात. परंतु गांधीजी ही कांहीं केवळ काँग्रेसची संपत्ती नाहीं. ते साऱ्या देशाचें वैभव होतें. ते कधींच कुठल्याहि पक्षाचे नव्हते. ते पक्षातीत जनतेचे होते. आम्हीहि म्हणतों, जोरानें सांगतों कीं, गांधीजी आमचे आहेत. पण आम्ही काँग्रेसप्रमाणें त्यांचें नांव विकायला नाहीं निघालों. त्या महापुरुषाचें नांव विकणें पाप आहे. चुकूनहि आम्ही तसें करणार नाहीं. आम्ही त्यांच्या मार्गानें जाण्याचा प्रयत्न करतों. गांधीजी छोट्या छोट्या गोष्टी हातांशीं घेऊन मोठ्या गोष्टीकडे जात असत, जनतेला तिकडे नेत असत. छोटे प्रश्न सुटत चालले म्हणजे मोठेहि सुटूं लागतात' असा त्यांचा आत्मविश्वास होता. आज जे राज्यकारभार हांकीत आहेत, त्यांनीं गांधीजींच्या सहवासांत उभीं आयुष्यें दवडलीं आहेत गांधीजींच्या चरणाशीं बसून बातचीत केली आहे. परंतु आज काय चाललें आहे ! मोठे पगार, फर्निचर, शानदार बंगले, या सर्वांची त्यांना आतां जरुरी भासूं लागली आहे. ब्रिटिश राजवटींतील दिखाऊपणा उचलला जात आहे. हें पाहून गांधीजींना वाईट वाटे. " तुम्हीं जनतेला लुटीत आहांत " ते म्हणत. ते सांगायचे, " देश गरीब आहे. मंत्र्यांनीं गरिबींतच राहिलें पाहिजे. " सर्पात शांती ठेवा हें गांधीजींचें म्हणणें तेवढें यांना आठवतें. परंतु गांधीजींचें इतर सारें क्रांतिकारक सांगणें मात्र ते विसरतात. फाप-

घाचें तेनढें घेतात. गाधीजी वसा कोरडा होईपर्यंत सागत होते कीं, हिंदुस्तानी हीच राष्ट्रभाषा. हिंदी किसान कामगार सारे एक. सर्वांना समजणारी भाषा हवी. पूर्वीचा कॉंग्रेसचा ठरावहि आहे कीं, हिंदुस्तानी हीच राष्ट्रभाषा. परंतु आज कॉंग्रेसवाले गाधीजींना आणि त्या ठरावालाहि विसरून गेले. युक्तप्रांतीय निवडणुकींत पंडित गोविंद वल्लभ पत अभिमानानें सागत कीं, हिंदी आम्ही राष्ट्रभाषा केली! परंतु त्यामुळें गाधीजींच्या आत्म्याला शांतीच लाभत असेल ना? आणि पंडित गोविंद वल्लभ पंत पुढें म्हणत, 'सोशालिस्टांना नका निवडूं, कारण ते पुन्हा हिंदी आणतील. केवढी ही गाधीजींची वंचना! आणि त्यानीच पुन्हा म्हणायचें कीं, 'कॉंग्रेसला मत म्हणजे गाधीजींच्या आत्म्याला शांति.' इकडे गाधीजींचीं तत्वें पायाखालीं तुडवायची, आणि तिकडे गाधीजींच्या नावाचा घोष करायचा. कशा करिता ही ढोंगबाजी? केवळ जनतेला फसविण्याकरिता, जनतेचीं मतें लुबडण्याकरिता! जातीयता नष्ट करण्याकरितां गाधींजींनीं प्राणाचें मोल दिलें. आणि हे गांधीजींचे वारसदार असेंब्लींत चार जागा मिळविण्यासाठीं जनतेंतील जातीय भावनेचा फायदा घेतात. चार जागा मिळविण्यासाठीं कॉंग्रेसनें हें सारें केलें. गांधीजींच्या सिद्धांताला काळिमा फासला, आणि पुन्हा त्यांचेंच नांव घेऊन जनतेपुढें मिरवीत आहेत. आज कॉंग्रेस ही बन्हेंशी लाचलुचपतीनें बरबटली आहे. गांधीजींना त्याची घृणा होती. कॉंग्रेसमधील लाचलुचपत बंद झाली पाहिजे, कॉंग्रेसची शुद्धि झाली पाहिजे असें गाधीजींनीं अगदीं कंठ शोषून सागितलें. पण कोण

ऐकतो त्यांचें? मतें मिळविण्यापुरतें त्यांचें नांव. कॉंग्रेसवाल्यांनी काळाबाजार करून, 'परमिटें' विकून आज पैसा कमावला. याच लोकांनीं आज कॉंग्रेसमध्यें शिरून कॉंग्रेसचा कबजा घेतला आहे. पण वर नांव मात्र गांधीजींचें. अशा रीतीनें नांव वापरणें ही अत्यंत शरमेची गोष्ट आहे.

## पंडितजींच्या नांवाचेंहि तसेंच

गांधीजींच्या पाठोपाठ हे लोक पंडितजींचें नाव घेतात. आज पंडितजी कॉंग्रेसचे पुढारी आहेत. तेव्हां त्यांचें नांव वापरायला काय हरकत असें ते म्हणतात. सवाल आहे. पण त्यांत सरळपणा नसतो पंडितजींच्या नांवाचा दुरुपयोग कॉंग्रेसचें खोटें स्वरूप पुढें करण्याकरितां केला जातो. पंडितजी हे समाजवादी विचाराचे आहेत आणि म्हणून ज्या कॉंग्रेसचे ते पुढारी आहेत ती कॉंग्रेसहि समाजवादी आहे अशा तऱ्हेचा युक्तिवाद केला जातो. समाजवादी पक्ष समाजवादाच्या नांवाखालीं सत्तेचें राजकारण खेळतो. खरे समाजवादी पंडितजी आणि कॉंग्रेसच आहे. अशा तऱ्हेचा प्रचार सर्रास केला जातो. वैयक्तिक दृष्ट्या पंडितजी विचारानें समाजवादी आहेत हें आम्हांला मान्य आहे. परंतु कॉंग्रेसचें नेतृत्व पंडितजींकडे आहे हें साफ खोटें आहे. कॉंग्रेसमधील अल्पसंख्यांकांचे ते नेते आहेत. बहुसंख्य लोकांचा सरदार पटेलांनाच पाठिंबा आहे- आणि सरदार पटेल हे समाजवादी विचारसरणीचे आहेत असें कोणीहि म्हणणार नाहीं. पुरं त्यांचाहि तसा दावा नाहीं. कॉंग्रेस वर्किंग कमिटींत किंवा अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटींत पंडितजींचें बहुमत नाहींच, पण सध्यांच्या सरकारां-

तरि त्यांचें बहुमत नाहीं. म्हणूनच समाजवादी विचारसरणीच्या पंडितजींचें सरकार हें समाजवादी सरकार आहे, असा प्रचार करणें म्हणजे जनतेंत भ्रम उत्पन्न करण्यासारखे आहे. जनतेची ती फसवणूक आहे. जनतेला सत्यापासून दूर ठेवणें आहे. आणि हेच काँग्रेसवाले गांधीजींच्या गप्पा मारतात. -

## निवडणुकीचा पैसा !

पंडितजी हे लोकप्रिय आहेत. जनतेचा त्यांच्यावर विश्वास आहे. परंतु काँग्रेसचा मात्र त्यांच्यावर विश्वास नाहीं. १९३६ सालची गोष्ट. त्यावेळच्या ब्रिटिश सत्तेनें १९३५ चा घटना कायदा हिंदुस्थानवर लादायचें ठरविलें होतें. पंडित नेहरू निरनिराळ्या प्रांतात प्रधान-मंडळें स्थापावयाच्या विरुद्ध होते. पण काँग्रेसमध्यें त्यांचें बहुमत नव्हते. आणि शेवटीं काँग्रेसनें घटना कायदा मोडण्याकरितां मंत्रिमंडळें स्वीकारण्याचा ठराव पास केला. पंडितजी व त्यांच्या बरोबर फक्त सोशॅलिस्टांनी त्याला विरोध केला. निवडणुकांच्या बाजूच्या पटेल प्रभृति लोकाना चिंता पडली. पंडितजींनीं किंवा सोशॅलिस्टांनीं समाजवादाची भाषा काढली तर निवडणुकीला पैसा कोठून आणा-वयाचा ? त्यावेळीं पंडितजी काँग्रेसचे अध्यक्ष होते. पटेल प्रभृति लोकांनीं " पंडितजी आज अशा तऱ्हेनें काँग्रेसचा कारभार चालवीत आहेत कीं, या परिस्थितींत आम्ही निवडणुकीची जबाबदारी घेऊं शकत नाहीं असें साफ बजाविलें. पंडितजींचें कांहीं चालेना. त्यांनीं आपला राजिनामा सादर केला. तो वृद्ध पिता-महात्माजी-मध्यें पडला. त्यांनी समझोता घडवून आणला. इतरांनीं आपलें म्हणणें

मागें घेतलें. एका लढवय्यानें दुसऱ्याच्या छातींत तलवार खुपसली. पण मागाहून मात्र आतां मी लढणार नाहीं. समझोता करतों म्हणून तलवार मागें घेतली. पण व्हायचें तेंच झालें. तो बिचारा मात्र तलवारीच्या जखमेनें मरण पावला. अगदी अशीच पंडितजींची परिस्थिति झाली. पंडितजी हे काँग्रेसमधील एक प्रगतीशील शक्ति म्हणून राहिले आणि राहतात. पण काँग्रेसवर त्यांचें वजन मात्र नाहीं. ते विचारानें समाजवादी असतील, पण ते काँग्रेसला किंवा सरकारला समाजवादी बनवूं शकले नाहींत.

## काँग्रेसचें नांव

पुढचा हातचा म्हणजे काँग्रेस. काँग्रेसनें सतत ६० वर्षें झगडा करून हिंदुस्तानचें स्वातंत्र्य मिळविलें. काँग्रेसनें तुरुंगवास सहन केला. वेळप्रसंगीं तिनें प्राणार्पण केलें. आणि या त्यागांतून स्वातंत्र्य मिळालें. अशा काँग्रेसला मत देणें म्हणजेच जनतेला, हिंदुस्तानच्या स्वातंत्र्याला मत देणें होय ! हा प्रचाराचा दुसरा एक मासला ! परंतु कोठें आहे ती पूर्वीची काँग्रेस ! पूर्वीची काँग्रेस ही जनतेची काँग्रेस होती. जनतेची सेवा हें तिचें ब्रीद होतें. पण आजची काँग्रेस सत्ताधारी बनली आहे. जनतेच्या सेवेचा तिला विसर पडला आहे. काँग्रेसनें राजकारण सोडून जनतासेवेचें व्रत स्वीकारावें असें गांधी-जींनीं जातां जातां बजाविलें. पण कोण ऐकतो त्यांचें ? कोठें राहिली आहे जनतेची काँग्रेस आता ? सावकार, जमीनदार, मांडवलदार, जातीयवादी, झपाट्यानें काँग्रेसमध्यें घुसले आहेत. त्यांनीं काँग्रेसचा कबजा घेतला आहे. याच लोकांनीं आपल्या स्वातंत्र्यलढ्यात परकी

सत्तेला मदत केली; आणि यांनी बजबजलेल्या काँग्रेसला मत म्हणजे स्वातंत्र्याला मत, असा गलिच्छ प्रचार चालतो. अज्ञानी, अडाणी जनतेच्या भावनांपासून फायदा उकळण्याचा प्रयत्न केला जातो. परंतु दिवसेंदिवस काँग्रेसचें स्वरूप स्पष्ट होत आहे. पूर्वीसारखे सर्व लोक आतां काँग्रेसमध्यें नाहींत. स्वातंत्र्य मिळविणारी काँग्रेस ही आजची काँग्रेस नव्हे. तो एक पक्ष बनला आहे. सत्तावादी पक्ष बनला आहे.

## काश्मीर हैद्राबादचा बाऊ

सरकारच्या भांडवलदारी धोरणांना विरोध करणाऱ्यांच्या तोंडावर काश्मीर हैद्राबादचे प्रश्न फेकले जातात. संकटें कुणापुढें आलेलीं नाहींत ! आज संकटें आहेत म्हणून पुढें जायचें नाहीं म्हटलें तर आपण कधींच पुढें जाणार नाहीं. १९१७ सालीं रशियांत क्रान्ति झाली. रशियांत मजुरांचें सरकार प्रस्थापित झालें. पण त्याच्या पाठोपाठ प्रचंड संकटें त्यांच्यापुढें उभीं राहिलीं. अंतर्गत भांडवलदार, जमीनदारांचीं संकटें आलीं. बाहेरून सर्व बाजूंनीं भांडवलशाही राष्ट्रांचे चौफेर हल्ले सुरू झाले. पण लेनिन घाबरला नाहीं. ही संकटें आलीं आहेत, आता पुढें कसें पाऊल टाकावयाचें म्हणून तो स्वस्थ बसला नाहीं. संकटांना तोंड देत देतच त्यानें आपलें पाऊल पुढें टाकलें. आज आपल्यापुढें असलेल्या संकटापेक्षां कितीतरी पट प्रचंड संकटें त्यांच्यापुढें होतीं. निरनिराळ्या साम्राज्यवादी सरकारांनीं रशियाचें मजूरराज्य चिरडण्याकरितां करोडो रुपये ओतले. पण लेनिननें असें नाहीं सांगितलें कीं, हीं संकटें संपल्यावर समाजवाद

आणूं असें जर तो सांगता तर, रशियांत समाजवाद कधींच आणतां आला नसता. पुढें त्यांनीं चुका केल्या तें निराळें. पण त्यांच्या चुकांपासून आपल्याला बोध घेतां येईल, नव्हे आपण घेतला पाहिजे. समाजवादी सरकार आल्यावर सारें कांहीं ठीक होईल असें कोणीच मानीत नाहीं. आपल्याला हें नवीन घर बांधावयाचें आहे, तर त्याचा आधीं नकाशा तयार केला पाहिजे. सध्यांच्या कॉंग्रेस सरकारनें तावडतोब समाजवादी सरकार स्थापन केलें पाहिजे असें कोणीच म्हणत नाहीं. पण त्यांनी मजूर राज्याचा पाया घातला पाहिजे. उद्या आपल्याला किसान कामगारांचें समाजवादी राज्य स्थापावयाचें आहे. या दृष्टीनें आज पावलें टाकली पाहिजेत. रशियानें १७ सालीं मजूर राज्याचा पाया घातला. त्याचें कार्य अजून पुरें झालें नाहीं. त्यांनीं खूप चुकाहि केल्या. आपण त्या चुका सुधारूं. पण केव्हा? आधीं पाया घातला गेला तर. पायाच जर तयार केला नाहीं तर पुढें घर तरी कसलें बांधणार? सरकारचें आर्थिक धोरण जनताभिमुख बनलें पाहिजे. लहान मोठे खाजगी मालकीचे सर्व धंदे तांबडतोब राष्ट्राच्या मालकीचे करा असें आम्ही मुळींच म्हणत नाहीं. पण सुरवात करा. प्रथम मोठे धंदे, बँका वगैरे तरी राष्ट्राच्या मालकीच्या करा. इंग्लंडमधील मजूर पक्ष हा नरम विचाराचा समाजवादी पक्ष मानला जातो. आजपर्यंत इंग्लंडच्या साम्राज्यवादात तो सहभागी होता. आपल्या साम्राज्याच्या जोरावरच तेथील जनतेचें हित राखलें जातें हें त्याला समजत होतें. परंतु राज्यसत्ता हातात आल्यावर, नरम विचाराचा म्हणून तो गप्प नाहीं बसला. हजारों संकटें त्याच्या-

पुढें आली. भाडवलदारानीं त्यांच्याबरोबर असहकार पुकारला. अमेरिकेसारख्या भाडवलशाही राष्ट्राची मदत कमी झाली. साम्राज्य खलास झालें. लोकाच्या राहणीचें मान खालीं आलें. जीवनाला आवश्यक वस्तूची चणचण भासूं लागली. पण म्हणून त्यानीं सबूरीचें धोरण स्वीकारलें नाहीं. खाणी, बँका वगैरे मोठे धंदे त्यानीं राष्ट्राच्या मालकीचे केले. चार लोकाची संपत्ति जनतेची संपत्ती केली वैद्यकीय धंद्याच्यासुद्धा राष्ट्रीयकरणाची अभिनव योजना त्यानीं आखली. ही योजना अमलांत आल्यावर कोणालाहि, मग तो कितीहि गरीब असो, पैशासाठीं वैद्यकीय मदतीची वानवा पडणार नाहीं. त्याच्याकडे कामगार राज्य, समाजवादी राज्य प्रस्थापित झालें आहे असें नाहीं. पण त्यानीं समाजवादाचा पाया घातला आहे. संकटांचा बागुलबुवा करून चर्चिलचेंच धोरण पुढें चालवलें नाहीं. आपल्याकडे दहा वर्षें वाटेल तसें कुरण चरायला जमीनदारांना आणि भाडवल-दाराना मोकळीक. या दहा वर्षांत आपण अतर्के त्याच्या हातात जाऊ कीं,नंतर मोकळीक होणे कठीण. हिंदुस्तानचें स्वातंत्र्य या दहा वर्षांत स्थिरस्थावर झाल्यानतर नवीन आर्थिक धोरणाचा विचार हे करणार. पण तेव्हा राजकारणाची सूत्रे तुमच्या हातांत राहिलीं तर ! आज दहा वर्षांच्या सबुरीची भाषा म्हणजे कायमचीच सबूरी किसान कामगार राज्य स्थापायचें दूर राहू द्या, पण निदान आज गरीब आणि श्रीमत याच्यांतील भेद तरी दूर करण्याचा प्रयत्न केला जातो आहे का ? पे कमिशननें कमींत कमी पगार तीस रुपये व जास्तीत जास्त तीन हजार रुपये ठरवून दिला. गरीबाच्या शभर पट श्रीमताला

पगार ! मंत्री, गव्हर्नर, वगैरेंना तर पांच, सहा, सात हजार रुपया-पर्यंत पगार. आमच्या गरीबांच्या राज्यांत पगारांत ही तफावत. कमीत कमी पगाराच्या दहा पट, फार तर वीस पट पगार कबूल. पण शंभर पट ? हें कुठलें गरीबांचें राज्य ? कुठलें जनतेचें राज्य ! हा काय कामगार राज्याचा पाया ? हें गरीबांचें राज्य मुळीच नाहीं. जनतेच्या मतावर निवडून आलें असलें तरी हें जनतेचें सरकार नाहीं. जनतेला खरा प्रकार समजावून दिला तर, जनता खात्रीनें जनतेचें सरकार निवडील.

## सरकारचा निषेध म्हणजे का देशद्रोह ?

या संकटवादाबरोबरच दुसरें एक नवीन तत्वज्ञान लोकांपुढें ठेवलें जातें. मोठ्या काळानंतर, अत्यंत भयंकर परिस्थितींत आपल्याला स्वातंत्र्य मिळालें आहे. तेव्हा अशा वेळीं विरोधी पक्षाची मुळींच अवश्यकता नाहीं असें सांगितलें जातें, आणि लोकांनाहि तें चटकन पटतें. पण याचा नीट विचार केला पाहिजे. आज विरोधी पक्ष नसेल, सरकारवर टीका होत नसेल तर उद्या काय परिस्थिति येणार आहे याचा विचार केला पाहिजे. ज्या ठिकाणीं लोकशाही आहे, त्याठिकाणीं विरोधी पक्ष आहे हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे. ज्या राज्यात विरोधी पक्ष नाहीं त्या राज्याचें चटकन हुकूमशाहींत, हिटलरशाहींत रूपांतर होतें. फॅसिस्टवाद वाढत जातो. त्या सरकारांत जनतेबद्दल बेपर्वाई निर्माण होते. कारण सरकारवर टीका करायला कोणी राहातच नाहीं. सरकार करील तें सर्व योग्य असें समजण्यांत येतें. जनतेची काळजी सरकारला उरणार नाहीं. चीन–

प्रमाणें आपली स्थिति होऊन जाईल. चीनमध्यें आज किती चलन-वाढ झाली आहे ! त्याचप्रमाणें आपल्याकडेहि होत आहे. आज रुपयाची किंमत दोन आणे झाली आहे. याला विरोध झाला नाहीं, यावर टीका झाली नाहीं तर, याच रुपयाची किंमत कवडीइतकी होईल. ही चलनवाढ गेल्या महिन्यात नाहीं झाली; गेल्या वर्षभर ती चालू आहे. आजपर्यंत सरकारनें दुर्लक्ष केलें. पण आतां जनतेच्या विरोधामुळें त्यांना स्वस्थ बसणें कठीण झालें आहे. आज ते जागे होत आहेत. विरोधी पक्ष नसता तर कोण त्याचें लक्ष इकडे वेधणार होतें ? लांचलुचपतीचा बुजबुजाट माजला आहे. जनतेलाच या लांचलुच-पतीचा त्रास होतो. पण यावर टीका झाली नसती तर कोणीहि याकडे लक्ष दिलें नसतें. विरोधामुळें देश कमजोर होतो असें सांगितलें जातें. पण हें सपशेल खोटें आहे. आपल्या हातात अनियंत्रित सत्ता टिकविण्याकरिता या थापा मारल्या जातात. विरोधाला चिरडण्याचा प्रयत्न केला जातो. पण हें लक्षात ठेवलें पाहिजे कीं, विरोधानें देशाचें नुकसान होत नाहीं, देश कमजोर होत नाहीं, तर देशाला बळकटी येते. विरोधी पक्ष हा नेहमीं देशाची सेवा करीत असतो आर्थिक व सामाजिक स्वातंत्र्याकरिता किसान कामगारांचें राज्य झालें पाहिजे. समाजवादी राजनैतिक दल निर्माण केलें पाहिजे. आपण आपल्या ट्रेड यूनियन संघटना बांधल्या, आपण मिल मजदूर सभेच्या झेंड्याखालीं आपले आर्थिक झगडे लढवले, तरी आपल्याला राजकारण विसरून चालणार नाहीं. सोशॅलिस्ट पार्टीनें आपले आर्थिक सिद्धांत पुढें मांडून समाजवादी दल उभें केलें आहे. सोशॅ-

लिस्ट पार्टीच्या कार्यक्रमामुळें देशाची हानी होत नाहीं. भांडवलदार जमिनदारांच्या कार्यक्रमामुळेंच देशाची हानी होते. सोशॅलिस्ट पार्टी ही जनतेची पार्टी बनली पाहिजे. किसान कामगारांची पार्टी बनली पाहिजे. आजपर्यंत आम्ही कॉंग्रेसमध्यें होतो. पण आतां आम्हीं कॉंग्रेसच्या बाहेर आलों आहों. कां आलों आम्हीं कॉंग्रेसच्या बाहेर? कॉंग्रेसवर रागावून! मुळींच नाहीं. किसान कामगारांना कॉंग्रेसमध्यें जागा नाहीं म्हणून. कॉंग्रेस पैसेवाल्याच्या हातांत गेली आहे म्हणून. किसान कामगाराला तेथें जागा असती तर आम्हीं मुळींच बाहेर आलों नसतों. कॉंग्रेसमध्यें पुंजीवाद वाढत आहे. याविरुद्ध आपल्याला लढा दिला पाहिजे. कॉंग्रेसनें दहा वर्षांची मुदत दिली आहे. पण आम्हीं त्याला तयार नाहीं. कोणी सांगावें, दहा वर्षांत काय होईल आणि काय नाहीं म्हणून!

## त्यागानें संघटना उभारा!

समाजवादी दल कांहीं आपोआप निर्माण होत नाहीं. एकटा दुकटा माणूस – मग तो कितीहि मोठा असो – कांहीं समाजवादी दल काढूं शकत नाहीं. त्याकरता कष्ट केले पाहिजेत. त्याग पाहिजे, बलिदान पाहिजे. आम्हीं आपले पिळले जात राहूं आणि कोणीतरी येऊन समाजवादी दल निर्माण करील, असें म्हणून चालणार नाहीं. आज कामगारवर्ग, किसानवर्ग या परिश्रमाला तयार झाला आहे. त्याग करायला, बलिदान करायला तो तयार आहे. पण केव्हां? पुढें प्रकाश दिसत असेल तर. नवभारत, किसान कामगारांचा भारत निर्माण होणार असेल तर. क्रांति झाल्यानंतर रशियांतील

कामगारांनीं उपाशीपोटीं सोळा सोळा, अठरा अठरा, तास काम केलें तें कां? पुढचा समाजवादी रशिया त्यांना दिसत होता म्हणून. पिळणारा वर्ग नाहींसा होत होता. रशियांत समाजवाद प्रस्थापित करायला हे कामगार निघाले होते. आणि म्हणूनच ते हाडाचीं काडें करीत होते. आमचे कामगार सुद्धां याला कां तयार होणार नाहींत? त्यांना जर दिसले, त्यांना जर पटलें कीं, भावी समाजवादी हिंदुस्तानचा पाया आज घातला जात आहे, तर तेही मरमरून काम करायला तयार आहेत. आपले आजचे हक्क कांहीं वेळ बाजूला ठेवायला तयार आहेत. पण जर उज्वल भवितव्य दिसत असेल तरच. दहा वर्षें भांडवलदारांना मोकळें रान देण्यासाठीं नाहीं. काय म्हणून आम्ही आज उपाशी पोटीं राहून कष्ट उपसावे? काय उपयोग या कष्टांचा? काय नवीन निर्माण होणार आहे? काळाबाजार, लाचलुचपत, भांडवलदारांची तिजोरी भरणें यासाठीं आम्ही यापुढें कष्ट करायला मुळीच तयार नाहीं. पंडितजी सांगतात, आपल्याला नवभारत निर्माण करायचा आहे. कुणाचा नवभारत, श्रीमंतांचाच ना? आम्हाला आणि राष्ट्राला काय त्याचा फायदा? नुसतें नवभारताचें स्वप्न निर्माण करून कामगार वर्ग त्यागाला तयार होणार नाहीं. नवभारताचा पाया घातलेला जर त्याला दिसत असेल तरच तो मरायला तयार होईल. भांडवलशाही चौकट नष्ट करण्यासाठीं तो कोणत्याहि त्यागाला भिणार नाहीं.

## कामगारांचा खरा पक्ष

आज राजनैतिक दल म्हणून हिंदुस्तानांत तीन दलें काम

करीत आहेत. हे तीन पक्ष कामगारांच्या पुढें आहेत. यांतील आपला पक्ष कोणता? गरीब श्रीमंत भेदाभेद नष्ट करून खराखुरा समाजवाद आणूं इच्छिणारा पक्ष कोणता, हें आतां कामगार वर्गानें ओळखलें पाहिजे. कॉंग्रेस पक्ष, सोशॅलिस्ट पक्ष, आणि कम्युनिस्ट पक्ष असे तीन पक्ष आज आपल्यापुढें आहेत.

### नवा संकटवाद

पंडितजींच्या सारखे समाजवादी विचारसरणीचे लोक असूनहि कॉंग्रेस आज भांडवलदारांची बनली आहे. भांडवलदारांनी तिचा कबजा घेतला आहे. आणि किसान कामगारांना मात्र तिचे दरवाजे बंद झाले आहेत हें आपण स्वानुभवावरूनच पहातों. आपल्या मुंबई-तच आपण पाहातों कीं, पाटलांची मु. प्रां. कॉं. क. आणि भांड-वलदार यांचे किती घनिष्ट संबंध आहेत. तें त्यांचें एकमेकांचें सहाय्य पाहून, कॉंग्रेसला मिळणारी मालकवर्गाची मदत पाहून, एकच अर्थ निघतो कीं, कॉंग्रेस भांडवलशाही जिवंत ठेवूं इच्छिते. इतकेंच नव्हे तर ती भांडवलदारांच्या मदतीवरच जगूं इच्छिते. कॉंग्रेस ब्रिटिश अमदानींतील परिस्थितींत बदल करूं इच्छित नाहीं. 'जैसे थे' वर तिचा प्रचंड विश्वास आहे. पंडितजी सोशॅलिझम मानतात पण सरदार तो मुळींच मानीत नाहींत. आणि आज कॉंग्रेस पटेलांच्या हातांत आहे, नेहरूंच्या नाहीं. युद्धकाळापूर्वी या देशांत गांधीवाद, समाज-वाद वगैरे वाद होते. पण कॉंग्रेसनें आतां नवा वाद निर्माण केला आहे. त्याला डॉ. लोहिया 'संकटवाद' म्हणतात. नवीन कराम करी नाहीं तर,देशावर संकट आहे म्हणून. खोचदुसपत पा बंद होत नाहीं,

होतां कामां नये असें हे सांगतात. कां सांगतात हें? केवळ रशिया-करितां. आणि रशिया पाहात आहे कीं, पूर्वेकडे एक नवीन स्वतंत्र राष्ट्र तयार होत आहे. पुढें मागें तें आपल्याला डोईजड होईल. तेव्हां या प्रचंड राष्ट्राला खच्ची करावयाचें त्याचें धोरण आहे. आणि म्हणूनच आज आपले कम्युनिस्ट हैद्राबाद स्वतंत्र ठेवूं इच्छि-तात. म्हणूनच एकेकाळीं त्यांनी 'पाकिस्तान झिंदाबाद' च्या घोषणा केल्या. कॉंग्रेसराज्यांत आज कामगार वर्गाची पिळवणूक होत आहे. पण तें आमचें राज्य आहे. आम्ही तें बदलून उद्यां कामगा-रांचें राज्य निर्माण करूं. पण परक्यांच्या सत्तेखालीं गेल्यावर मात्र ही आशा दुरावते. आणि नेमकें हेंच कम्युनिस्टांना पाहिजे आहे. जनतेनें प्रचंड त्याग करून ब्रिटिशांच्या वर्चस्वापासून स्वतंत्र केलेला हिंदुस्तान रशियाच्या वर्चस्वाखालीं ते नेवूं इच्छितात. कोणाचा फायदा आहे यांत? हिंदुस्तानचा? हिंदुस्तानांतील किसान काम-गारांचा? मुळींच नाहीं! फक्त रशियाचा. आज पंडितजी रशियाच्या वर्चस्वाखालीं जायला तयार नाहींत म्हणून 'पंडित राज मुर्दाबाद' असें म्हणतात. उद्यां जर पंडितजी रशियाचें वर्चस्व मान्य करायला तयार झाले तर हेच भाई 'पंडित राज झिंदाबाद' म्हणून म्हण-तील. आजच्या पंडितजींच्या भांडवलशाही राज्याचें मग एकदम लोकराज्य निर्माण होईल. कम्युनिस्ट हे राष्ट्रविरोधी आहेत. देशद्रोही आहेत. पंडितजी रशियाशीं मैत्री ठेवूं इच्छितात, आम्हीहि रशि-याशीं मैत्री ठेवूं इच्छितों. पण बरोबरीची मैत्री. त्याच्या हुकमतीं-खालची मैत्री नव्हे.

या तीन मुख्य राजनैतिक पक्षाव्यतिरिक्त कांहीं घातपात यांच्याचे गुंडाचे पक्ष आहेत. पण त्याना तत्त्वज्ञान नाहीं. ते जातीयवादी गुंड, किसान कामगाराचे मुत्रींच नाहींत. ते भांडवलदाराचे आहेत, राजेरजवाड्याचे आहेत. आपल्या हातात सत्ता ठेवण्याकरिता त्यानीं उठविलेली हीं भुतें आहेत. आजहि जातीयवादी रा. स्व. संघ परत डोकें वर काढण्याचा प्रयत्न करीत आहे. पण त्याला रोखण्याचा कुठें प्रयत्न केला जात नाहीं.

या सर्वांचा विचार केल्यावर आपल्या लक्षात येईल कीं, किसान कामगार राज्य, समाजवादी राज्य, निर्माण करण्याकरिता सोशॅलिस्ट पक्षाखेरीज दुसरा पक्ष नाहीं. आपण आता नुसतेच ट्रेड यूनियनकडे पाहून चालणार नाहीं. त्याहीपुढें पाऊल टाका. राजकारणात भाग घ्या. सोशॅलिस्ट पार्टी खरीखुरी कामगारांची पार्टी बनवा.

आज मुंबई, ट्रेड यूनियन चळवळींत आघाडीवर आहे. गेली पंचवीस वर्षे मुंबईचे कामगार ट्रेड यूनियनच्या चळवळींत आहेत. पण दुर्भाग्य त्याचें कीं, त्याना कोणी ट्रेड यूनियनचें महत्व पटविलें नाहीं. आज येथें जमलेले असे किती कार्यकर्ते आहेत कीं, जे आपण होऊन मिल मजदूर सभेच्या ऑफिसमध्यें जाऊन वर्गणी भरायला सांगतात ? कामगार चळवळ तुमची आहे ना ! मग तुम्ही आपण होऊन तिचे सभासद का होत नाहीं ! यूनियनचे कार्यकर्ते दर महिन्याला सभासद करण्याकरिता कामगाराच्या पाठीमागें धावतात. कुठली कामगार चळवळ ही ? तुम्हाला जिवंत कामगार चळवळ पाहिजे असेल तर, यापुढें दर महिन्याला तुम्ही ऑफिसमध्यें

जाऊन सभासद बनले पाहिजे. कामगार चळवळीला भांडवलदार मदत करणार नाहीत, भांडवलशाही सरकार मदत करणार नाही. त्यांनी आपली चळवळ आपल्याच पायावर उभी केली पाहिजे. आपली यूनियन आपल्या फंडावर चालली पाहिजे. पण आहे का आज अशी परिस्थिति ! तुम्ही मनावर घेतलें तर, तावडतोब कामगाराची खरीखुरी संघटना उभी राहील. आजपर्यंत कामगारांनी जें जें केलें तें अशोक मेहता किंवा मी, किंवा तुमचे अध्यक्ष महाजनी यांनी नाही केलें. गांधीजींनी स्वातंत्र्य मिळविलें असें आपण म्हणतों. पण तें काय गांधीजींनी मिळविलें ? जनतेनें आपल्या ताकतीनें मिळविलें. गांधीजींनी त्यांना मार्गदर्शन केलें. आजपर्यंत कामगारांच्या संघटनेचे खेळ खेळले गेले. आपल्या समोरचा रस्ता साफ आहे असें समजून चालणार नाही. तो काट्याकुट्यांनी भरलेला आहे. पण म्हणून डगमगूनहि चालणार नाही. ११ ऑगस्टचा संप बारगळला म्हणून कामगार घाबरले. सरकारच्या दडपशाहीपुढे आपली ताकद कमी पडली. सर्व कामगारांना धैर्यानें उभें राहता आलें नाही म्हणून आपण अयशस्वी ठरलों. आपले डोळे आता उघडले आहेत. आपल्या संघटनेचा कमकुवतपणा आपल्याला दिसत आहे. आपण सर्व कामगारांचे डोळे उघडा आणि पुढच्याच महिन्याला मिल मजदूर सभेचे ५०,००० सभासद बनवून आपल्या ताकदीची सरकारला साक्ष द्या. आज आपण या ठिकाणीं जवळ जवळ २००० कार्यकर्ते, नुसते कामगार नव्हे, 'जमलां आहात.' आपल्यापैकीं प्रत्येकानें मनापासून जर प्रयत्न केला तर, ५०,००० सभासद करायला मुळींच हरकत

नाहीं. ११ ऑगस्टच्या संपापासून घेतलेला हाच आपला पहिला धडा आहे. आपले अध्यक्ष महाजनी गिरणींत काम करून आपल्या यूनियनची, कामगाराची सेवा करीत होते. आतां मालकशाहीनें त्यांना कामावरून कमी केलें आहे. आपली सेवा करायला त्यांना वेळ अपुरा पडत होता, म्हणूनच त्यांना जास्त वेळ दिला गेला कीं काय कोणास ठाऊक ! आतां दिवसाचे चोवीस तास ते आपल्या संघटनेकरितां देतील. आज आपल्याला अपयश आलें, तरी अंतिम जय आपलाच आहे, आणि आपल्या संघटनेच्या जोरावर तो आपण मिळवणारच. आज आम्ही हरलों. आमची ताकद अपुरी पडली म्हणून आपण संप मागें घेतला. पण आपण आपल्या मागण्या मागें घेतल्या नाहींत. आपण आपली ताकद वाढवूं आणि आपल्या मागण्या आज ना उद्यां मान्य करून घेऊं. ही संघटना बांधायला तुम्ही आतां कमरा कसा. पुढच्या पगाराला ५०,००० समासद करून आपण आपल्या मिल मजदूर सभेची व त्याबरोबर सोशॉलिस्ट पार्टीची ताकद वाढवा एवढाच माझा आपल्याला आज संदेश आहे.

## गांधीजींच्या खुनाला जबाबदार कोण ?

गेल्या महिन्यांत आपल्या देशांत जी एक दुर्घटना घडून आली, तशी आपल्या हिंदुस्तानच्याच नव्हे तर जगातील अन्य कोणत्याहि देशाच्या इतिहासांत यापूर्वी कधी घडली नव्हती. देश स्वतंत्र होतो न होतो, तोंच लागवर संकट परंपरा कोसळली. दंगली, खून रक्तपात अशा एक ना दोन अनेक आपत्तींना आपल्याला तोंड द्यावें लागलें. गेल्या कांहीं महिन्यापासून तर एक लढाईचें जणूं कांहीं देशांत सुरूं आहे. या अनर्थ परंपरेंत सारा देश रगडला जात होता, तोंच अशी एक भीषण आपत्ति कोसळली कीं ज्यामुळें साऱ्या देशाचें कंबरडेच मोडल्यासारखें झालें. नुकतेच कोठें आपण उभें राहून पावलें टाकूं लागलों होतों, तोंच आपल्यावर हा वज्रपात झाला आणि कपाळाला हात लावून बसण्याचा प्रसंग आपल्यावर ओढवला. आतां पुन्हां आपल्याला आपल्या पायावर कसें उभें राहतां येईल, आपलें पाऊल पुढें कसें पडेल, आतां आपला पुढील मार्ग कोणता हेच प्रश्न उभ्या देशाला आज भेडसावीत आहेत. परंतु या प्रश्नांचें उत्तर देणें मात्र सोपें नाहीं. आजपर्यंत आपल्या देशानें जें कांहीं मिळविलें, त्यावर बोळा फिरला गेला. अशा परि-स्थितींत आपण आपला पुढचा मार्ग शोधून काढला नाहीं तर,

साठ वर्षांची तपश्चर्या, त्याग आणि बलिदान मातींत जाईल. या भयानक आपत्तीमुळें आपण जायबंदी झालों असलों, तरीहि आपण आपला तोल सावरला पाहिजे. कर्तव्य ओळखून अचूक मार्ग चोखाळला पाहिजे. देशावर ही जी संकटपरंपरा कोसळली आहे ती कां, आणि कशी कोसळली, तें सर्वांनीं समजून घेणें आवश्यक आहे. जें झालें तें झालें. यापुढें आपल्यावरील या संकटराशी आपोआप बंद होतील असें कोणी समजत असेल तर, ती मोठी चूक ठरेल. शत्रूनें आपल्या घरांतच ठाण मांडलें आहे. आणि त्यानें आपला जमहि चांगलाच बसविला आहे. तो शत्रू शोधून काढून त्याला हुसकावून लावावयाचा आहे, नेस्तनाबूत करावयाचा आहे.

जगांत अमरपट्टा घेऊन कोणीच येत नाहीं. मला सव्वाशे वर्षे जगायचें आहे असें महात्माजी म्हणत असत. परंतु जगांतील सुखांचा उपभोग घेण्यासाठीं त्यांना इतकें जगायचें नव्हतें. इतर पुढाऱ्यांचे जमीन जुमले, पैसे अडके आहेत. मोठमोठ्या मानाच्या जागा, मंत्रीपदेंहि त्यांनी पटकावली आहेत. गांधीजींनी तर घरदार, मुलेंबाळें यांचाहि त्याग केला होता. स्वप्नांत देखील कधी ते कोठल्या पदाधिकाराची आशा करीत नसत. त्यांना जगायची इच्छा होती ती देशाकरतां, देशाची सेवा करायला मिळावी म्हणून. परंतु ज्यावेळीं आपल्याला त्यांची सर्वांत जास्त जरूर होती, अशा वेळींच ते आपणांस सोडून गेले. तसें पाहिलें तर असे पुष्कळ लोक आहेत कीं, ज्यांनी त्यांच्यापाशीं राजकारणाचीं मुळाक्षरें गिरवलीं. परंतु तेहि म्हणूं लागले होते कीं, ' आतां महात्माजींनी संन्यास घ्यावा. त्यांनी राज-

कारण सोडून द्यावें.' 'राजकारणाचे डावपेच कांहीं निराळेच असतात. त्यांच्यासारख्या महात्म्याला योडेंच ते साधणार!' परंतु आपणा सर्वांचें लक्ष तर गांधीजींच्यावरच खिळलेलें असे. स्वतंत्र हिंदुस्तानचें सरकार कोणाचें असलें पाहिजे, खेडीं कशीं असावींत, शहरें कशीं बसविलीं जावींत, उद्योगधंद्याची वाढ कशाप्रकारें केली जावी, आपला शिक्षणक्रम कसा असावा, आपापसातील वागण्याची पद्धत कशा प्रकारची असावी, या सर्व प्रश्नाचा उलगडा करून घेण्यासाठीं जनता गांधीजींकडे बघत असे. या कसोटीच्या काळांत तेच देशाला अचूक रस्ता दाखवूं शकले असते. आपल्या देशाचेंच नव्हे तर, साऱ्या जगाचें मार्गदर्शन त्यांना करायचें होतें. जेथें पाशवी शक्तीच सर्वांत बलिष्ठ समजली जाते, सैन्य आणि शस्त्रसंभार हीच जेथें सर्वांत भारी ताकद मानली जाते, अशा या जगात त्याची जरूर आज सर्वांत जास्त भासत होती. आणि नेमकें याच वेळीं ते आपल्यातून निघून गेले. इतर चार चौघासारखाच त्यानांहि नैसर्गिक मृत्यू आला असता तरी देखील हिंदुस्तानला दुःख झालेंच असतें, आणि त्याची उणीव भरून निघाली नसती. परंतु ज्या तऱ्हेनें त्याना मृत्यू आला, त्यामुळें तर आपला दु:खभार अधिकच वाढला आहे.

परंतु आपल्याला नुसतें रडत बसून चालणार नाहीं. ज्या व्यक्तींच्या हल्लाराला ते बळी पडले, त्याचा तलास आपल्याला लावायचा आहे. आणि त्याला शासन कसें करायचें, कशाप्रकारें त्याचा प्रतिकार करायचा त्याचाहि विचार करायचा आहे. आपण इंग्रजाशीं सामना दिला, त्यांना पराभूत करून गुलामगिरीतून आपली सुटका

करून घेतली. परंतु या शत्रूचा मुकाबला कसा करावयाचा हाच खरा प्रश्न आहे. गांधीजींच्या दर्जाला न शोभणारें वर्तन करण्याची हिंमत इंग्रज सरकारला देखील झाली नाहीं. इंग्रजानीं जरी त्याना गिरफदार केले तरी त्यांच्या हातांत कधी बेड्या घातल्या नाहींत. तुरुंगांत टाकले तरी ते देखील मोठ्या प्रतिष्ठेनें. अशा त्या महात्म्याची हत्या एका हिंदी इसमाच्या हातून व्हावी हें एक आश्चर्यच नव्हे तर काय !

आपण हें लक्षांत ठेवा कीं, हें कांहीं एकाद्या वेडपटानें किंवा पिसाटानें केलेले कृत्य नव्हे. कोणा एका व्यक्तीनें त्याचा खून केलेला नाहीं. देशांत अशी एक विचारसरणी होती, विशिष्ट मनः-प्रवृत्तीचे लोक होतें कीं, ज्याचा या खुनात हात होता. गांधीजींनीं आपल्याला किती तरी गोष्टी शिकवल्या. त्यापैकीं काहीं आपण ग्रहण केल्या, कांहीं सोडून दिल्या. दिल्लीला प्रार्थनेच्या वेळीं रोज कितीतरी गोष्टी ते आपल्याला सांगत. परंतु त्याकडे कितीसे लोक लक्ष देत ! तरीहि त्यांच्या उपदेशांत खंड पडत नसे. परंतु जे लोक आपल्या स्वातंत्र्याच्या मुळावर उठले आहेत, त्यांच्यापासून आपलें रक्षण कसें करावयाचें तेवढें मात्र ते सांगूं शकले नाहींत. त्यांच्या जीवनापासून जें आपल्याला शिकता आलें नाहीं तें आंता त्याच्या बलिदानानें तरी निदान आपण शिकूं या. तीन महिन्यांपूर्वी एका भाषणांतून मी सांगितलें होतें कीं, देशांत एक अजब ताकद पैदा झाली आहे. दहा दिवस पर्यंत तिनें दिल्लींत धुमाकूळ उडवून दिला होता. पण ती ताकद मुसलमानाची नाहीं. ते तर बिचारे आसरा मागत होते. जे हिंदू आणि शीख लूटमार करीत होते, जनतेच्या आणि तिच्या प्रति-

निधींच्या हातांतील सत्ता बळकावण्याची ज्यांनी प्रतिज्ञा केली होती अशा हिंदू आणि शिखांपासूनच धोका निर्माण झाला होता. ते अगदी उघडपणें म्हणत कीं, "आम्ही हिंदुस्तानचा ब्रह्मदेश करूं. आणि गांधी नेहरूंची प्रेतें दिल्लीच्या सडकेवर खुशाल सडूं देवूं." मी तर त्याच वेळीं या धोक्याची सूचना देऊन ठेवली होती व आपण स्वातंत्र्याची लढाई खरी कशा करतां लढलों तेंहि सांगितलें होतें. गरिबांचे कष्ट कमी होतील, जनतेच्या हातीं राज्याचीं सूत्रें येतील, भुकेनें पिडलेल्या लोकांच्या तोंडांत अन्नाचा घास पडेल, कापडाची टंचाई भासणार नाहीं, आजारी लोकांच्या दवापाण्याची सोय होईल, शाळा कॉलेजांचा लाभ सर्वांना सारखा मिळेल, शेती आणि उद्योगधंदे यांची वाढ होईल अशी आशा जनतेला वाटत होती. त्यासाठींच आपण स्वातंत्र्याची लढाई लढलों. परंतु आज तर आपल्या देशांत गंगा उलटी वहावयास लागली आहे. श्रमजीवी जनता भुकेनें तडफडत आहे तर, ऐतखाऊ लोक मजा मारीत आहेत. आपली राजकीय आणि आर्थिक व्यवस्था अशी असावयास पाहिजे कीं, ज्यायोगें प्रत्येकाच्या श्रमाचें न्याय्य रीतीनें वाटप होईल. आपल्या स्वातंत्र्याची लढाई ही कांहीं एखाद्या ग्वाल्हेरच्या राजानें नाहीतर भांडवलदारानें अगर लक्षाधीशानें लढविलेली नाहीं. त्यावेळीं ते सर्व लोक तर इंग्रजांचे बूट चाटीत बसले होते. स्वातंत्र्यासाठीं लढले ते गरीब लोकच. तेव्हां त्या गरिबांचेंच राज्य कां होवूं नयें? हाच तर सर्वांत मोठा प्रश्न आहे. आपल्या देशांत एक क्रांति नुकतीच झाली आहे. परंतु दुसरीहि क्रांति व्हावयास हवी. राज्यक्रांति झाली तरी

समाजक्रांतीहि आपण घडवून आणली पाहिजे. 'ज्या समाजांत उच्च नीच, असे भेद नसतील, जेथें कोणी राव नसेल आणि कोणी रंक नसेल, असा एक नवीन आदर्श समाज आपण निर्माण केला पाहिजे. इंग्रजांचें राज्य नष्ट करण्यापेक्षां देखील हें काम अत्यंत बिकट आहे. परंतु तरीहि तें तडीस नेलेंच पाहिजे. ही सामाजिक क्रांतीसुद्धां लवकरच झाल्याशिवाय राहणार नाहीं. कॉंग्रेस म्हणजे कांहीं समाज वादी संस्था नाहीं. परंतु तिनें नेमलेल्या आर्थिक समितीच्या अहवालाचा सूर देखील असाच आहे. त्या अहवालांत समाजवादाचा पुरस्कार करण्याची सूचना करण्यांत आली आहे. आणि त्यामुळें मुंबई, कलकत्याच्या भांडवलदारांचा भीतीनें थरकाप झाला असून, त्यांच्याकडून दिल्लीला तारावर तारा येऊन पडत आहेत.

या क्रांतीला घाबरणाऱ्या ज्या शक्ति आहेत, त्यांचे जवळ इंग्रजांप्रमाणें जनतेशीं टक्कर देण्याचें कोणतेंहि साधन नाहीं. हे राजे, हे नबाब, आणि हे शेटसावकार कशाच्या जोरावर जनतेशीं सामना करणार ! त्यांच्याजवळ ना फौजफाटा ना शासन यंत्र. तेव्हां स्वतःचें रक्षण करण्यासाठीं त्यांनीं निराळेच उपाय शोधून काढले आहेत. क्रांतीपासून आपल्यालाच तेवढें कांहीं शिकतां येतें असें नाहीं. जनतेचे शत्रू देखील त्यापासून धडे घेतात. ते पहातात कीं, बहुमत गरिबांचें आहे. सर्व गरिबांचे फायदे तोटे एकाच प्रकारचे असून त्यांचीं संकटें दूर करण्याचा मार्ग देखील एकच आहे. सर्व गरीब जनतेचें अभेद्य संघटन करणें हाच तो सरळ, साधा असा एकमेव मार्ग होय. श्रीमंत लोक ओळखून आहेत कीं, सर्व गरीब

जनता जर एक झाली तर, त्यांची सत्ता हिसकावून घेतली जाईल. त्याचे राजवाडे, त्याच्या बँका, त्याचे कारखाने या सर्वांचा कबजा केला जाईल. तेव्हा गरीब जनतेची एकजूट होवूं नये म्हणून त्यांचा एकसारखा प्रयत्न चाललेला असतो. इंग्रजांपासून ते एक मोठा धडा शिकले आहेत. ज्यावेळी आम्ही आपापसांत भांडत होतों, त्याच-वेळीं इंग्रज येथें आले. त्यांनीं आपलीं भांडणें वाढविलीं. जोंपर्यंत आपली एकी होत नव्हती, तोंपर्यंत त्यांचें येथील आसन स्थिर होतें. काँग्रेसनें आपणा सर्वांची एकजूट केली. परंतु जनतेंत लढाई लावून देऊन ही एकजूट मोडण्याचा प्रयत्न हे भांडवलदार, जहागीरदार सतत करीत आहेत. ज्यायोगें हिंदू शेतकरी मुसलमान शेतकऱ्याचा गळा घोटील, पठाण मजूर शीख मजुराच्या पाठीत सुरा खुपसण्यास उद्युक्त होईल, इतकेंच नव्हे तर, बंगालविरुद्ध बिहार, गुजराथ विरुद्ध महाराष्ट्र असे झगडे होतील, अशी परिस्थिति त्यांना निर्माण करावयाची आहे. असे नानाप्रकारचे झगडे निर्माण करून सामान्य जनतेची दिशाभूल करण्याचा भांडवलदारांचा उद्देश आहे. मी अनेकवार आपणाला हें विघ्न नष्ट करा म्हणून सांगितलें होतें. मुस्लीम लीगचें नेतृत्व आणि इंग्रजांचा पाताळयंत्रीपणा यामुळें देशाचीं दोन छकलें झालींच आहेत. आतां या स्वार्थी लोकांना जर आपण वेळींच पायबंद घातला नाहीं तर, जनता राज्याची गोष्ट तर दूरच राहो, उलट देशाचे आणखी तीनशे तुकडे पडतील. एकट्या हिंदू राष्ट्रानें भागत नाहीं. जर हिंदू राज्य निर्माण झालें तर, शीख राज्य कां होऊ नये? बौद्ध, जैन

पारशी वगैरे लोकांना आपलीं स्वतंत्र राज्यें असावींत असें वाटणार नाहीं कशावरून ? शिवाय हिंदूचें राज्य झालें तरी शेवटी तें कोणाचें होणार ? रजपुतांचें राज्य कीं, जाटांचें कीं ब्राह्मणांचे, कीं आणखी कोणाचें ? भरतपूरच्या जाटांचा तर पुर्वीपासून दिल्लीवर डोळा आहे. राजपुतान्यांत रजपुतांचें राज्य झालें तरी पुन्हां त्यावर स्वामित्व कोणाचें ? उदेपूरचें कीं जयपूरचें ? मराठ्यांच्या राज्याची गोष्ट घेतली तरी तेथें शिवाजीचे वंशज म्हणविणाऱ्या कोल्हापुरकरांचें राज्य होईल कीं, बडोदा–ग्वाल्हेरकरांचें राज्य होईल ? या राजे लोकांच्या मनांत देशभक्तीची भावना अजिबात नसते हें ध्यानांत असूं द्या. ते फक्त स्वतःचा स्वार्थच ओळखतात. त्यांची आपापसांत प्रतिस्पर्धा निर्माण होईल. आणि त्याचा निकाल करून घेण्यासाठीं ते कांहीं गोलमेज परिषदांची वाट बघत बसणार नाहींत. तर तलवारींच्या खणाखणीनेंच निर्णय ठरविले जातील. रक्ताच्या नद्या वाहतील, देश शेकडों तुकड्यांत विभागला जाईल आणि मोंगल अमदानीच्या शेवटीं शेवटीं आमची जी परिस्थिति झाली होती, तीच परत आमच्या वाट्याला येईल. आणि त्यानंतर ?— त्यानंतर कदाचित पुन्हां आम्हाला गुलाम म्हणून रहावें लागेल.

ज्यावेळीं मी या सर्व भयानक गोष्टींची कल्पना दिली, त्यावेळीं सर्व वृत्तपत्रांनी माझी टर उडविली. पुढारी मंडळींनीं माझी टवाळी केली. परंतु ज्यांच्या मेंदूचे दरवाजे अद्यापपर्यंत बंद होते ते आंता उघडतील. आपणांमध्यें जातीयवाद जर ठाण मांडून बसला तर, आपण पुढें जावूं शकणार नाहीं. आपल्यांत भेदाभेद कांहीं कमी

नाहींत. परंतु ही भिन्नता नष्ट करून एकजुटीच्या जोरावर आपण स्वातंत्र्य मिळविलें. ती भिन्नता यापुढेंहि आपण दडपून टाकूं शकलों तरच आपलें स्वातंत्र्य चिरकाल टिकूं शकेल. लोखंड चांगलें लाल होईपर्यंत तापवून आणि नंतर ठाकून ठोकूनच त्याची तलवार किंवा नांगर आपण बनवूं शकतों. आपण यापासून बोध घेतला नाहीं तर, महात्माजींचें बलिदान निष्फळ ठरेल. सर्वांत प्रथम आपण स्वतःला हिंदी समजलें पाहिजे. आणि त्यानंतरच हिंदू अथवा मुसलमान, बंगाली किंवा बिहारी अशा भावनांना स्थान दिलें पाहिजे. जोंपर्यंत आपण अशातऱ्हेनें विचार करूं शकत नाहीं, तोंपर्यंत आपलें पाऊल पुढें पडण्याची आशाहि करावयास नको. आपला भविष्य फोळ तोंपर्यंत उज्ज्वल होऊं शकणार नाहीं. हीच गोष्ट महात्माजी आपल्याला वारंवार सांगत असत. आणि आपल्या अमोघ वाणीनें अगदीं शेवटींहि त्यांनीं हीच गोष्ट आपल्याला पुन्हां सांगितली. १५ ऑगस्ट नंतर आर्थिक आणि राजकीय दृष्टयाहि आपण कित्येक पावलें मागें हटलों आहोंत. जगांत आपल्या हिंदुस्तानला जो मान मिळूं लागला होता, तोहि आपण धुळीला मिळविला आहे. आतां तरी आपल्या राज्यकर्त्यांचे डोळे उघडले आहेत ही मोठ्या आनंदाचीच गोष्ट म्हटली पाहिजे. राष्ट्रीय स्वयंसेवक संघ आणि भेदाभेद माजविणाऱ्या तत्सम इतर संस्था बेकायदा ठरविण्यांत सरकारचा शहाणपणा दिसून येतो. ही गोष्ट तर आम्ही पहिल्यापासून सांगत होतों. परंतु बडे बडे पुढारी आमच्या बोलण्याकडे कोठलें लक्ष द्यायला! आमच्या बिहार प्रांतांत रा. स्व. संघाचा एक फार मोठा मेळावा भरला होता.

त्याला तर कित्येक मंत्रीदेखील हजर राहिले होते. वरवर पहाणा–ऱ्याला त्यांची कवायत कितीहि आकर्षक वाटली, तरी त्यांची अंतस्थ कारस्थानें मात्र निराळींच असत. या सर्व गोष्टी आम्ही जनतेसमोर आणि काँग्रेससमोर ठेवल्या होत्या. परंतु आमचा शत्रू प्रत्यक्ष राज्य-कर्त्यांच्या आश्रयानेंच वाढत होता. हुकूमत बदलण्याचा हक्क तर सर्वांनाच असला पाहिजे. परंतु त्याची रीत कोणती? सावरकर आणि गोडसे यांनीं हें सरकार वाईट आहे असें जनतेला खुशाल सांगावें. निवडणुकीच्यावेळीं जनतेजवळ मतांची मागणी करावी. आणि जनतेला हत्यारी लोकांचें राज्य पाहिजे असेल तर, त्यांना कदाचित मतें मिळतीलहि. लोकांना आत्मघातच करून घ्यावयाचा असेल तर, त्यांना कोण अडविणार? परंतु ज्यावेळीं जनतेला नेहरू सरकारचें राज्य हवें असतें, त्यावेळीं कांहीं मूठभर लोकांनीं बॉंब पिस्तुलाच्या सहाय्यानें तें उलथून टाकण्याचा यत्न केला तर, त्यांनीं देशाचा आणि जनतेचा द्रोह केल्यासारखें होईल. इंग्रजांविरुद्ध आमच्यापैकीं कांहींनीं बॉम्ब, पिस्तुलें चालवून पाहिली. परंतु तें राज्य जनतेच्या इच्छेविरुद्ध आपल्या देशावर लादलें गेलें होतें. आणि म्हणूनच तें उलथून टाकण्याचा आपल्याला पूर्णपणें हक्क होता. परंतु जें राज्य जनतेच्या इच्छेनुसार प्रस्थापित झालेलें असेल त्या राज्याशीं अशा तऱ्हेची वर्तणूक करणें म्हणजे प्रजाविद्रोहच आहे. अशा तऱ्हेच्या कुमार्गानें स्थापन केलेलें राज्य जनताराज्य कधींच होऊं शकणार नाहीं. तें तर मारेकऱ्यांचें आणि लुटारू लोकांचें राज्य होईल. मग ते लोक राजे महाराजे असोत, नबाब जहागिरदार

असोत, बडेबडे मांडवलदार असोत अथवा अन्य कोणीहि असोत !

दिवसें दिवस हा धोका वाढतच होता. आम्ही एकसारखे घसा फोडून ही गोष्ट जनतेला सांगत होतों. अखेर कॉंग्रेसचेंहि लक्ष तिकडे वेधलें. आणि दिल्लीस भरलेल्या अ० भा० कॉंग्रेसच्या बैठकींत रा. स्व. संघाविरुद्ध ठराव पास करण्यांत आला. तो ठराव प्रत्यक्ष गांधीजींनींच आपल्या हातानें लिहिला होता. त्यांत त्यांनीं म्हटलें होतें कीं, हा संघ म्हणजे आपल्या देशाला असलेला एक फार मोठा धोका आहे. परंतु "तीन महिने होवून गेले तरी देखील मध्यवर्ति अथवा प्रांतिक सरकारांनी संघाचें प्रस्थ नष्ट करण्यासाठीं कांहीं उपाय योजना केली आहे काय ! कॉंग्रेस ही अत्यंत प्रचंड अशी संस्था आहे. छोट्या छोट्या खेड्यापर्यंत तिच्या शाखा पसरल्या आहेत. आम्ही ज्याप्रमाणें कार्य करीत आलों त्याप्रमाणें प्रांतिक सरकारें आणि कॉंग्रेस संघटना यांनींहि प्रयत्न केले असते तर, कदाचित आम्हीं महात्माजींना गमावूनहि बसलों नसतों. पुणें शहर म्हणजे संघाचा अगदी बालेकिल्ला समजला जातो. त्याठिकाणीं आणि हिटलरपासून दीक्षा घेवून आलेल्या डॉ. हेडगेवारांच्या गांवींसुद्धां मी अत्यंत उघडपणें संघाची निर्भत्सना केली होती. संघवाल्यांनी मला धमकीचीं अनेक पत्रें लिहिलीं. ज्या ज्या ठिकाणीं मी गेलों, त्या त्या ठिकाणीं मी असाच निर्भीडपणें बोलत राहिलों. परंतु कॉंग्रेसमधील मंत्रीपदापर्यंत पोहोंचलेल्या कांहीं मंडळींनीं आणि इतरांहि कांहीं पुढाऱ्यांनीं संघाला देशभक्तांची संस्था म्हणून संबोधलें होतें. तें वाचून माझ्या मनाला फार वेदना झाल्या. असा बेजबाबदारपणा

त्यांच्या हातून कां घडला ! ज्या लोकांनीं जातीयवादाशीं तडजोड करण्याचा प्रयत्न केला, त्या सर्वांवर गांधीहत्येची जबाबदारी येवून पडते. फक्त गांधीजींचा खून करायचा येवढाच त्यांच्या मारेकऱ्यांचा उद्देश नव्हता. त्यानंतर मोठ्या प्रमाणावर हत्याकांड घडवून आणण्याचा कट त्यांनीं रचला होता. या कापाकापीनंतर दिल्लीची हुकूमत बळका-वण्याचा त्यांचा विचार होता. राज्ययंत्रामध्यें अनेक ठिकाणीं त्यांनीं आपलीं माणसें घुसविलीं होतीं. सिव्हिल सर्व्हिस, सेक्रेटरियट आणि पोलिस खात्यांत त्यांनीं आपलीं माणसें पेरून ठेवलीं होतीं. ज्यावेळीं दिल्लीवर हल्ला होईल, त्यावेळीं या सर्व माणसांनी त्याला मदत करावयाची अशी त्यांची योजना होती. हा धोका अद्याप नष्ट झालेला नाहीं. आणि कांहीं लोकांना पकडून ठेवल्यानें हा धोका नष्ट होईल असेंहि नाही. या विषारी सर्पाचें डोकें ठेचण्यासाठीं तशाच मजबूत हातानें प्रहार केला पाहिजे. त्याचबरोबर अशा लोकांविरुद्ध जनतेंत खूप प्रचार केला पाहिजे. हे इतके नवजवान संघांत सामील झाले तरी कसें याचाहि विचार व्हावयास हवा. त्या तरुणांत जोश होता, कार्याबद्दलचा अदम्य उत्साह होता. त्यांच्यासाठीं कांहीं-तरी कार्यक्रम आखला पाहिजे, . असें आम्हीं म्हणत होतों. एक स्वयंसेवक पथक तयार करून त्यामध्यें उत्कृष्ट कवायत शिकविली जाईल, हत्यारांचें शिक्षण दिलें जाईल आणि राष्ट्रीयवृत्तीचें बीजा-रोपण होईल अशी एखादि योजना आ.स.प.स हवी होती. परंतु अशा तऱ्हेचा प्रयत्न झाला आहे काय ! 'नॅशनल गार्ड' या नांवाचें एक स्वयंसेवक पथक बनविण्याचें कार्य सुरू झालें आहे, पण त्यांतहि

पूर्वीचेंच नोकरशाही धोरण घुसडलें जात आहे. नवा हिंदुस्तान निर्माण करण्यासाठीं हजारों वर्षांचा कालावधी लागणार आहे अशी हा उपक्रम सुरू करणारांची कल्पना दिसते.

मी आपणाला हें सांगितलेंच आहे कीं, अद्याप जातीयवादाचें हें संकट नष्ट झालेलें नाहीं. त्याच्याशीं अजूनहि आपल्याला सामना द्यावा लागणार आहे. तोच हेतु मनांत धरून मी दिल्ली येथें एक वक्तव्य केलें होतें. परंतु त्यासंबंधीं गैरसमज करून घेऊन त्याचा अपप्रचार करण्यांत आला. त्या गैरसमजुती मी या ठिकाणीं दूर कराव्यात असें मला सुचविण्यांत आलें आहे. मी तुमच्यापैकींच एक आहे. तुमच्या घरांतील मी एक कुटुंबीय आहे. तुमच्याहि मनांत माझ्याविषयी गैरसमज पसरले असतील अशी माझी कल्पना नव्हती. परंतु दुर्दैवानें अनेक वर्तमानपत्रांच्या नाड्या लक्षाधीशांच्या आणि राजेमहाराजांच्या हातांत असतात. आणि ते ज्या स्वरूपाचा प्रचार करतात, त्यामुळें आपल्या मनांत गैरसमज निर्माण झालें तर त्यात आश्चर्य मानण्याचें कांहीं कारण नाहीं. तथापि आपल्या मनांत माझ्या प्रामाणिकपणाबद्दलच जर शंका असेल तर मात्र मला अत्यंत दुःख होईल. माझ्या हातून चुका होणें संभवनीय आहे. कदाचित तुमचे माझे मतभेदहि होवूं शकतील. परंतु महात्माजींच्या वधाचा फायदा घेवून मी स्वार्थ साधूं इच्छितों असें म्हणणें म्हणजे माझ्या-वर अत्यंत अन्याय करण्यासारखे आहे. बिहारमध्यें १९३० साला-पासून सोशॅलिस्ट पार्टी काम करीत आहे. परंतु दुसऱ्यानी केलेल्या चुकांचा फायदा आम्ही कधीच करून घेतला नाहीं. मग महात्मा-

जींच्या हत्येचा फायदा घेण्याचा प्रयत्न आम्ही कसा करूं ! तसें काहीं मी केलें तर सार्वजनिक जीवनांत राहण्याचा कसलाहि अधिकार मला उरणार नाहीं असें मी समजतों. वैयक्तिकरित्या मी त्यांच्या किती निकट गेलों होतों ते आपणां सर्वांना माहीतच आहे. मला आणि माझ्या पत्नीला गांधीजींच्या कुटुंबातच स्थान मिळण्याचें महद्‌भाग्य लाभलें होतें. आर्थिक प्रश्नांच्या बाबतींतहि त्यांची माझी मतें पुष्कळशीं जुळनीं होवूं लागलीं होतीं. परंतु असेहि कांहीं प्रसंग आले होते कीं, त्यांच्याशीं माझा मतभेद झाला. परंतु या मत-भेदाचे प्रसंगीं मूर्खपणा अथवा अश्रद्धा आम्ही कधींच येवूं दिली नाहीं. असें असतांना ते गेल्यानंतर जर मी स्वार्थ साधूं लागलों तर राजकीय जीवनात मला अजिबात स्थानच नाहीं असें म्हटलें पाहिजे. आपल्या आणि आपल्या पुढाऱ्यांच्या हातून ज्या अनेक चुका झाल्या, त्यामुळेंच गांधीजींची हत्या घडली असें मला निश्चित-पणें वाटतें.

संघाच्या या धोक्याची कल्पना जनतेला आगाऊच दिली गेली असती, आणि आमच्या काहीं पुढाऱ्यांनी आणि मंत्र्यानी संघाच्या उत्सवांत भाग घेवून त्याची स्तुती जर केली नसती, उलट तरुणाची समजूत घालून त्यांना संघापासून परावृत्त केलें असतें तर, आपण गांधीजींना गमावून बसलों नसतो असा माझा विश्वास आहे. गांधी-जींच्या रक्षणाची जी व्यवस्था करण्यात आली होती तीहि, पुष्कळशी सदोष होती. आपल्या हातून चुका घडल्या तर त्या आपण मान्य केल्याच पाहिजेत. परंतु आपण तर त्या झाकून टाकण्याचाच

प्रयत्न करीत असतों. हें सत्यकथन केल्यामुळें माझ्यावर टीकेची झोड उठविण्यांत येईल याची मला जाणीव होती. तरी देखील सत्य गोष्टी जनतेसमोर ठेवणें आवश्यक होतें. आणि तसें केल्याबद्दल अपेक्षेप्रमाणें माझ्यावर टीकेचा वर्षाव झालाहि. कांहीं लोक असें म्हणतात कीं, गांधीजींच्या मृत्यूनंतर जयप्रकाशांना अधिकाराच्या जागेची हाव सुटली आहे. परंतु मला सत्तेचीच हांव असती तर, अधिकाराच्या जागा मला पूर्वीच मिळाल्या असत्या. ज्या जागांकरता अनेक जण खुशामत करतात अशा कित्येक मोठ्या मानाच्या जागा मला देवू करण्यांत आल्या होत्या. मंत्रीपद देखील मला अगदी सहज मिळालें असतें. खुद्द महात्माजींनींसुद्धां अनेकवार ही गोष्ट माझ्यापाशीं काढली होती. मी फार हुशार नसलों तरी अधिकारपदें निर्भीडपणें टीका करणारापेक्षा, खुशामत करणारांना चटकन मिळतात एवढें उमगण्याइतकी अक्कल माझ्याजवळ खासच आहे. हा निर्भीडपणा मी, माझे आई वडील, जनता आणि गांधीजी यांपासून शिकलों. माझ्या वक्तव्यामुळें मी दुसऱ्या कोणाचेंहि नुकसान केलेलें नाहीं. नुकसान झालें असेल तर तें व्यक्तिशः माझेंच झालें आहे. एका सभेंत मी सरदार पटेल व पंडित नेहरू यांच्यातील मतभेदांचा उल्लेख केला होता. त्यावेळीं सुद्धां शोकसभेंत मी ती चर्चा करावयास नको होती असा गहजब माझ्याविरुद्ध करण्यांत आला. दिल्लीत जितक्या शोकसभा मी घेतल्या, तितक्या दुसऱ्या कोणींहि घेतल्या नाहींत. त्या एकंदर वीस सभांपैकीं एकींतच मी तो विषय काढला होता. आणि तोहि एका विशिष्ट उद्देशानें. दिल्ली शहरांत सर्वत्र

नेहरू आणि पटेल यांच्यांत मतभेद माजले आहेत अशा प्रकारची कुजबूज त्यावेळीं चालली होती. मोठमोठया लोकांतहि त्याची चर्चा चालत होती, इतकेंच नव्हे तर, परदेशी वृत्तपत्रांतूनहि त्याचा परिस्फोट झाला होता. मला असें वाटलें कीं, ही गोष्ट त्यांच्या नजरेला आणून दिली तर, हे दोन्ही पुढारी जनतेचे गैरसमज दूर करून दोघेहि एकमतानें पावलें टाकीत आहेत असा विश्वास जनतेच्या मनात निर्माण करतील. आणि त्यांत मला यश आले याचा आनंद होत आहे. याबाबतींत दोन्ही पुढाऱ्यांचीं जीं वक्तव्यें प्रसिद्ध झालीं आहेत त्यामुळें आतां सर्व गैरसमज दूर झालेले आहेत.

दिल्लीच्या सध्याच्या राजवटीमुळें बरेचसे लोक असंतुष्ट झाले आहेत. आपल्याला जर जातीयवादाशीं लढावयाचें आहे तर, मंत्रिमंडळांत हिंदुमहासभेच्या अगर अकाली दलाच्या प्रतिनिधींना प्रवेश मिळतो कसा ! कांहीं विशेष वाईट गोष्ट झाली म्हणजे मंत्रिमंडळांत बदलण्याची रीत असते. गेल्या महायुद्धांत चर्चिल आणि रूझवेल्ट यांनी आपल्या मंत्रीमंडळांत कित्येक वेळां बदल केले. इंग्रजांच्यावर आज आर्थिक संकट आलेलें असून त्याला तोंड देण्यासाठी ॲटलीनें कितीतरी बदल मंत्रीमंडळांत घडवून आणले आहेत. गांधीजींच्या हत्येच्या रूपानें आपल्यावरहि आज असेंच एक मोठें संकट येवून पडलें आहे. आणि म्हणूनच मी असें म्हटलें कीं, आपल्या मंत्रीमंडळांत फेरबदल करण्याची हीच एक संधी आहे. जे जातीयवादी आणि आपल्या राष्ट्राचे दान सतत बळकट करणारे आहेत, त्यांची मंत्रिमंडळांतून हकालपट्टी झाली पाहिजे. हे सरकार जनतेचें आहे,

मांडवलदारांचें नाही. तरी सुद्धां आमच्या एका पुढाऱ्यानें मांडवलदारांना स्वच्छपणें असें सांगितलें कीं, त्यांचा एक प्रतिनिधी मंत्रीमंडळावर घेण्यांत आला असल्याकारणानें त्यांनी घाबरण्याचें कांहींच कारण नाहीं. आतां आपणच विचार करा कीं, अशा तऱ्हेच्या आश्वासनांनीं जनतेचें हित कधी तरी साधूं शकेल काय? मंत्रिमंडळांत बदल करण्याची सूचना मी कांहीं वेडेपणानें केलेली नाहीं. आजहि माझें तेंच मत कायम आहे.

माझ्याबद्दल तुमच्या मनांत निर्माण झालेले गैरसमज नाहिसें व्हावेत म्हणून माझी ही कैफियत मी आपणाला सादर केली. कारण मी आपल्याला माझे समजतों. परंतु मी प्रथम जी गोष्ट आपल्यापुढें मांडली तीच खरी आहे. हल्लीं धरपकडीचें जें सत्र सुरू आहे त्याची तर आवश्यकता आहेच, परंतु केवळ तेवढ्यानें जातीयवाद मरणार नाहीं. रा. स्व. संघ किंवा मुस्लीम लीगचें नॅशनल गार्ड बेकायदा ठरविण्यांत आलें आहे हें खरें, परंतु मी आपल्याला असें विचारतों कीं, हिंदुमहासभा आणि मुस्लीम लीग यांनाहि बेकायदा कां ठरविण्यांत आलें नाहीं? अशा संस्थांवर बंधनें घातल्यामुळें लोकशाही तंत्राला बाधा येतो ही अगदी खोटी गोष्ट आहे. आपल्याला जर एक संयुक्त राष्ट्र बनवावयाचें असेल तर, राष्ट्रीय ऐक्य आपल्याला स्थापन केलेंच पाहिजे. धर्माच्या नांवावर जनतेकडून मत उपटण्याचा हक्क देणें, म्हणजे तें राष्ट्रीय ऐक्य संपुष्टांत आणण्यासारखेंच आहे. आर्थिक कार्यक्रमाच्या ऐवजी धार्मिक भावनांवर मतें मागण्याची मुभा ठेवली तर आपल्या राजकीय जीवनांत

असा अनावस्था प्रसंग येईल कीं, आपल्याला उभे राहण्यास कोठें जागाहि उरणार नाहीं. ज्यावेळीं पाकिस्तानची स्थापना झाली त्याच-वेळीं सोशॅलिस्ट पार्टीनें असें जाहीर केलें होतें कीं, यापुढें आपल्या देशात जातीय संस्थांना कार्य करण्यास बंदी करण्यात यावी. आजहि आम्ही असें सागतों कीं, एखाद्या जातीच्या, पथाच्या अगर धर्माच्या नावावर कोणत्याहि संस्थेला राजकारणात भाग घेता येणार नाहीं असा कायदा शक्य तितक्या लवकर अमलात आणला पाहिजे. पहिल्यानें तर आमच्या या म्हणण्याकडे कोणी लक्षच दिलें नाहीं. परंतु आता महात्माजींच्या वधानंतर तरी, आमच्या सागण्यापाठी-मागचें सत्य समजावून घेण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

जे लोक राज्ययंत्रात राहूनहि संघाला मदत करण्याचा यत्न करतात, त्यांच्यापासूनच आपल्याला सर्वात जास्त धोका आहे. बिहारमध्यें तर काहीं वरिष्ठ पोलिस अधिकाऱ्याविरुद्ध हा आरोप ठेविला जातो. त्याबद्दलचा एक पुरावाहि आमच्यापाशीं आहे. त्या प्रातात जोशी या नावाची व्यक्ति संघ संचालक म्हणून काम करीत असे. हिंदुस्तान सरकारनें संघ बेकायदा ठरविल्यानतर तीन दिवसानीं त्याच्या घराची झडती घेण्यांत आली. इंग्रज सरकार ज्यावेळीं कॉंग्रेस बेकायदा ठरवीत असे, त्यावेळीं तातडतोब अर्ध्या रात्रीं सर्व देशभर झडत्या घेतल्या जाऊन धरपकड केली जात असे. आज तर आपलें स्वतःचें राज्य आहे. तेव्हा पूर्वीपेक्षा जास्त सफाईनें कामें व्हावयास पाहिजेत. असें असताना तीन दिवसानंतर पोलिस अधिकारी जागे होतात आणि त्यानंतर झडती घेतली जाते ही गोष्ट सरकार सहन कशी

करूं शकतें ! माझें असें मत आहे कीं, सरकारी नोकरांना देखील स्वतंत्र राजकीय मत बाळगण्याचा व त्याप्रमाणें मतदान करण्याचा हक्क जरूर असला पाहिजे. कारण सरकारी अधिकारी हे सुद्धां नागरिकच असतात. तेव्हां त्यांना नागरिकत्वाचे हक्क कां असूं नयेत? परंतु सरकारी नोकरींत असतांनाच, एखाद्या दहशतवादी संस्थेचेहि सभासद झाल्याकारणानें ज्यांच्यापासून देशाला अत्यंत धोका निर्माण झाला आहे, अशा लोकाविरुद्ध कोणतेच उपाय योजले गेले नाहींत. ज्याचें मीठ खायचें, त्याच्याशींच द्रोह करणाऱ्या लोकांना नोकरीवरून दूर केलें पाहिजे. माझ्या हातीं जर सत्ता असती तर, अशा लोकांना केवळ नोकरीवरून कमी करूनच मी थांबलों नसतों; त्यांना खडी फोडायला तुरुंगातहि पाठविलें असतें.

जातीयवादाचा शेवट करणें हें फक्त सरकारचेंच काम नाहीं. जनतेचींहि याबाबतींत कांहीं कर्तव्ये आहेत. खरें म्हटलें तर, जातीयवाद आपणच नष्ट करूं शकाल. आपल्यापैकीं प्रत्येकानें या जातीयवादाचें डोकें ठेचण्याचें व्रत घेतलें पाहिजे. दिशाभूल झाल्यामुळें जे लोक जातीयवादांत चुकून सामील झाले असतील, त्यांना समजावून सांगून आपण परत आपल्यात आणले पाहिजे. परंतु जे राष्ट्रवादालाच विरोध करीत असतील, त्यांना मात्र आपल्या समाजांत स्थान मिळतां कामा नये. प्रत्येक बाबतींत आपण त्याच्यावर बहिष्कार घातला पाहिजे. विशेषतः तरुण वर्गाला माझें असें सांगणें आहे कीं, त्यांनीं आपल्यावरील जबाबदारी ओळखून जातीयवादाचा निकरानें प्रतिकार केला पाहिजे. अशाप्रकारचें दुष्कर्म

आपल्या देशांत कधींहि झालेलें नव्हते. अनेक देश उदयाला आले आणि अस्तंगतहि झाले. परंतु आपल्यांतील उच्च नैतिक भावनांमुळें आपला देश मात्र अद्याप तगून राहिला आहे. आपण नेहमींच मोठमोठ्या धर्मगुरूंची आणि महात्म्यांची पूजा करीत आलों आहोंत. परंतु आज मात्र आपलें इतकें पतन झालें कीं, आपण अलम दुनियेंतील सर्वश्रेष्ठ महात्म्याची हत्या केली. आपण पशू बनलों आहोंत. परंतु या पशुतेपासून आपल्याला मानवतेकडे जावयाचें आहे. अत्याचाराची फेड पुन्हां अत्याचार करून कधींहि होत नसते ही शिकवण गांधीजींनींच आपल्याला दिली आहे. पाकिस्तानांत लुटालूट होत आहे, म्हणून आपण इकडेहि लुटालूट सुरू करावी काय ? तिकडे अर्भकांच्या हत्या केल्या जातात आणि स्त्रियांची अब्रू घेतली जाते, म्हणून इकडे आपणहि तसेंच वर्तन करावें काय ? हा कांहीं खरा धर्म अथवा न्याय नाहीं. त्यामुळें आपल्या देशाचें काडिमात्रहि कल्याण होणार नाहीं. नौखालीचा बदला आपण बिहारमध्यें घेतला. पण त्यामुळें काय साधलें ? पाकिस्तान तर प्रत्यक्षांत अवतरलेंच आहे, पण लुटालूट आणि हत्याकांड मात्र वाढत गेलें, आणि शेवटीं आम्हांला महात्माजींना देखील कायमचें गमावून बसावें लागलें. महात्माजींनीं पाकिस्तानची कल्पना कधींच मान्य केली नव्हती. पटेल आणि नेहरू यांनींच पाकिस्तानला मान्यता दिली होती. आतां मात्र मुसलमानांचे सुद्धां डोळे उघडूं लागले आहेत. ज्या लोकांनीं पाकिस्तानच्या नांवावर त्याच्याकडून मतें मिळविलीं तेच त्यांना संकटाच्या खाईत सोडून निघून गेले. इतःपरहि जर कोणी मुसलमान देशद्रोह करील तर,

खुशाल त्यांना गोळी घाला. परंतु लक्षांत ठेवा कीं, खुद्द हिंदूंमध्येंहि देशद्रोही कांहीं थोडे नाहींत. ज्या लोकांनीं गांधीजींना आणि नेहरूंना गिरफदार केले, ते काय देशद्रोही नाहींत ? ज्या व्यापाऱ्यांनी काळाबाजार चालविला आहे ते तरी देशद्रोहच करीत आहेत ना ? जे लोक स्वतंत्र हिंदुस्तानांतहि नोकरीवर राहून लाचलुचपत करतात ते देशद्रोही नाहींत तर कोण ? ज्या लोकांनी त्रिवेणीसंग, भूमिदार संघ वगैरे नांवावर जातीयवादाच्या प्रस्थापनेकरिता मतें मागितलीं, त्याच्याहून महान देशद्रोही कोण असूं शकेल ? हे सर्व देशद्रोही प्रथम नष्ट करा, आणि नंतरच मुसलमान फितुरांकडे लक्ष पुरवा. आमच्या देशांत आजपर्यंत नाना धर्मांचे लोक एकत्र नांदत आले आहेत. हेंच तर परम पवित्र भारतमातेचें वैशिष्ट्य आहे. महात्माजींची ही शिकवण आत्मसात करून घेतल्यानंतरच आपल्याला देशाच्या नवनिर्मितीच्या कार्याला हात घालता येईल. आपल्याला नवें जीवन आणि नवी संस्कृति निर्माण करावयाची आहे. नव्या हिंदुस्तानची उभारणी अशा रितीनें करावयाची आहे कीं, ज्यात कोणाचेंहि शोषण होणार नाहीं, आणि कोणाचेहि श्रम व्यर्थ जाणार नाहींत. आपल्या देशांतील अन्नान्नदशा, कापडाची दुर्भिक्षता नष्ट झालीच पाहिजे. अशा प्रकारें भारताची नवरचना केली तरच जगांत त्याचा मान वाढविला जाईल. आमच्या कल्याणाचा रस्ता हाच आहे. महात्माजींनीं आपल्या सर्व जीवनातून हीच शिकवण आपल्याला दिली. आणि त्यांच्या मृत्यूनेंहि तोच धडा आपण शिकावयास पाहिजे.

## ध्येयाविष्कार

[ मद्रास येथें ता. ८ जुलै १९५० रोजी भरलेल्या समाजवादी पक्षाच्या आठव्या अधिवेशनापुढें पक्षाचे सर चिटणीस म्हणून राजकीय अहवाल सादर करतांना श्री. जयप्रकाश नारायण यांनीं केलेलें भाषण व त्यावर झालेल्या चर्चेला त्यांनीं दिलेलें उत्तर ]

मी आणि माझे सहकारी चिटणीस साथी लिमये यानीं सादर केलेल्या अहवालाची प्रत तुम्हाला मिळाली आहेच. त्या छापील अहवालात आणखी कांहीं भर घालण्याची माझी इच्छा नाहीं. फक्त त्या अहवालाचें स्वरूप आणि त्यामागील उद्देश याकडेच मी तुमचें लक्ष वेधूं इच्छितों. गेल्या तीन वर्षांपासून, म्हणजे कानपूर अधिवेशनात आपण पक्षाची पुनर्घटना केल्यापासून ज्या शंका घेण्यात येत आहेत व जे मुद्दे उपस्थित केले जात आहेत, त्यांचा परामर्ष घेण्याचा प्रयत्न मी या अहवालात केला आहे. त्याचप्रमाणें पक्षाच्या मूलभूत ध्येय धोरणाचेंहि पुन्हा एकदा स्पष्टीकरण करण्याचा मी यत्न केला आहे. माझा असा विश्वास आहे कीं, आपला पक्ष आता पुरेसा प्रगल्भ झाला असून त्याच्या मूलभूत तत्त्वप्रणालीबद्दल आता कोणाच्या मनांत कसली शंका अगर विकल्प निर्माण होण्याचें कारण नाहीं. आपण आपल्या ध्येयाची घोषणा नि.

करू शकलों नाहीं तर, आपली ताकद खर्ची होईल आणि जें ध्येय आपल्याला गांठावयाचें आहे, त्या रोखानें आपलीं पावलें पडूं शकणार नाहींत, निदान आपली गति तरी खासच मंदावेल. आपल्याला प्रत्यहि आपलीं ध्येयें बदलून किंवा त्याबद्दल शंका कुशंका काढीत बसून चालणार नाहीं.

आपण ज्यावेळीं कानपूरला पक्षाच्या ध्येयधोरणाची चर्चा केली आणि नागपूरच्या बैठकींत त्यास अखेर मंजुरी दिली त्यावेळीं असें वाटूं लागलें होतें कीं, निदान आता तरी पक्षाचें ध्येयधोरण निश्चित झालें आहे. तुम्ही कृपाकरून राग मानूं नका, परंतु वस्तुस्थिति अशी आहे कीं, पक्षाच्या मूलभूत ध्येयधोरणाबद्दल अद्यापहि आपल्या अनेक सहकाऱ्यांच्या मनांत शंका आहेत. माझ्या दौऱ्याच्या प्रसंगीं मला हें आढळून आलें आहे. लोकशाहि समाजवादाचा अर्थ समजून घेण्याचाच मुळीं ते प्रयत्न करीत नाहींत असें मला दिसून आलें. पक्षाच्या अनेक सभासदांनीं पक्षाचें ध्येयधोरणहि वाचलेलें नाहीं असा दुःखद अनुभवहि मला आलेला आहे. मद्रासला येताना वाटेंत मी महाराष्ट्रांतील सुमारें दीडशें कार्यकर्त्यांपुढें भाषण केलें. पक्षाची महाराष्ट्र शाखा ही आपल्या कार्यकुशलतेबद्दल आणि पद्धतशीरपणाबद्दल प्रसिद्ध आहे. कांहीं अतिशय उत्कृष्ट कार्यकर्ते महाराष्ट्रानें पक्षाला पुरविले आहेत, आणि आजहि अनेक तळमळीचे तरुण कार्यकर्ते तेथें सतत अभ्यास करीत असलेले आणि निरनिराळे विषय समजावून घेत असलेले दिसतात. परंतु अशा या महाराष्ट्र शाखेचा तरी अनुभव मला काय आला ! जमलेल्या कार्यकर्त्यांपैकीं निम्मा

हूनहि कमी जणांनीं पक्षाच्या ध्येय धोरणाची पुस्तिका वाचलेली होती. आपल्यासारख्या जनतापक्षाचे सर्वच्या सर्व सभासद हें वाचन करतील अशी माझी अपेक्षा नाहीं. निरक्षर सभासदांना तर तें येणारच नाहीं. परंतु निरनिराळ्या कार्यक्षेत्रांत प्रत्यक्ष काम करणाऱ्या कार्यकर्त्यांनीं आणि पदाधिकाऱ्यानीं तरी निदान त्याचा नीट अभ्यास केला पाहिजे अशी अपेक्षा मी खासच करतों. या पुस्तिकेचीं बहुतेक सर्व प्रादेशिक भाषांतून भाषांतरें झालेलीं असल्याकारणानें इंग्रजी येत नाहीं अशी सबबहि कोणाला सांगता येणार नाहीं.

दुसरें असें कीं, पक्षाने ठरविलेलें मूलभूत धोरण बाजूला सारून स्वतःच्याच मर्जीनुसार वागण्याची प्रवृत्ति काहीं पक्ष सभासदांत दिसून येत आहे. आपण अशा तऱ्हेनें वागूं लागलों तर, एकसंध अशा समाजवादी पक्षाची उभारणी करणें अशक्य होऊन बसेल. लोकशाही समाजवादावर माझा विश्वास नाहीं असें कोणत्याहि पक्ष सभासदाला म्हणता येणार नाहीं. आज पक्षाचा पाया घालायचा आणि उद्या लगेच तो उखडून टाकायचा असें जर आपण करीत राहिलों तर, समाजवादी चळवळीची आखणी करणें अशक्य होऊन बसेल. म्हणून पक्षाच्या मूलभूत धोरणाबद्दलच्या असल्या शंका कुशंका आणि वादंग याना आळा घालणें किती जरुरीचें आहे तें पटवून देण्याचा प्रयत्न मी केला आहे.

अहवालाच्या दुसऱ्या भागांत मी आपल्या कार्यपद्धतीचा उहापोह केला आहे. त्याबाबत सुद्धां ध्येय धोरणासंबंधींच्या पुस्तिकें-

आलें असतें तर, मला आनंदच झाला असता. त्याबाबत माझा मुळींच मतभेद नाहीं. तथापि मी तुम्हांस असें सांगू इच्छितों कीं आधी तयारी केल्याशिवाय लढा सुरू करणें अशक्य आहे. परंतु ज्या ठिकाणीं आपली पुरेशी संघटना आहे असें दिसून आलें, त्या ठिकाणीं लढा टाळण्याचा प्रयत्न केला गेला नाहीं. अर्थात माझ्या अहवालांत मी जे मूलभूत प्रश्न उपस्थित केले आहेत, त्याला उद्देशून मी हें बोलत नाहीं. आणि म्हणून त्या अहवालास परिषदेनें मंजुरी द्यावी असें माझें मत आहे. पक्षाचे मूलभूत ध्येय आणि धोरण यांचा या अहवालांत फक्त पुनरुच्चार करण्यांत आला आहे. लोकशाही कार्यपद्धति आणि केवळ सनदशीर प्रवृत्ति यांत आपण नेहमीच फरक करीत आलों आहोंत. तेंच या अहवालात मी पुन्हां एकदा मांडलें आहे. त्याचप्रमाणें पक्षात कांहीं रोग वळावूं पहात आहेत, त्याकडेहि मी तुमचें लक्ष वेधलें आहे. उदाहरणार्थ पक्षांत माजलेली गटबाजी. डॉ. राममनोहर लोहिया यांनीं नुकताच जनतेमध्यें जो लेख लिहिला आहे, त्यांत त्यांनीं यावर चांगला प्रकाश टाकला आहे. आपल्या लेखांत त्यांनीं या प्रश्नाचा अधिक बारकाईनें उहापोह केला आहे. माझें तुमच्यापाशीं इतकेंच मागणें आहे कीं, तुम्ही आपल्या ध्येयधोरणावर विश्वास व्यक्त करावा आणि त्याबाबतचे मतभेद मिटवून टाकावेत. ज्याचा लोकशाही समाजवादावर विश्वास नसेल, त्यांना आपल्या पक्षांत स्थान मिळणार नाहीं. माझ्या विधानाला तुम्ही अगदी स्पष्ट शब्दांत संपूर्ण पाठिंबा द्या असें माझें सांगणें आहे. लोकशाही समाजवादाचें संपूर्ण चित्र कसें असेल हा निराळा मुद्दा आहे. मी हें कबूल

करतों कीं, त्याची संपूर्ण कल्पना आम्ही अद्यापपर्यंत तुमच्यापुढें ठेवूं शकलों नाहीं. परंतु त्यावर अनेक लेख आणि पुस्तिका लिहिल्या गेल्या असून लोकशाही समाजवादाची कल्पना त्यांत विशद करण्यात आली आहे. त्याचप्रमाणें आपल्या स्वतःच्या अशा कांहीं कल्पनाहि आपण प्रसृत केल्या आहेत. लोकशाही समाजवादाचें एकजिनसी असें तत्वज्ञान अद्यापपर्यंत निर्माण व्हावयाचें आहे हें खरें असलें तरी मला अशी आशा आहे कीं, येत्या वर्षात या दिशेनें प्रत्यक्ष अशी कांहींतरी कामगिरी बजविली जाईल.

सहचिटणिसांनीं आपल्या अहवालांत ज्या संघटनात्मक समस्यांचा निर्देश केला आहे, त्यावरच मुख्यत्वेंकरून चर्चा व्हावी अशी माझी इच्छा आहे. तात्विक चर्चेवर सारा भर देऊन संघटनात्मक प्रश्नांकडे दुर्लक्ष करण्याची आपल्याला सवय आहे. त्यामुळें आपल्या संघटनेंत फार मोठे दोष निर्माण झाले आहेत. हे दोष वाळवून टाकण्याच्या दृष्टीनें साथी मधु लिमये यांनीं आपल्या अहवालांत कांहीं सूचना केल्या आहेत. त्या सूचनांत जरूर तो फेरफार करून परिषदेने त्या स्वीकाराव्यात असें मला सांगावयाचें आहे. पक्षांत फाटाफूट होत असल्याबद्दल ज्या अफवा पसरल्या आहेत, त्याचाहि उल्लेख मी माझ्या अहवालांत केला असल्याचें. तुमच्या स्मरणांत असेलच. साथी अच्युत पटवर्धन यांनीं मला पाठवलेल्या एका पत्राचा निर्देश मी त्यांत केला आहे. त्यांनीं त्याबाबत एक पत्रक माझ्याकडे पाठविलें असून मी या परिषदेला तें वाचून दाखवावें अशी त्यांची इच्छा आहे.

त्या पत्रकावरून तुमच्या लक्षांत येईल कीं, साथी अच्युत पटव-
र्धन यांनीं निदान कांहीं काळपर्यंत तरी प्रत्यक्ष राजकारणांतून, किंवा
पक्ष कार्यांतून, अंग काढून घेण्याचा जो निर्णय घेतला आहे तो
पक्षाच्या मूलभूत ध्येयाशीं अगर धोरणाशीं त्याचे कांहीं मतभेद
झाले आहेत म्हणून मुळीच नव्हे. त्यांनीं आपल्या पत्रकांत कांहीं
अतिशय मूलगामी स्वरूपाचे मुद्दे उपस्थित केले आहेत. याबाबत
अगदी नम्रपणें मी इतकेंच म्हणेन कीं, अच्युतरावांचें खरें स्थान
अद्यापहि समाजवादी पक्षातच आहे. त्यांनीं ज्या उणीवा दाखविल्या
आहेत, त्यांची आम्हालाहि कल्पना आहे. राजकीय पक्षाला एखाद्या
आध्यात्मिक संघटनेंत स्वतःचें रूपांतर करून घेणें शक्य नसतें.
परंतु मी वर म्हटल्याप्रमाणें ज्या मानवी मूल्यांची जोपासना अच्युत-
राव अन्य मार्गांनीं करूं पाहतात तींच मूल्यें लोकशाही समाज-
वादाचा अंगिकार करून सुरक्षित राखण्याचा प्रयत्न समाजवादी
पक्ष करीत आहे. सत्ता हस्तगत करून, पक्षाची हुकूमशाही प्रस्था-
पित करणें एवढेंच जर पक्षाचें ध्येय असतें तर, त्यासाठीं लोकशाही
समाजवादाची घोषणा करण्याची आपल्याला कांहींच गरज नव्हती.
सामाजिक जीवनांत कांहीं विशिष्ट मूल्यांची जोपासना व्हावी, नुसतें
समाजवादी सरकार स्थापन न होता समाजवादी समाज
निर्माण व्हावा असें पक्षाला मनापासून वाटतें. आणि म्हणूनच तर
आपण लोकशाही समाजवादाचा झेंडा उभा केला आहे. अनेक सर्व
मानवांवर कांहीं मर्यादा या असतातच, ही गोष्ट अच्युतराव देखील
नजरेआड करणार नाहींत अशी मी आशा करतो. परंतु आपल्याला

निदान एवढें तरी समाधान आहे कीं, त्यांना ज्याचा ध्यास लागला आहे, तशाच तऱ्हेचा समाज निर्माण करण्याची आपणहि धडपड करीत आहोंत. आणि म्हणून मला अशी आशा वाटते कीं, अच्युतराव लवकरच आपल्यात परत येतील कारण तेंच त्यांचें खरें स्थान आहे.

कम्युनिस्ट पक्षाच्या धोरणात बदल होणार असल्याच्या बातम्या बहुधा तुम्ही वृत्तपत्रातून वाचत असाल. माझी अशी खात्री आहे कीं, पुन्हा एकदा संयुक्त आघाडीचा बुरखा पांघरून आपली जुनीच भेद नीति चालू ठेवण्याचा ते प्रयत्न करून पहात आहेत. त्याच्या संयुक्त आघाडीचें स्वरूप नेमकें काय असेल, कामगार शेतकरी पक्ष अशी संज्ञा ते त्यास देतील कीं, तथाकथित डाव्या गटांची एकजूट म्हणून संबोधतील तें सांगता येणार नाहीं. परंतु आजपर्यंत ते ज्या मार्गाचा अवलंब करीत होते त्यायोगें ते जनतेपासून पूर्णपणें अलग पडले आहेत याची त्यांना जाणीव झाली आहे हें उघड आहे. ते आतां गरीब आणि मध्यम वर्गाचीच केवळ नव्हे तर, ज्याना ते "लोकशाही" वादी समजतात अशा हिंदी भांडवलदार वर्गाचीहि मनधरणी करूं लागतील. सोव्हियट युनियनचे आदेश आंधळेपणानें मानायची ज्यांची तयारी असेल तेच तेवढे "लोकशाही" वादी अशी कम्युनिस्टांची व्याख्या असते. कम्युनिस्ट पार्टी "लोकशाही आघाडी" उभी करणार आहे ती लोकशाही समाज निर्माण व्हावा अथवा लोकशाही मूल्यांची जोपासना व्हावी म्हणून नव्हे तर, रशियाला पाठिंबा मिळवून देता यावा म्हणून. हिंदुस्तानांतील प्रचलित परिस्थितींत तसें धोरण आंखणें आवश्यक आहे म्हणून ते असें करीत

नाहींत तर, कॉमिन्फॉर्मचा तसा हुकूम सुटल्यामुळेंच केवळ ते अशीं पावलें टाकीत आहेत. आजची आंतरराष्ट्रीय परिस्थिति अतिशय तंग झाली असतांना, हिंदुस्तानांतील त्याचप्रमाणें जगांतील निरनिराळ्या देशांतील जनता कोणाची बाजू घेते या एकाच गोष्टीवर आज त्यांचें सर्व लक्ष केंद्रित झालें आहे. त्यामुळें हिंदुस्तानला रशियाच्या गटांत खेचण्याचा ते पराकाष्ठेचा प्रयत्न करतील. साथीहो, अशा वेळीं तुमचें स्वतःचें ध्येय निश्चित झालेलें नसेल, आणि तुम्ही त्याला चिकटून राहणार नसाल तर, कम्युनिस्टांच्या या नव्या कारवाईला तुम्ही सहज बळी पडाल. अशा परिस्थितींत आपल्या पक्षाचे अनुयायी अधिक स्पष्टपणें विचार करूं लागतील आणि काहींहि घडले, कम्युनिस्टांनी कितीहि घोषणा केल्या तरी लोकशाही समाजवादाच्या झेंड्याखालीं ठाम निर्धारानें आगेकूच करतील असा माझा विश्वास आहे.

## समारोपाचें भाषण

मी सादर केलेल्या अहवालांतील सिद्धांतिक भागावरच बहुतेक सर्व चर्चा केंद्रित झाली होती. त्यामुळें माझी कांहींशी निराशाच झाली. आपल्या मूलभूत ध्येयांबाबत चर्वितचरण करण्यापेक्षां तीं प्रत्यक्षांत आणण्याच्या अवस्थेप्रत आपणापैकीं बहुतेक सर्वजण पोहोंचले आहेत असें मी समजत होतों. परंतु संघटनात्मक प्रश्नाकडे आणि साथी मधु लिमये यांनीं सादर केलेल्या कार्यक्रमाकडे फारच थोड्या प्रतिनिधींनी लक्ष दिल्याचें आढळून आलें. तथापि मी अशी आशा करतों कीं, पुढील काळांत संघटनात्मक प्रश्नांवर आपण

आधिक लक्ष केंद्रित करूं. कारण तेंच आपल्यापुढील सर्वांत महत्त्वाचें कार्य आहे.

चर्चेला द्यावयाच्या उत्तराचे मी दोन भाग पाडणार आहे. प्रथम तात्विक स्वरूपाच्या चर्चेबद्दल मी स्थूलपणानें माझें म्हणणें मांडीन. बहुतेक सर्व भाषणें चर्चेला सहाय्यभूत होणारीं अशीच झालीं. परंतु साथी बाबु कृष्णमूर्ति याच्या भाषणाबद्दल मात्र माझी फार जोराची तक्रार आहे. राष्ट्रीय कार्यकारिणीच्या लोकशाही समाजवादाबद्दल व माझ्याबद्दलहि त्यानीं आपल्या भाषणात उल्लेख केला. मी अतिशय नम्रपणें सांगूं इच्छितों कीं, राष्ट्रीय कार्यकारिणीचा लोकशाही समाजवाद अशी कांहीं चीज अस्तित्वांत नाहीं. मी ज्या लोकशाही समाजवादाचा नामनिर्देश केला तो आपला पक्ष पायाभूत मानीत असलेला लोकशाही समाजवादच होय. "खरा" लोकशाही समाजवाद आणि "शास्त्रीय" समाजवाद यासंबंधींहि ते आपल्या भाषणांत कांहीं बोलले. परंतु या शब्दप्रयोगानें त्यांना नेमकें काय सुचवायचें आहे तें मला समजलें नाहीं. पक्षाच्या ध्येय-धोरणांत लोकशाही समाजवादाची व्याख्या पुरेशी स्पष्ट करण्यांत आली आहे. मी माझ्या अहवालात फक्त त्याचा पुनरुच्चार केला आहे. साथी कृष्णमूर्ति आपल्या भाषणांत म्हणाले कीं, पक्षाच्या मूलभूत सिद्धांतांसंबंधीं चर्चा करण्यांत गैर कांहींच नाहीं. परंतु त्यांच्या या विधानाशीं तुमच्यापैकीं कोणी सहमत होईल असें मला वाटत नाहीं. पक्षाच्या मूलभूत सिद्धांतांवर वारंवार चर्चा करणें हें सर्वस्वी अनिष्ट आहे. मी काल म्हटल्याप्रमाणें, आणि माझ्या अहवालांतहि

मी तसें म्हटलें आहे, आज पाया घालायचा, आणि उद्या लगेच तो उखडून टाकायचा असें करीत बसून चालणार नाहीं. एक तर काहीं ठाम उद्दिष्टांचा आपण स्वीकार तरी केला पाहिजे, नाहींतर तीं साध्य तरी ठरविलीं पाहिजेत. समाजवादी पक्ष म्हणजे कांहीं संयुक्त आघाडी नव्हे, किंवा निरनिराळ्या विचारप्रणालींचें तें कडबोळेंहि नव्हे. समाजवादी पक्षाची निश्चित अशी एक ध्येयप्रणाली असून त्यापासून आपल्याला सदैव स्फूर्ति आणि मार्गदर्शन मिळत राहील. साथी कृष्णमूर्ति यांनी जी भूमिका स्वीकारली आहे, तिला पक्षात कसलाहि थारा असता कामा नये. पक्षाच्या मूलभूत धोरणावर ज्याचा विश्वास असेल, त्याचें मात्र पक्षात स्वागत केलें जाईल.

अर्थात कांहीं बाबतींत मतभिन्नता असूं शकेल. पुढाऱ्याचे देखील आपसांत अगदी सर्व मुद्यावर एकमतच असेल असें नाहीं. पक्ष वर्धिष्णु असल्याचेंच तें द्योतक आहे, आणि चर्चा जर योग्य पातळीवरून केली गेली तर नवीन सभासदांच्या शिक्षणास अशा मतभेदांपासून देखील मदतच होईल. परंतु आपल्यापैकीं कांहीं साथींची मात्र अशी समजूत असते कीं, त्यांचे आपापसात मतभेद असले, नव्हे त्यांचा तो हक्क असला, तरी पुढाऱ्यांत मात्र त्याचा लवलेशहि असतां कामा नये. लेनिनच्या काळांत बोल्शेव्हिक पक्षाचे सभासद त्या पक्षाच्या धोरणाविषयींची चर्चा अगदी खुलेपणानें आपल्या पक्षाच्या वृत्तपत्रांतून करीत असत याचें मी या मित्रांना स्मरण करून देऊं का! लेनिन जशी इतरांवर टीका करी, त्याचप्रमाणें इतर सभासद त्याच्यावरहि टीकेचा भडीमार करीत, आणि

प्रसंगी ती त्याच्यापेक्षाहि कडक असे ही हकीगत सर्वांच्याच परिचयाची आहे. आपल्या पक्षांत देखील चर्चेला भरपूर वाव असतो मात्र त्याचा अर्थ असा होत नाहीं कीं, आपल्या मूलभूत तत्वप्रणालीवर आपण दरवेळीं चर्चा करीत बसावें. कारण अशी चर्चाच जर आपण अखंड करीत राहिलों, तर ज्या मूलभूत तत्वांवर आपला पक्ष अधिष्ठित आहे, त्याचा पायाच डळमळीत होऊन बसेल. त्या मूलभूत तत्वासाठीं आपण प्राणपणानें अखेरपर्यंत लढत राहूं. त्यासाठीं आपल्याला मृत्यू आला तरी पत्करेल परंतु काय वाटेल तें झालें तरी ज्यांत राजकीय आणि आर्थिक स्वातंत्र्याचा लवलेशहि नाहीं, अशा नामधारी समाजवादासाठीं आम्ही आमच्या ध्येयाचा विक्रा माडणार नाहीं.

साथी गेंदासिंग यांचें भाषण ऐकून मी कांहीसा आश्चर्यचकितच झालों. हिंदी राज्यघटना बरीचशी लोकशाही प्रधान आहे असें मी म्हटलें; त्यामुळें माझा स्वतःचा असा एक निराळाच लोकशाही समाजवाद आहे अशी त्यांची समजूत झालेली दिसते. त्याचप्रमाणें जगाच्या निरनिराळ्या भागांतून आपल्या परिषदेला जे शुभसंदेश आले आहेत, त्यामुळेंहि आपल्या वैचारिक गोंधळांत भरच पडते असें त्याचें मत झालें असावेसें वाटतें. परंतु हें त्यांचें विधान अतिशय उथळपणाचें आहे असें मोठ्या दुःखानें मला सांगितलें पाहिजे. साथी गेंदासिंग यांनीं पक्षाच्या ध्येय धोरणाचें स्पष्टीकरण करणारी पुस्तिका जर नीट समजाऊन घेतली असती तर, लोकशाही समाजवादासंबंधीं त्यांच्या मनाचा असा गोंधळ त्यासच उडाला नसता. लोकशाही समाजवाद आणि हुकुमशाही कम्युनिझम या-

मधील विरोध त्यांत स्पष्ट करण्यांत आला आहे. त्याचप्रमाणें लोकशाही समाजवादाची मूलतत्वेंहि त्यांत विषद करण्यांत आलीं आहेत. परंतु लोकशाही समाजवाद ही जयप्रकाश नारायण यांची खाजगी मालमत्ता आहे असा त्यांचा गैरसमज झालेला दिसतो. गेलीं तीन वर्षे या विषयावर जी चर्चा चालली आहे, त्याचा परामर्ष घेण्याचाच थाय तो प्रयत्न मी केला. मला अशी आशा आहे कीं, पुढील वर्षांत लोकशाही समाजवादाच्या आपल्या कल्पना आपण अधिक स्पष्टपणें मांडूं शकूं; आणि त्या कार्यांतील माझा वाटा मी अवश्य उचलीन. पाटणा येथें भरलेल्या नागरिक हक्क संरक्षण परिषदेच्या उद्घाटन प्रसंगीं केलेल्या भाषणांत मी नेहरू सरकारला फॅसिस्ट म्हणून संबोधल्याचें स्मरण त्यांनीं मला करून दिलें आहे. आणि त्यावरून त्यांनीं असा निष्कर्ष काढला कीं, हिंदी राज्यघटना बऱ्याच अंशीं लोकशाही स्वरूपाची आहे असें म्हणणें ही विसंगति आहे. घटना आणि सरकार एक नाहीं हें साथी गेंदासिंग समजून घेतील तर बरें. पंडित नेहरू आणि सरदार पटेल यांच्या हातीं आज सरकारची

वापरूं शकतात आणि विरोधी पक्षांनाहि निवडणुकी लढविण्याची मुभा आहे. परंतु तरी ती संपूर्णपणें लोकशाही स्वरूपाची आहे असें मी म्हटलेलें नाहीं.

पक्षांमधील एकंदर चर्चेचा साकल्यानें विचार केल्यानंतर लोकशाही समाजवादाच्या कांहीं अंगोपांगांची छाननी करून त्यांची फेर मांडणी करणें अगत्याचें ठरतें. तथापि त्यांचें मूलभूत अधिष्ठान पक्षाचें ध्येयधोरण विषद करणाऱ्या पुस्तिकेंत पुरेसें स्पष्ट करण्यांत आलें आहे.

पक्षांत मी ढिलाई खूप चालूं देतों' अशी माझ्या विरुद्ध तक्रार आहे. कदाचित तो माझ्यांतील कमकुवतपणा असेल आणि तो दोष मी कबूल करतों. माझ्या मागून येणारे चिटणीस याहून अधिक कडक शिस्त लागू करतील अशी मला आशा आहे. आज पक्षांत शिस्तीच्या नांवाखालीं सभासदांची उचल बांगडी होत आहे असा जो एक प्रवाद पसरला आहे त्याला अनुलक्षून मी हें बोलत आहे. वस्तुतः पक्षांतील सर्वांत मोठा दोष जर कोणता असेल तर तो म्हणजे मोंगलपणा, शिस्ताचा अभाव. सहाजिकच सभासदांची उचलबांगडी होण्याची धास्ती त्यामुळें निर्माणच होत नाहीं.

प्रत्येक पक्ष सभासदाला 'जनता' तून किंवा पक्षातर्फे प्रसिद्ध होणाऱ्या पत्रांतून पक्षाच्या धोरणावर टीका करण्याचें संपूर्ण स्वातंत्र्य आहे.

साथी तुलसी बोडा यांनीं अशी तक्रार केली कीं, परिषदेपुढें येणारे ठराव फक्त दहाच दिवस आधीं प्रसिद्ध होत असल्याकारणानें

त्यावर विचार करण्यास पुरेसा वेळ मिळत नाहीं. मी याबाबत त्यांना असें सांगूं इच्छितों कीं, पक्षाच्या मध्यवर्ति कचेरी मार्फत सर्व प्रांतिक शाखांना आणि त्यांच्या मार्फत पक्ष सभासदांना आपापले ठराव आणि सूचना स्वतंत्रपणें अथवा प्रांतिक शाखांच्या मार्फत पाठविण्या-बद्दल वारंवार कळविण्यांत आलें असूनहि दुर्दैवानें प्रांतिक शाखा किंवा सभासद यांपैकीं कोणीच त्याची दखल घेतलेली नाहीं.

माझ्या अहवालांत सिद्धांतिक बाजूवरील चर्चेचा समारोप करतांना मी मांडलेल्या कांहीं मुद्यांबद्दल शंका उपस्थित करण्यांत आली आहे. निदान दोन वक्त्यांनीं तरी आपल्या भाषणांत नैतिक मूल्यांच्या प्रश्नाचा उल्लेख केला. परंतु त्या दोघांनाहि माझ्या म्हण–ण्याचा आशयच समजलेला नाहीं असें म्हणणें भाग आहे. मला अभिप्रेत असलेलीं मूल्यें म्हणजे परंपरागत नैतिक मूल्यें नव्हेत. परंतु साथी अभ्यंकर यांनीं तसा ग्रह करून घेतलेला दिसतो. मी अहवालांत नीति शास्त्रावर भाष्य केलेलें नाहीं तर, समाजवादी समाज व्यवस्थेलाहि बंधनकारक असलेल्या मूल्यांचाच तेवढा नामनिर्देश केला आहे. आणि अशीं मूल्यें हीच समाजवादी चळवळी मागील खरी प्रेरणा नव्हे काय? हीं अंतिम मूल्यें साध्य करून घेण्याचें समाजवादी सिद्धांत हें साधन होय असें माझें मत आहे. उदाहरण घेऊन बोलावयाचें तर उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयकरण केलें पाहिजे असा समाजवादाचा सिद्धांत आहे. परंतु केवळ राष्ट्रीयकरणामुळें समाज-वाद येऊ शकणार नाहीं हें तुम्हींहि मान्य कराल. राष्ट्रीयकरणामागें एक विशिष्ट हेतू आहे. औद्योगिक क्षेत्रांत

ण्याचें तें एक साधन आहे. म्हणून उद्योगधंद्यातील खाजगी मालकी काढून घेऊन ती मूठभर नोकरशहांच्या हातीं सोंपविल्यानें काम भागणार नाहीं. उद्योगधंद्याचें संचलन सरकारनें नेमलेल्या कांहीं लोकांच्या हातींच गेलें तर त्या राष्ट्रीयकरणाला कांहीं अर्थच उरणार नाहीं. त्याला काहीं समाजवाद म्हणता येणार नाहीं. समाजवादात उद्योगधंदे चालविण्याच्या कामीं कामगार वर्गाचा प्रत्यक्ष हात असला पाहिजे. सरकारी नियंत्रणाखालीं सर्व उद्योगधंदे आल्यानंतरहि काम-गारांचें आर्थिक दास्य जाईलच असें नाहीं. आणि म्हणूनच मी या मूल्यावर भर दिला आहे. त्यावरून तुम्हांला हें दिसून येईल कीं, मी नैतिक मूल्यांत बदल घडवून आणण्याची अथवा काहीं मित्रांनीं सूचित केल्याप्रमाणें ख्रिश्चन अथवा उदारमतवादी मूल्यांची भाषा काढलेली नाहीं तर, निरंतरचीं सामाजिक मूल्येंच तेवढीं मला अभि-प्रेत होतीं.

मार्क्सवाद आणि गांधीवाद याविषयींहि लंबीचवडी भाषणें झालीं. आग्रवधील एका प्रतिनिधीनें मार्क्सवर भाष्य करून स्टॅलिन-वांचा निषेध केला. भाडवलदार आणि हे स्टॅलिनवादी यांना त्यांनीं एकाच माळेचे मणि म्हणून संबोधिलें. परंतु सर्व स्टॅलिनवादी हे एका मार्क्सलाच तेवढे पैगंबर म्हणून मानतात हें काय त्याना माहीत नाहीं ! प्रत्येक स्टॅलिनवाद्याची अशी दृढ श्रद्धा असते कीं, ते मार्क्सचे प्रत्यक्ष वारसदार आहेत. मार्क्सच्या नावाचें बुंकू लावून जोशी रणदिव्यांविषयीं, आणि रणदिवे जोशांविषयीं काय म्हणतात, आणि असें करताना ते दोघेहि पुन्हां मार्क्सलाच प्रमाण-

भूत कसें मानतात हेंहि या साथींना माहीत आहे. जोशी हे टिटो आणि ट्रॉट्स्की यांच्या पावलावर पाऊल ठेवून जात आहेत असे रणदिवे म्हणतात तर, याच शेलक्या विशेपणांचा वर्षाव जोशी रणदिव्यांवर करीत असतात; आणि तेंहि पुन्हा मार्क्सच्या आणाभाका घेऊन!

समाजवादाचे आतां इतके प्रकार निघाले आहेत कीं, त्याला निश्चित असा अर्थच मुळीं उरलेला नाहीं. स्वतःला समाजवादी म्हणविणाऱ्या परंतु त्याच्यापेक्षां निराळ्या स्वरूपाच्या समाजवादाचा पुरस्कार करणाऱ्यांवर मोठ्या आवेशानें तुटून पडणाऱ्या अशा भिन्न-भिन्न विचारप्रणाली मार्क्सलाच आपलें आद्यदैवत मानीत असल्याचें दृष्टोत्पत्तीस येतें. मी देखील स्वतःला मार्क्सवादी म्हणवितों. परंतु तेवढ्यानें कांहींच अर्थबोध होत नाहीं. त्यामुळें ज्यावेळीं आपण मार्क्सवाद असें म्हणतों त्यावेळीं कोणता अर्थ आपल्याला नेमका अभिप्रेत आहे तें स्पष्ट करणें आवश्यक ठरतें. ज्याला आपण लोकशाही समाजवाद असें म्हणतों तोच मार्क्सला अभिप्रेत होता असा माझा विश्वास आहे. आणि तो समाजवादच काय तो श्रमजीवी जनतेला दास्यमुक्त करूं शकेल. इतर कोणत्याहि स्वरूपाच्या समाजवादासून तें कार्य तडीस जाऊं शकणार नाहीं. आपण मार्क्सनें दाखवून दिलेल्या मार्गानेंच जात आहोंत. परंतु ठोकळेबाजीपासून आपण अलिप्त राहिलें पाहिजे, कारण मार्क्सवादाला ठोकळेबाजीचें वावडें आहे. समाज परिस्थिति समजाऊन घेऊन ती ५.९ . शास्त्रशुद्ध प्रयत्न म्हणजे मार्क्सवाद. मार्क्सचें नांव घेऊन

समाजांतील प्रत्येक प्रश्न सोडवितां येईलच असें नाहीं. आपल्या देशांत प्रचलित असलेली परिस्थिति लक्षांत घेऊन मार्क्सनें दाखवून दिलेली पद्धत लागू करण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

लोकशाही समाजवाद आणि कामगार वर्गाची हुकूमशाही यांपैकीं कोणता तरी एक पर्याय आपण स्वीकारला पाहिजे असेंहि कांहीं वक्ते म्हणाले. परंतु त्या दोनहि पर्यायांचा अर्थ त्या वक्त्यांना समजलाच नाहीं असें मोठ्या खेदानें नमूद करावेसें वाटतें. कामगार वर्गाची हुकूमत म्हणजे समाजवादी समाज व्यवस्था नव्हे. भांडवलशाही नष्ट करून समाजवाद प्रस्थापित करतांना मध्यंतरीच्या संक्रमण काळांत कांहीं विशिष्ट परिस्थितींत कामगार वर्गाची हुकूशाही स्थापन करावी लागते इतकेंच काय तें मार्क्स आणि लेनिन यांनीं सांगितलें आहे. त्यामुळें लोकशाही समाजवाद आणि कामगार वर्गाची हुकूमशाही यांपैकीं एकाची निवड केली पाहिजे असें म्हणणें म्हणजे महाभयंकर चूक करण्यासारखें आहे. विशिष्ट परिस्थितींत कामगार वर्गाची हुकूमशाही प्रस्थापित करणें कदाचित आवश्यकहि ठरेल. परंतु त्याचबरोबर मी, तुम्हांला असेंहि स्पष्टपणें बजावून ठेवतों कीं, कामगार वर्गाची हुकूमशाही आणि पक्षाची हुकूमशाही यांत महदंतर आहे. कामगार वर्गाची हुकूमशाही आणि पक्षाची हुकूमशाही या कल्पना मुळांतच परस्पराशीं विरोधी आहेत. कामगार वर्ग म्हणजे कांहीं पक्ष नव्हे. पक्षापेक्षां कामगार वर्ग कितीतरी मोठा असतो. आणि सर्व कामगार वर्गाचें प्रतिनिनित्व आपणच काय तें करतो असा दावा करण्याचा अधिकार कोणत्याहि पक्षाला पोहोंचत

नाहीं. फ्रान्समधील राज्यक्रांति आणि त्यातून प्रस्थापित झालेलें पॅरिस कम्यून याला अनुलक्षून मार्क्सनें कामगार वर्गाच्या हुकूमशाहीचा उल्लेख केला. त्यावेळीं कोठल्याहि पक्षाची हुकूमशाही त्याला अभिप्रेत नव्हती हें कृपा करून नीट समजून घ्या. एका नवीन स्वरूपाच्या लोकशाहीचेंच चित्र त्याच्या डोळ्यापुढें होतें. बहुसंख्य जनता म्हणजे श्रमजीवी वर्ग मूठभर सरंजामदार, भांडवलदार आणि शोषण करणारे इतर अल्पसंख्य वर्ग यांवर आपली हुकूमशाही प्रस्थापित करील अशी कल्पना तो करीत होता. अत्यल्प संख्या असलेल्या गटावर प्रचंड बहुसंख्या असलेल्याची हुकूमशाही असाच त्याचा अर्थ होतो. परंतु ती हुकूमशाही देखील यथावकाश नष्ट झाली पाहिजे. सोव्हियट रशियाप्रमाणें जर तिचें पक्षाच्या हुकूमशाहींत रूपांतर घडून आलें तर तें मात्र मार्क्सवादाशी सर्वस्वी विसंगत ठरेल.

आपण हिंदुस्तानची भौतिक परिस्थिति आणि ऐतिहासिक पार्श्वभूमि लक्षांत घेऊन येथें समाजवादी चळवळीची उभारणी करण्याचा यत्न करीत आहोंत. महात्मा गांधी ही एक प्रचंड सामाजिक शक्ति होती. केवळ हिंदुस्तानच्याच नव्हे तर, साऱ्या जगाच्याच दृष्टीनें त्यांचें जीवन आणि शिकवण अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्यांनीं आपल्याला सत्याग्रहाचें जें हत्यार दाखवून दिलें त्याचा पंजाब, चंपारण, महाराष्ट्र, तिनवेल्ली आदि ठिकाणच्या हजारों देशबांधवांनीं केलेला उपयोग अतिशय परिणामकारक ठरला आहे. गांधीजी हा हिंदुस्तानांतील स्फूर्तीचा अखंड झरा असून समाजवादीहि त्यापासून सतत स्फूर्ति घेत राहतील. आज जर मार्क्स हयात असता

तर, त्यानें देखील गांधीजींच्या शिकवणुकीकडे आणि वागणुकीकडे पाठ फिरवून न बसता त्याची दखल घेतली असती अशी माझी खात्री आहे.

लोकशाही पद्धतीबद्दलहि याठिकाणीं थोडीफार चर्चा करण्यांत आली. कांहीं प्रतिनिधींनीं असें प्रतिपादिलें कीं, इतर सर्व मार्ग अयशस्वी झाले तर, आपल्याला सशस्त्र उठावाच्या मार्गाचाहि अवलंब करावा लागेल असें आपल्या ध्येय धोरणावरील पुस्तिकेंत नमूद करण्यांत आलें आहे. परंतु या साथींनीं आपल्या ध्येय धोरणाबद्दल भलताच गैरसमज करून घेतलेला दिसतो. ध्येय धोरणासंबंधींच्या पुस्तिकेंत असें म्हटले आहे कीं, विशिष्ट परिस्थितींत लोकशाही मार्गाचा अवलंब करण्यांत येईल. परन्तु ती परिस्थिति बदलली तर त्या बदललेल्या परिस्थितींत सशस्त्र उठावाचा अथवा हिंसक मार्गाचा अवलंब करावा लागेल. परिस्थितींत बदल घडून आला तर आपले मार्गहि अर्थात बदललेच पाहिजेत. तथापि पाटणा परिषदेंतील माझ्या भाषणाकडे मी तुमचें लक्ष वेधूं इच्छितों. या देशांत संपूर्ण लोकशाही प्रस्थापित होणार कीं हुकूमशाही येणार हें केवळ कॉंग्रेसवरच अवलंबून नाहीं तर आपण काय करतों, आणि देशांतील घडामोडींना वळण देण्यासाठीं आपण कशाप्रकारें झटतों यावरहि तें बरेचसें अवलंबून आहे. सोशॅलिस्ट पार्टी निष्क्रिय राहून देशांतील घटनांकडे एखाद्या बघ्याप्रमाणें पहात बसूं शकणार नाहीं. फॅसिझम प्रस्थापित होऊं नये येवढ्यासाठीं आपण प्रतिकार करीत राहूं. परंतु आपल्यापैकीं कांहीं साथींची प्रवृत्ति अशी असते कीं, ते पराभव पत्करून

लोकशाही अयशस्वी झाल्याची हाकाटी करूं लागतात. हिंदुस्तानांत हुकूमशाही स्थापन होत आहे असें म्हणणाऱ्या सर्वांना माझें असें सांगणें आहे कीं, त्यांनीं अशी वायफळ बडबड करण्यांत वेळ न गमावतां किसान, कामगार आणि इतर श्रमजीवी वर्गाच्या संघटना बांधण्याच्या विधायक कार्यास स्वतःला वाहून घ्यावें. ते बहुधा असें समजत असावेत कीं, आगामी सार्वत्रिक निवडणुकींत जर आपल्या पक्षाचा धुव्वा उडाला तर तो लोकशाही मार्गाचाच पराभव म्हटला पाहिजे. आपल्या कमकुवतपणावर पांघरूण घालण्याचा हा सर्व प्रयत्न आहे असें मला वाटतें.

साथी बी. पी. सिन्हा यांनीं एक मोठा मार्मिक मुद्दा उपस्थित केला. त्यांनीं उपस्थित केलेला सवाल व्याख्येसंबंधीचा आहे. ज्यावेळीं आपण एखादा शब्द वापरतों त्यावेळीं त्या शब्दाचा आपल्याला अभिप्रेत असलेला अर्थ स्पष्ट करावा लागतो हें खरें. कारण आपण ज्या जगात वावरतों त्यांत चाललेले व्यवहार दुहेरी स्वरूपाचे असतात. शब्दांचे अर्थ कालांतरानें बदलत जावेत असा या विचित्र जगाचा न्यायच दिसतो. त्यामुळें बहुसंख्य जनता सशस्त्र बंड करून उठली तर तेंहि लोकशाही कृत्य समजावें असें साथी बी. पी. सिन्हा म्हणत असतील तर माझें कांहीं म्हणणें नाहीं. पण मी मात्र त्याला लोकक्रांति अशी संज्ञा देणें अधिक पसंत करीन. आज कांहीं आपण सशस्त्र उठा–वाची तयारी करीत नाहीं. लोकशाही मार्गानें बहुसंख्य जनतेला आपण संघटित करूं शकूं आणि मग सशस्त्र उठावाची जरूरीहि उरणार नाहीं.

मी स्वतंत्र व निःपक्षपातीपणानें निवडणुकी व्हाव्यात म्हणून मुंबईत नुकतीच जी परिषद बोलाविली होती तिचाहि कोणीतरी उल्लेख केला. बापू कृष्णमूर्ती यांनी असें दाखविण्याचा प्रयत्न केला कीं, जनतेचे नागरिक हक्क, कामगारांच्या जीवनमानांतील वाढ, अन्न प्रश्न वगैरेपेक्षां मला निवडणुकींचेंच महत्त्व जास्त वाटूं लागलें आहे. आपल्या स्वतःच्याच वृत्तपत्रांत काय मजकूर प्रसिद्ध होतो तें देखील त्यांना माहीत नसावें यांचें मला वाईट वाटतें. कांहीं दिवसांपूर्वी चलनवाढ, पगारकपात आणि तदनुषंगिक इतर प्रश्नांवर चर्चा करण्यासाठीं मुंबईत आम्ही एक परिषद बोलावली होती. आणि त्यांतूनच हिंद मजदूर सभा उदयास आली. मी अत्यंत नम्रपणें असें सांगू इच्छितों कीं, ती परिषद देखील माझ्याच प्रेरणेनें बोला-वण्यांत आली होती. चलनवाढीचा विचार करण्यासाठीं अशीच आणखी एक परिषद कलकत्याला खोज परिषदेतर्फे बोलावण्यांत आली होती. तिचें जनकत्व मात्र माझ्याकडे नव्हते. पाटण्याला जी अ. भा. नागरिक हक्क संरक्षण परिषद भरली होती तिचेंहि उद्-घाटन मी केलें होतें. मुंबईला जी परिषद बोलावण्यांत आली होती, तिचें उद्दिष्ट इतकेंच होतें कीं, जेव्हां जेव्हां निवडणुका होतील तेव्हां त्या खुलेपणानें आणि निःपक्षपातीपणानें व्हाव्यात असा प्रयत्न करावा. लोकशाहीसाठीं आपण जो लढा देत आहोंत त्याचाच हा एक भाग असून त्याला निवडणूकबाजी मुळींच म्हणतां येणार नाहीं.

आपल्या पक्षांत संधीसाधू लोक घुसत आहेत अशी तक्रारहि कांहीं सभासदांनीं केली. वस्तुतः स्वार्थसाधू, अधिकारपदासाठीं

हपापलेले किंवा निवडणुकबाजींत दंग असणाऱ्यांना आपल्या पक्षांत स्थान नाहीं. त्यांनाहि माझें हेंच सांगणें आहे कीं, त्यांनीं पक्षांतून निघून जावें. परंतु असल्या संधीसाधूंचा भरणा पक्षांत होऊ नये असें वाटत असेल तर, त्यावर एकच उपाय आहे आणि तो म्हणजे मोठ्या संख्येनें किसान कामगारांना पक्षांत दाखल करून घेणें. कारण त्यायोगें श्रमजीवी जनतेच्या दडपणामुळें संधीसाधूंचा चेंदामेंदा होऊन जाईल.

काहीं ठिकाणीं जातीयवादी गटांशीं हातमिळवणी करण्यांत आल्याच्याहि तक्रारी करण्यांत आल्या. याबाबत मी परिषदेच्या व्यासपीठावरून असें जाहीर करूं इच्छितों कीं, राष्ट्रीय स्वयंसेवक संघ किंवा हिंदुमहासभा यांच्याशीं निवडणुकीच्या बाबतींत पक्ष कसलाहि संबंध ठेवणार नाहीं. आणि ज्या कोणाच्या हातून हा प्रमाद घडला असेल त्याच्याबाबत कडक उपाययोजना करण्यांत येईल.

एका बाजूला पक्षांत ढिलाई आहे, शिस्तीचा अभाव आहे, अशी तुम्ही तक्रार करतां तर, लगेच पुन्हां शिस्त लागूं करण्याचा कांहीं प्रयत्न करण्यांत आला, शिस्तभंगाबद्दल कोणाला शासन करण्यांत आलें, तर त्याबद्दलहि तुम्हीच गाजावाजा करता आणि त्या मागील सद्हेतुविषयीं शंका घेऊ लागता. या वर्षी पक्षाला अधिक कडक शिस्त लावावयाची ठरविलें तर अशा तक्रारी खूपच वाढणार आहेत; म्हणून मी मुद्दाम तुम्हांस सावधानतेचा इशारा देऊन ठेवीत आहे.

अरुणा असफअलींबद्दल मी माझ्या अहवालात जें निवेदन केलें आहे, त्यामुळें तुम्हाला आश्चर्याचा धक्का बसला असेल. परंतु पक्ष हिताच्या दृष्टीनें ती हकीगत तुमच्यापुढें मांडणें मला आवश्यक वाटलें. त्यांचा लोकशाही समाजवादावर विश्वास नाहीं. खाजगी संभाषणांत तर लोकशाही समाजवादाची त्या टरच उडवितात. त्या यूरोपला जाण्यापूर्वी मी मुंबईत त्यांची गांठ घेऊन त्यांस असें विचारलें कीं, राष्ट्रीय कार्यकारी मंडळाच्या सभांना ओळीनें तीनवेळीं त्या गैरहजर कां राहिल्या ? त्यावेळीं त्यांनीं असें सांगितलें कीं, लोकशाही समाजवादाचा अर्थच त्यांना समजूं शकत नाहीं. आणि दिल्लीला पोहोंचल्यानंतर पक्षाचा राजीनामा पाठवून देण्याचें आश्वासनहि त्यांनीं दिलें. परंतु तो राजीनामा मात्र त्यांनीं कधींच पाठविला नाहीं. त्यामुळें वरवर पहातां तरी, त्या पक्षाच्या सभासद आहेत असेंच मानलें पाहिजे. यूरोपमधील त्यांच्या हालचाली पक्षाची ताकद वाढविण्यास सहाय्यभूत झालेल्या नाहींत. हिंदुस्तानांत परत आल्यानंतर त्या काय करतील तें मला सांगता येत नाहीं. परंतु एवढें मात्र खरें कीं, त्या कम्युनिस्ट पक्षाला मिळाल्याचें जें वृत्त प्रसिद्ध झालें आहे तें सवस्वी निराधार आहे एक दिवस अचानक त्यांनीं पक्षाचा राजिनामा दिल्याची बातमी वृत्तपत्रांत प्रसिद्ध झाली तर, तुम्हाला धक्का बसू नये म्हणून अहवालांत त्यांचा नामनिर्देश करून ठेवणें मला जरूर वाटलें. हिंदुस्तानांत परत आल्यानंतर लोकशाही समाजवादाच्या ध्येयावर विश्वास असल्याचें त्यांनीं जाहीर केलें तर, माझे शद्व मी सहर्ष परत घेईन. इतकेंच नव्हे तर त्याबद्दल अवश्य दिलगिरी प्रदर्शित करीन.

# लोकशाही समाजवाद

या लेखात मी ज्या विषयाची चर्चा करण्याचें योजिलें आहे तो विषय केवळ हिंदुस्तानातील नागरिकांच्याच नव्हे तर, अखिल जगातील जनतेच्या दृष्टीनेंहि अत्यंत महत्वाचा आहे. आजकाल अमेरिका आणि रशिया या दोन गटात जगाची विभागणी करण्याची स्पर्धा चालू आहे. परंतु या विभागणीबरोबरच एका बाजूला हुकूमशाही आणि दुसऱ्या बाजूला लोकशाही अशा दोन गटातहि हें जग विभागलें जात आहे. आणि भावीकालाच्या दृष्टीनें ही विभागणीच अधिक महत्वपूर्ण आहे असे मी म्हणेन. लोकशाही समाजवादासंबंधीं आपल्याला केवळ तात्विक अथवा शास्त्रीय स्वरूपाची चर्चा करून चालणार नाहीं. तर सध्या अस्तित्वात असलेले निरनिराळे संप्रदाय, त्यांच्या विचारप्रणाली आणि त्यामधील संघर्ष देखील आपणाला विचारात घेतले पाहिजेत. हा विषय केवळ तात्विक दृष्टयाच महत्वाचा आहे असें नाहीं तर व्यावहारिक दृष्टीनें देखील त्याला फार महत्व आहे. ज्यांना समाजवादी आंदोलनाचा इतिहास माहीत आहे ते हें मान्य करतील कीं, समाजवादाचें स्वरूप लोकशाही आणि एकतंत्री अशा दोन्हीं प्रकारचें असूं शकतें. लोकशाही समाजाची संपूर्ण परिणतावस्था म्हणजे

कीं, एकादें आंदोलन अगर एकादी व्यक्ति मार्क्सवादी आहे एवढें म्हणून भागणार नाहीं तर, त्या मार्क्सवादाचा नेमका अर्थ काय हेंहि त्याचबरोबर सांगितलें पाहिजे. यावरून असा निष्कर्ष निघतो कीं, प्रत्येक आंदोलनाची तत्त्वप्रणाली आणि कार्यक्रम काय राहील तें निश्चित ठरविलें पाहिजे. आणि आपल्या देशांत समाजवादी आंदोलनाचे बाबतींत तेंच करण्याचा आमचा प्रयत्न आहे. आणि या प्रयत्नांतूनच लोकशाही समाजवादाचा सिद्धांत पुढें आला. हिंदुस्तानांत इतकेंच नव्हे तर जगांत कोठेंहि मार्क्सवाद लागू करावयाचा असेल तर, लोकशाही समाजवादावर आधारलेल्या समाजाचाच आदर्श डोळ्यापुढें ठेवला पाहिजे. मी वर म्हटल्याप्रमाणें समाजवादाच्या पाठीमागें एकादें उपपद लावण्याची वस्तुतः कांहीं जरूर नव्हती. परंतु समाजवादी विचारसरणींत जे फेरबदल घडून आले आहेत, आणि विशेषतः रशियन राज्यक्रांतीनंतर त्या ठिकाणीं जी परिस्थिति निर्माण झाली आहे, त्यामुळें हुकूमशाही कम्युनिझमपासून आपला समाजवाद निराळा आहे हें दाखविण्यासाठीं 'लोकशाही' हें उपपद जोडणें आवश्यक होऊन बसलें आहे.

या ठिकाणीं माझ्या कांहीं वैयक्तिक अनुभवांचा उल्लेख करणें अप्रस्तुत ठरणार नाहीं. मी तो उल्लेख अशाकरतां करतों आहे कीं, त्यावरून लोकशाही समाजवादाचा अंगिकार करण्यापूर्वीं आमच्या–पैकीं बहुतेकजणांना कोणत्या मनःस्थितींतून जावें लागलें त्याची कल्पना येऊ शकेल.

अमेरिकेंतील विसकॉन्सिन युनिव्हर्सिटींत शिकत

कांहीं जहाल विद्यार्थ्यांनीं चालविलेल्या अनीश्वरवादी मंडळ नांवाच्या कट्टर नास्तिक संघटनेशीं माझा संबंध आला. त्या मंडळांत कलावंत, कवि, कम्युनिस्ट असे सर्व प्रकारचे लोक येत असत. त्यांपैकीं कम्युनिस्टांपाशीं दिसून येणारा आवेश, निष्ठा आणि गांभिर्य यांचा माझ्या मनावर फार परिणाम झाला. आणि त्यामुळें मी स्वतःहि कम्युनिस्ट बनलों. त्याच सुमारास लेनिन मरण पावला होता. परंतु स्टॅलिनच्या हातीं सत्ता आलेली नव्हती. आणि जागतिक कम्युनिझमची चळवळ लेनिनच्या सिद्धांतानुसारच चालविली जात होती. त्यामुळें कम्युनिझमला विकृत स्वरूप येण्यापूर्वींच त्याचा अभ्यास करण्याची मला संधी मिळाली. आणि तेथें कम्युनिस्ट बनून मी हिंदुस्तानांत परत आलों. परंतु मध्यंतरीच्या काळांत जागतिक कम्युनिस्ट चळवळींत कांहीं महत्वपूर्ण घटना घडल्या होत्या. रजनी पाम दत्तांचे बंधु क्लीमांशु दत्त हे कम्युनिस्टांपैकीं एक अग्रगण्य विचारवंत म्हणून समजले जातात. हिंदुस्तानांत गेल्यावर मी काय करावें याबाबत त्यांच्याशीं प्रदीर्घ चर्चा केल्यानंतरहि हिंदुस्तानांत स्वतःला कम्युनिस्ट अथवा मार्क्सवादी म्हणविणारांनीं कॉंग्रेस बाहेर राहून तिला विरोध करणें योग्य कसें ठरतें तें मला समजूं शकलें नाहीं. थर्ड इंटरनॅशनलच्या ( तिसरी आंतरराष्ट्रीय संघटना ) दुसऱ्या अधिवेशनापुढें लेनिननें वसाहतिक देशासंबंधीं जो सुप्रसिद्ध प्रबंध मांडला होता आणि ज्याला वेदवाक्याचें स्वरूप प्राप्त झालें होतें तो मी देखील अभ्यासला होता. राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या लढ्यांत सक्रीय भाग घेणें हें परतंत्र देशांतील कम्युनिस्टांचें कर्तव्य ठरतें असें त्या प्रबंधांत

लेनिननें निःसंदिग्धपणें म्हटलें होतें. राष्ट्रीय आंदोलन हें कम्यु-
निस्ट आंदोलनासारखे वर्गलढ्याच्या स्वरूपांत असूं शकत नाहीं.
कामगार, शेतकरी, मध्यमवर्ग इतकेंच नव्हे तर, मांडवलदार अशा
सर्व वर्गांनीं मिळून साम्राज्यशाही विरुद्ध उघडलेली एक प्रकारची
संयुक्त आघाडी असें स्वरूप त्या आंदोलनास यावयास हवें. आणि
म्हणूनच लेनिननें त्या प्रबंधांत असें म्हटलें होतें कीं, अशा लढ्यांत
कम्युनिस्टांनीं भाग घेतला पाहिजे इतकेंच नव्हे तर, संधी मिळाल्यास
त्याचें नेतृत्व देखील केलें पाहिजे. त्यामुळें स्वातंत्र्यासाठीं लढणाऱ्या
कॉंग्रेसपासून अलग राहून तिला विरोध करणें कम्युनिस्टांच्या दृष्टीनें
आवश्यक कसें ठरतें तें मला समजूं शकलें नाहीं. कॉंग्रेसचें स्वरूप
एकाद्या विशाल जनसंघटनेसारखे होतें. आणि स्वतःला कम्युनिस्ट
म्हणविणारी कोणतीहि व्यक्ति अशा प्रकारच्या आंदोलनापासून अलग
राहूंच कशी शकते तें समजणें माझ्या आवाक्याबाहेरचें होतें.
चीनमधील प्रयोगानंतर १९२८ सालीं थर्ड इंटरनॅशनलनें आपल्या
सहाव्या अधिवेशनांत असा निर्णय घेतला कीं, इतर संघटनांपासून
अलग राहून कम्युनिस्टांनीं लढाऊ जनतेपुढें आपलें स्वतंत्र अस्तित्व
प्रकट करावें. कारण फक्त कम्युनिस्ट नेतृत्वाखालीच जागतिक क्रांति
होऊ शकते अशी त्यांची भावना होती. ही विचारसरणी मला पटली
नाहीं. आणि म्हणून हिंदुस्तानांत परत आल्यानंतर मी कॉंग्रेसमध्यें
दाखल झालों तेथें माझी अशा लोकांशीं गांठ पडली कीं, जे लेनिननें
आपल्या प्रबंधांत दिलेल्या आदेशाबरहुकूम कॉंग्रेसमध्यें कॉंग्रेस समाज-
वादी पक्ष संघटित करण्याची खटपट करीत होते. स्वातंत्र्य

प्रत्यक्ष भाग घेऊन, त्याला शक्यतोंवर वर्ग लढयाचें किंवा समाजवादी आंदोलनाचें स्वरूप द्यावें म्हणजे राष्ट्रीय लढा यशस्वी झाल्याबरोबर लगेच जरी समाजवाद स्थापन करतां आला नाहीं तरी निदान त्या ध्येयाच्या समीप तरी जातां येईल अशी त्या मंडळींची विचारसरणी होती. तेथूनच कम्युनिस्ट आणि समाजवादी, यांच्यातील मतभेदांना सुरवात झाली. प्रत्येक समाजवादी आणि प्रत्येक कम्युनिस्ट स्वतःला आंतरराष्ट्रीयवादी समजतो. परंतु समाजवाद्यांचा आंतरराष्ट्रीयवाद खरा असतो तर, सोव्हियट रशियाची गुलामगिरी पत्करून त्याच्या हुक--मांची तामिली बजावीत राहाणें एवढाच कम्युनिस्टांच्या आंतरराष्ट्रीय वादामागील हेतू असल्यामुळें तें निव्वळ ढोंगच ठरतें. समाजवादी--आंदोलनाचें नेतृत्व कोण करणार, रशियाचीच ती मक्तेदारी आहे कीं काय, हाच आज मतभेदाचा मुख्य मुद्दा आहे. जगांतील कोठल्या तरी एका देशांत आंतरराष्ट्रीय कचेरी स्थापन केली म्हणजे जगक्रांतीचें नेतृत्व करतां येईल यावर समाजवादी विश्वास ठेवीत नाहींत. आणि म्हणूनच कॉंग्रेस समाजवादी पक्षानें विचार स्वातंत्र्या-वर पहिल्यापासून भर दिला आहे.

सहाव्या अधिवेशनानंतर बरोबर सहा वर्षांनीं कम्युनिस्ट इंटरनॅशनलनें आपलें धोरण बदलताक्षणींच १९३५ सालीं लगेच कम्युनिस्ट राष्ट्रीय आंदोलनांत सामील झाले. त्या अवधींत कॉंग्रेस व राष्ट्रीयलढा यांच्या, पहिल्या स्वरूपांत बदल घडविणारी कोणतीच घटना घडून आलेली नव्हती. त्यामुळें पूर्वी कम्युनिस्ट पक्षाच्या सभासदाला कॉंग्रेसचे सभासद होता येत नसले तरी आता परिस्थिति

बदलल्यामुळें कॉंग्रेसमध्यें भाग घेणें आवश्यक बनलें आहे असें येथील कम्युनिस्टांना म्हणता येणार नाहीं. तरी देखील आम्ही कम्युनिस्टांबरोबर संयुक्त मोर्चा उभारण्याचा प्रयत्न केला. परंतु त्यांत आम्हांला यश आलें नाहीं.

केवळ समाजवाद्यांबरोबरच नव्हे तर, प्रागतिक आणि प्रतिगामी गटाशीं देखील दोस्ती करण्याइतकें कम्युनिस्ट इंटरनॅशनलच्या धोरणांत अचानक परिवर्तन कसें झालें? १९२८ ते १९३५ च्या दरम्यान अशी कोणती घटना घडून आली? याचें सिंहावलोकन करूं लागलों तर, आपणांस असें दिसून येईल कीं, हिटलरचा उदय हीच ती घटना होय. १९२८ नंतर कम्युनिस्टांनीं सर्वांच्या बरोबर फटकून वागण्याचें धोरण अवलंबिलें आणि जे त्यांच्या सर्वांत जवळचे होते त्यांनाच ते आपले कट्टर दुष्मन समजूं लागले. त्यामुळें कामगार आणि समाजवादी चळवळींत अजिबात फूट पडली. सुरवातीला मास्कोची कल्पना अशी होती कीं, नाझी चळवळीला जनतेचा कसलाहि पाठिंबा मिळणार नाहीं आणि सोशल डेमोक्रॅटिक पक्ष हाच जर्मनींतील आपला सर्वांत प्रबळ शत्रु आहे. म्हणून निवडणुकीच्या वेळीं ज्या ठिकाणीं ते आपले उमेदवार उभे करूं शकले नाहींत, त्याठिकाणीं नाझी उमेदवारांना पाठिंबा देण्यापर्यंत त्यांची मजल गेली. अशा तऱ्हेनें हिटलरला सत्तारूढ होण्यास त्यांनीं मदत केली आणि एकदा सत्ता हातीं आल्यानंतर मग हिटलरनें सोशल डेमोक्रॅटिक पक्ष आणि कम्युनिस्ट या दोघांनाहि भरडून काढलें. त्यावेळीं मास्कोला जाणीव झाली कीं,

नाश करणें न करणें त्यांच्या मर्जीवर अवलंबून नाहीं. त्याबरोबर त्यांनीं आपला पवित्रा बदलला व लोकशाही गटांच्या संयुक्त आघाडीची घोषणा केली. आणि त्या धोरणानुसारच हिंद कम्युनिस्ट काँग्रेसमध्यें सामील झाले. आमच्या मतें काँग्रेसच्या झेंड्याखालीं अशा प्रकारची आघाडी पूर्वीपासूनच संघटित होत होती. पण आंधळेपणानें मास्कोचे आदेश पाळणाऱ्या कम्युनिस्टांना तें कोठलें उमगावयाला !

त्यानंतर कित्येक वर्षें आम्हीं बरोबर कामें करीत होतों. त्याकाळांत आम्हांला असें कांहीं अनुभव आले कीं, ज्यांचा परिणाम आमच्या सध्याच्या निर्णयावरहि झालेला आहे. पहिला अनुभव आला तो रशिया संबंधींचा. १९३५ नंतर रशियांत शुद्धीकरणाची लाट उसळली होती. चीनबाबत काय धोरण स्वीकारावें यावर कॉमिंटार्नमध्यें खडाजंगी सुरू होती. आणि त्या अंतर्गत विरोधांतूनच रशियन राज्यक्रांतीच्या इतिहासांत ज्यांना फार महत्त्वाचें स्थान आहे, अशा प्रमुख क्रांतिकारकांवर शुद्धीकरणाच्या नांवाखाली खटले भरण्यांत येऊन त्यांना फाशी देण्यांत आले. ज्यावेळीं झिनोव्हिफ आणि बुखारिन सारख्यांचा काटा काढण्यांत आल्याचें आमच्या कानांवर आलें, त्यावेळीं रशियांत काय चाललें आहे याचा आमच्या डोक्यांत प्रकाश पडला. आणि हिंदुस्तानांत असले प्रकार कधींहि होता कामा नयेत, म्हणून आम्हीं लोकशाहीवर अधिक भर देऊं लागलों.

रशियांत राज्यक्रांति होऊन समाज परिवर्तन घडून आल्यानंतरहि म्हणजे संक्रमणकाळ संपून गेल्यावरहि हुकूमशाही राजवट

कायम झाल्याचें ज्यावेळीं दृष्टोत्पत्तीस आलें त्यावेळीं रशियन समाजवादाचें सत्यस्वरूप उघड झालें. आणि साहजिकच आमच्यापुढें असा प्रश्न उभा राहिला कीं, हिंदुस्तानांत समाजवादी समाज अस्तित्वांत येईल त्यावेळीं अशीच परिस्थिति निर्माण झाली तर तें चालेल कां? रशियात कदाचित समाजवाद असेल, परंतु नागरिक स्वातंत्र्य मात्र तेथें अजिबात नाहीं. सरकार अगर कम्युनिस्ट पक्ष यावर टीका करण्याची तेथील नागरिकांना मुभा नाहीं. सरकारचे हात इतके दूरवर पोहोंचले आहेत कीं, घरांत नवरा आपल्या बायकोशीं किंवा बाप मुलाशीं मोकळेपणीं बोलायला घाबरतो. कारण त्यापैकीं सरकारी गुप्तहेर कोण निघेल याचा कांहीं नेमच नसतो. रशियांत नागरिक स्वातंत्र्याचीच गळचेपी झालेली आहे असें नव्हे, तर संघटना स्वातंत्र्यहि लोप पावलेलें आहे. समाजवादी ध्येयाची ही घोर विटंबना थांबविण्यासाठीं समाजवादांतील लोकशाही पैलूवर अधिक भर देणें आणि जनतेला खऱ्याखुऱ्या समाजवादाचें शिक्षण देणें हें आम्हीं आमचें कर्तव्य समजूं लागलों. कारण उद्या सत्ता हातीं आल्यावर समाजवादीहि अशा चुका करूं लागले तर, जनतेला त्यांना योग्य मार्गावर नेता यावें. समाजवादी समाजांत इतर जनसंघटनाहि असूं शकतात. त्यापैकीं कामगार संघटनांना माझ्यामतें अत्यंत महत्व आहे. समाजवादी समाजव्यवस्थेत कामगार संपूर्णपणें स्वतंत्र असेल आणि तो ज्या कारखान्यांत काम करीत असेल त्या कारखान्यावर त्याचा ताबा असेल ही गोष्ट कम्युनिस्ट आणि समाजवादी दोघेहि मान्य करतात. राजकीय क्षेत्रांत ज्याप्रमाणें चर्चांत

प्रत्येकाला मतदानाचा हक्क मिळतो, त्याप्रमाणें औद्योगिक क्षेत्रांत देखील उद्योगधंद्याचें संचलन कशाप्रकारें व्हावें तें ठरविण्याचा अधिकार त्या त्या धंद्यांत काम करणाऱ्या कामगारांना मिळाला पाहिजे. तरच औद्योगिक क्षेत्रांत लोकशाही स्थापन होऊं शकेल. परंतु स्टॅलीनवाद सुरूं झाल्यापासून अशाप्रकारची औद्योगिक लोकशाही रशियांतून हळूहळू नामशेषच होत गेली.

सांस्कृतिक क्षेत्रांतहि अशा कांहीं उलथापालथी घडून आल्या कीं, ज्यामुळें रशियांतील समाजवादाला विकृत स्वरूप प्राप्त झालें उदाहरणार्थ केवळ राष्ट्रवादाचें पुनरुज्जीवन झालें इतकेंच नव्हे, तर स्टॅलिनवादाचाहि बडेजाव माजविण्यांत येऊं लागला. रशियांतील कम्युनिस्ट पार्टी जाणून बुजून युरोपांत स्लाववाद फैलावण्याचा प्रयत्न करीत आहे. स्लाव देशांना साम्यवादाच्या नव्हे तर अशाप्रकारच्या जातीय प्रचाराखालीं रशियन गटांत ओढण्याचें प्रयत्न होत आहेत. समाजवाद आणि जातीयवाद एकत्र नांदू शकत नाहीं. परंतु रशियांत आज तसें घडत आहे आणि या संकुचित राष्ट्रवादाची छाप तेथील साहित्य, कला इत्यादिकांवरहि पडत आहे. रशियाचें सारें लक्ष आज स्वतःच्या राष्ट्राचा स्वार्थ कसा साधेल यावरच खिळून राहिलें आहे. प्रत्येक आंतरराष्ट्रीय प्रश्नाकडेदेखील त्याच दृष्टीनें बघितलें जातें. रशियाचें पहिलें राष्ट्रगीत हें वस्तुतः आंतरराष्ट्रीय गीत होतें. परंतु त्याला तिलांजली देऊन ज्यावेळीं रशियांत एक कट्टर राष्ट्रवादी गाणें सुरूं करण्यांत आलें त्यावेळीं या संकुचित राष्ट्रवादाचा कळस झाला. समाजवाद राष्ट्रप्रेमाला

पारखा असतो असें नाहीं. परंतु रशियांत ज्या प्रकारच्या राष्ट्रप्रेमाचे पाठ दिले जातात तें राष्ट्रप्रेम मात्र प्रतिगामी आहे. ज्या स्त्रीला चौदा मुलें झाली तिचा राष्ट्रांतील आदर्श स्त्री म्हणून गौरव करण्यापर्यंत अखेर या संकुचित राष्ट्रवादाची मजल गेली. वस्तुतः समाजवादी चळवळींत संतति नियमनाला सांस्कृतिक दृष्ट्या फार महत्वाचें स्थान दिलें जातें.

राज्यकारभारांत ज्याना विशिष्ट स्थान प्राप्त झालें आहे, अशा लोकांचा एक वर्गच रशियांत अस्तित्वात आला आहे. उदाहरणार्थ आजहि तेथें सैन्यांतील अधिकाऱ्यांच्या मुलांना सामान्य सैनिकांच्या मुलांपेक्षां कॉलेजांत चटकन प्रवेश मिळतो. त्याचप्रमाणे पक्षांतील व सरकारी नोकरींतील अधिकाऱ्यांच्या मुलांना सामान्य नागरिकांच्या मुलांपेक्षां विश्वविद्यालयांतून प्रवेश मिळविणे सोपें जातें.

रशियांत घडणाऱ्या अशाप्रकारच्या घटना प्रत्यहि आमच्या कानावर येतच होत्या. त्यासंबंधीं आम्ही एकसारखे विचार करीत होतों. आणि बऱ्याच काळानंतर अखेर आम्हीं अशा निर्णयावर येऊन पोहोंचलों कीं, आपल्याला त्या विदारक घटनांकडे डोळेझाक करून चालणार नाहीं; आणि त्यामुळें समाजवादाच्या लोकशाही स्वरूपावर जोर देणें आम्हांस अत्यावश्यक वाटूं लागलें.

ज्या समाजांत नागरिक स्वातंत्र्याचा अभाव असेल आणि पोलिस व गुप्तहेर यांच्या हातीं अमर्याद अधिकार असतील अशा प्रकारचा समाज निर्माण करण्यांत मला कसलेंच स्वास्थ्य वाटणार नाहीं. माझ्या दृष्टीनें भौतिक गरजा पुरविणें एवढाच समाजवादाचा

अर्थ नाहीं. गुलामांच्या समाजांत देखील त्या पुऱ्या केल्या जात असत. गुलामांच्याकडून अधिक काम करून घेता यावें म्हणून गुलामांचे मालकच ती तत्परता दाखवीत. भांडवलशाही समाजांतच भांडवलदार कामगारांची अजिबात दखल घेत नाहीं, आणि कामगार नकोसा झाल्याबरोबर त्याला हाकून देतो. कारण हवे तेवढे मजूर त्याला मिळूं शकतात. यामुळेंच तर कामगार चळवळीची उभारणी झाली.

प्रत्येक व्यक्तीच्या गरजा भागविणें येवढेंच समाजवादांत अभिप्रेत नाहीं, तर त्याच्या व्यक्तित्वाचा संपूर्ण विकास होण्याची संधीहि त्याला मिळाली पाहिजे. परंतु रशियांतील परिस्थिति तर याच्या बरोबर उलट आहे. त्यामुळें शेवटी आम्हीं असा निष्कर्ष काढला कीं, समाजवादाचें ध्येय लोकप्रिय करावयाचें असेल तर संपूर्ण लोकशाही म्हणजेच समाजवाद अशी भावना जनमनांत रुजविण्याचें कार्य समाजवादी चळवळीला केलें पाहिजे. संपूर्णपणें लोकशाही समाजातच राजकीय, सामाजिक व आर्थिक स्वातंत्र्य सुरक्षित राहूं शकेल.

अशा प्रकारच्या समाजाची निर्मिति होऊं शकेल कीं नाहीं हा मात्र प्रश्न आहे. त्याचप्रमाणें हें परिवर्तन लोकशाही मार्गानें घडून येईल कीं, त्यासाठीं क्रांतीचा आणि कामगार वर्गाच्या हुकूमशाहीचा अवलंब करावा लागेल हाहि एक महत्वाचा सवाल आहे. परंतु आपलें ध्येय स्पष्ट असेल, त्याबाबत आपल्या मनांत कांहीं गोंधळ नसेल तरच तें साध्य करून घेण्यासाठीं कोणतीं साधनें उपयुक्त ठरतील त्याचा विचार करतां येईल. हे सर्व प्रश्न सिद्धांतिक

स्वरूपाचे नसून व्यावहारिक आहेत. आणि मी वर जें चित्र रेखाटण्याचा प्रयत्न केला आहे तें संपूर्णपणें व्यवहार्य असेल, त्यात अवास्तव असें कांहीं नसेल,तर लोकशाही समाजवादावर अधिष्ठित असलेला समाज खचित अस्तित्वांत येऊ शकेल.

लोकशाही समाजवाद असलेला समाज निर्माण करण्यासाठीं जागृति आणि जीवनमान कांहीं एका मर्यादेपर्यंत वाढलेलें असणें आवश्यक असतें. आपल्याला असें दिसून येईल कीं, ज्या देशांतील जनता अशिक्षित, असंस्कृत आणि औद्योगिक दृष्ट्या मागासलेली आहे, त्याच ठिकाणीं कम्युनिस्टांना आपलें बस्तान बसविता आलें आहे. आपल्या देशांतील जनता देखील फार मागासलेली आहे आणि म्हणून येथेंहि हुकूमशाहीचा धोका आहे. परंतु माझा असा विश्वास आहे कीं, हिंदी जनता अशिक्षित असली तरी देखील आपल्या देशाची एक विशिष्ट परंपरा असल्यामुळें स्वातंत्र्य आणि लोकशाही मूल्यांचें तिला आकलन होऊं शकेल. आपल्या समाज व्यवस्थेंतील कांहीं रीतिरिवाज लोकशाहीला मारक ठरणारे आहेत यांत शंका नाहीं. तथापि त्याचबरोबर कांहीं शाश्वत मानवी मूल्येंहि या देशांत अगदी खोलवर रुजलीं आहेत. त्यामुळें जनतेला सांस्कृतिक दृष्ट्या उच्च पातळीवर नेणें शक्य आहे. अर्थात माझ्या म्हणण्याचा आशय असा नाहीं कीं, प्रत्येक व्यक्तीच्या आचाराणामागें ही उच्च भूमिका असेल. परंतु त्यामागें अशा प्रकारची उच्च पार्श्वभूमि आणि थोर परंपरा खासच आहे. शिवाय आपल्या देशाच्या जुन्या परंपरेंत गांधीजींच्या परंपरेची जी भर पडली आहे, तीहि लोकशाहीचाच

आहे आपल्या भावी पिढ्यानाहि हा वारसा मिळणार असल्यामुळें सर्व सामान्य जनतेच्या मनावर त्याचा प्रभाव पडल्याशिवाय राहणार नाहीं अशी माझी खात्री आहे. कारण ज्यावेळीं एकाद्याला अटक केली जाते अथवा स्थानबद्ध करून ठेवण्यात येतें, किंवा एखाद्या जमावावर गोळीबार होतो त्यावेळीं देशांत कोठें ना कोठें तरी राजकीय दृष्टया जागृत असलेल्या लोकांकडून त्याचा निरोध होतो आणि 'अशा प्रकारच्या स्वातंत्र्यासाठीं काहीं आम्ही लढा दिला नाहीं' असे उद्गार त्यांच्या तोंडातून निघालेले आपण ऐकतों. याचें कारण हेंच कीं, आपल्या राष्ट्रीय चळवळीमधूनहि एक लोकशाही वातावरण तयार झालेलें आहे त्यामुळें लोकशाही समाजवादी समाज निर्माण करणें अवघड वाटत असलें तरी हिंदुस्थानात आपण तसा समाज निर्माण करू शकूं आशियांत हा प्रयोग यांठें यशस्वी होण्यासरखा असेल, तर तो हिंदुस्तानातच. आणि या प्रयत्नांत आपल्याला अपयश आलें तरी निदान एका उदात्त ध्येयासाठीं आपण झगडत राहिलों एवढे तरी समाधान आपल्याला खास मिळेल.

समाज परिवर्तन कशाप्रकारें घडून येणार या बाबत तीव्र मत-भेद आहेत त्याचा निर्णय इतिहासच देऊं शकेल. एका बाजूचे म्हणणें असें आहे कीं, समाजवाद शांततामय, सनदशीर मार्गानेंच स्थापन होऊं शकेल अन्य मार्गांचा अवलंब केला तर तो समाज-

समाजवाद येऊं शकेल. मला जो कांहीं मार्क्स समजला आहे, त्या-वरून या दोनहि विचारसरणी चुकीच्या आहेत असें मी म्हणेन. माझ्या मतें याबाबत निश्चित असा एकादा नियम घालून देतां येणार नाहीं. निरनिराळ्या देशांतील परिस्थितीवरच तें अवलंबून राहणार. याबाबत मार्क्सनें व्यक्त केलेले विचार अगदी स्पष्ट आहेत. आज जो मुख्य वादाचा विषय होऊन बसला आहे त्याबाबत मार्क्सनें तुमचा ओझरता उल्लेख केला आहे. उदाहरणार्थ कामगार वर्गाच्या हुकूम-शाहीचा उल्लेख त्याच्या एवढया विपुल लिखाणांत फक्त चार किंवा पांच ठिकाणीं आलेला आढळतो. आणि त्याबाबतहि समाजवाद सर्व ठिकाणीं याच प्रकारें स्थापन होऊं शकेल असें ठामपणें त्यानें कोठेंच म्हटलेलें नाहीं. केवळ कम्युनिस्ट मॅनिफेस्टोच तेवढा वाचला, तर मात्र तसा गैरसमज होण्याचा संभव आहे. कारण तो युरोपांतील कम्युनिस्टांसाठीं लिहिण्यांत आला होता. युरोपांत कम्युनिस्ट क्रांति घडून येण्याचा समय अगदीं जवळ येऊन ठेपला आहे असें त्यावेळीं मार्क्स आणि एंगल्स यांना वाटूं लागलें होतें. परंतु फक्त अर्ध्या

दुसऱ्या अधिवेशनापुढें भाषण करतांना त्यानें स्पष्टपणें असें म्हटलें आहे कीं, समाजवादाचा सिद्धांत सर्व देशांना सारखाच लागूं पडण्यासारखा असला तरी त्याचे मार्ग मात्र भिन्नभिन्न परिस्थितीवरच अवलंबून राहतील. हॉलंडमध्यें असतांना मार्क्सनें असें म्हटलें आहे कीं, येथील संस्थांची माझी माहिती बरोबर असेल, तर येथें आणि इंग्लंड अमेरिकेतहि सनदशीर मार्गानेंच समाजवादाची स्थापना करतां येईल. ज्यावेळीं मार्क्सनें हें विधान केलें त्यावेळीं यापैकीं कोटल्याच देशांत प्रौढ मताधिकार नव्हता. आणि तरीहि मार्क्सनें लोकशाहीचा विकास होऊं शकेल हें जाणलें, आणि त्या देशांत सनदशीर मार्गानेंच समाजवाद येऊं शकेल असें सांगून ठेवलें. परंतु आपल्या दुर्दैवानें आज कांहीं मार्क्सवादी स्वतःला मार्क्सपेक्षाहि जादा मार्क्सवादी समजूं लागल्याचें दृश्य दिसूं लागलें आहे. मार्क्सचे याबाबतींतील विचार अगदी स्पष्ट होते. परंतु जे स्वतःला त्याचे अनुयायी म्हणवून घेतात तेच त्याचा विपर्यास करीत आहेत.

हिंदी कम्युनिस्ट असें समजतात कीं, सशस्त्रक्रांतीच्या मार्गानेंच समाजवादाची स्थापना होऊं शकेल. त्यांचें म्हणणें असें आहे कीं, हिंसात्मक मार्गाचा अवलंब केल्याशिवाय येथें समाजवाद येणेंच शक्य नाहीं. समाजवादी पक्षाचें असें मत आहे कीं, मार्क्सचे सिद्धांत आणि कार्यपद्धति मान्य असणाऱ्या प्रत्येक समाजवाद्यानें आजच्या परिस्थितींत जनतेंत मिसळून तिला वर्ग लढ्यासाठीं संघटित केलें पाहिजे आणि अशा प्रकारें समाजवादी चळवळीचा पाया घातला पाहिजे. म्हणजे जनता आपण होऊनच समाजवाद निर्माण करूं शकेल.

आपल्या आजच्या कार्यांतूनच उद्यांचें जग निर्माण होणार आहे. समाजवादी देखील कम्युनिस्टांप्रमाणें आगी लावीत आणि ॲसिड बल्ब फेकीत सुटतील, तर त्याची परिणति अखेर येथें फॅसिझम येण्यातच होईल. हिंदुस्तानचा फॅसिझमपासून बचाव करण्याचा एक-मेव मार्ग जर कोणता असेल, तर तो म्हणजे समाजवादी पक्ष. जर्म-नींत सोशल डेमोक्रॅटिक पक्ष आणि कम्युनिस्ट पक्ष आपापसांत ल्ढत राहिले आणि कम्युनिस्टांनीं सोशल डेमोक्रॅटिक पक्षापेक्षांहि नाझींना जवळ केले. अन्यथा समाजवादी आणि कम्युनिस्ट यांच्या संयुक्त शक्तीपुढें तेथें फॅसिझमचा टिकाव लागला नसता.

मी सनदशीर मार्गासंबंधीं कांहीं विचार या ठिकाणी मांडणार आहे. निवडणुकीसाठीं एक पक्ष संघटित करून त्या पक्षाच्या प्रचार यंत्रणेमार्फत निवडणुका जिंकणें एवढ्याचाच अंतर्भाव सनदशीर मार्गांत केला जातो. परंतु लोकशाही दृष्ट्या कार्यक्षेत्र यापेक्षां व्यापक असूं शकते. उदाहरणार्थ कामगार संघटना उभारणें, किसान पंचायती आणि सहकारी संस्था स्थापन करणें. कायदेशीर आणि बेकायदेशीर संप, हरताळ, कायदेभंग, सत्याग्रह वगैरेंचाहि त्यांत अंतर्भाव होऊं शकतो. कारण सत्याग्रह वगैरे गोष्टी बेसनदशीर असल्या तरी त्या लोकशाहीला मारक नाहीत. समाजवादासाठीं कराव्या लागणाऱ्या लढ्यांत समाजवादी पक्ष वरील साधनांचाहि समावेश करतो. आपलें ध्येय प्राप्त करून घेण्यासाठीं जरूर तर, संप आणि सत्याग्रह हा समाजवादी कार्यक्रमाचा एक भाग बनेल.

आज कम्युनिस्ट पार्टी ज्या साधनांचा उपयोग करीत

तीं क्रांतिकारी साधनें नाहींत. प्रत्येक प्रकारची हिंसा ही क्रांतिकारी असतेच असें नाहीं. दहशतवाद म्हणजे कम्युनिझम नव्हे. त्या दोहोंत फार फरक आहे. क्रांतीसाठीं सध्या कम्युनिस्ट ज्या साधनांचा अवलंब करीत आहेत त्यामुळें क्रांति तर घडून येणारच नाहीं, उलट प्रतिक्रांतिकारक शक्ति मात्र वाढीस लागेल.

समाजवादी पक्ष लोकशाही मार्गानेंच कार्य करीत राहील परंतु हिंसात्मक मार्गाचा अवलंब करणें आवश्यक झालें आहे आणि त्यावांचून आपलें ध्येय साध्य होणार नाहीं असें जर समाजवादी पक्षास वाटलें, तर त्या परिस्थितींत पक्ष त्या मार्गाचाहि अवलंब करील. ऑगस्ट क्रांतीच्यावेळीं पक्षानें तीं साधनें वापरलींच होतीं. परंतु सद्य परिस्थितींत मात्र हिंसामार्गानें प्रतिगामी शक्तींचेच हात बळकट होणार आहेत.

समाजवादाचें ध्येय काय, आज त्याबाबत संदेह कसा निर्माण झाला आहे, आणि रशियांतील अनुभवावरून त्याचा फेरविचार करण्याची वेळ कशी येऊन ठेपली आहे हें दाखवून देण्याचा प्रयत्न मी वर केला आहे. त्याचप्रमाणे तें ध्येय कितपत व्यवहार्य आहे आणि त्यासाठीं कोणतीं साधनें वापरलीं पाहिजेत त्याचाहि मी ऊहापोह केला. ज्यांना समाजवादी चळवळीबद्दल सहानुभूति वाटते आणि जे त्यात प्रत्यक्ष भाग घेत आहेत, त्यांनीं लोकशाही मार्गावरच भर द्यावयास हवा. त्यासाठीं समाजवादी पक्षानें आजच्या व्यवहारांत जे सवाल निर्माण होत आहेत, त्याकडे लक्ष पुरविणें आणि समाजवादी समाज निर्माण करण्यासाठीं एक विस्तृत योजना आखणें

आवश्यक आहे. त्याचप्रमाणें सत्ता हातीं आल्यानंतर देशाचा राज्य-कारभार व्यवस्थितपणें चालवूं शकतील असा कार्यकर्त्यांचा एक संचहि पक्षानें तयार केला पाहिजे. कम्युनिस्टांना यापैकीं कोठल्याहि प्रश्नाचें महत्व वाटत नाहीं. विधायक कार्य तर ते निरर्थकच समजतात. साखर किंवा कापड यांच्या टंचाईचा प्रश्न कसा सुटेल याची चिंता त्यांना कधीच वाटत नाहीं. कधीकाळीं त्यांच्या हातीं सत्ता आली तरी ते हे प्रश्न सोडवूं शकतील असें मुळींच नाहीं. परंतु हुकूमशाही मात्र ते निश्चित प्रस्थापित करून दाखवतील. कम्युनिस्ट राजवटींत कामगारांनीं जादा काम करण्याचें नाकारलें, तर त्यांना ते बळाशक गोळ्या घालतील. परंतु तोच जर समाजवादी पक्ष सत्तारूढ झाला तर कामगारांना संघटनास्वातंत्र्य उपभोगावयास मिळेल आणि राज्य-कारभाराची धुरा वाहण्याचें शिक्षण कार्यकर्त्यांना दिलें जाईल. कामगारांना अल्प वेतनावर काम करावें लागलें तरी आपण स्वतःच्या भल्यासाठींच तें करीत आहोंत, याची त्यांना जाणीव झालेली असेल. म्हणजेच लोकशाही पद्धतींत जनताशिक्षणाचाहि अंतर्भाव झालेला असेल. त्यासाठीं विधायक कार्य आणि समाजवादी समाज व्यवस्थेचा गाभा असलेली सहकारी चळवळ चालविणें अवश्य ठरतें. म्हणून लोकशाही वातावरण तयार करणें, जनतेला तिच्यावरील जबाबदारीचें आणि कर्तव्यांचें स्मरण करून देणें हें आपलें कर्तव्य ठरतें.